सरंजाम मिळणार होता, त्यांपैकी दिल्ली घेतल्यावर ३ लक्ष होनांचा सरंजाम बहाल केला जाणार होता! (शिवचरित्र साहित्य, खंड ५, पृ.१०-१२.)

दिल्ली जिंकून तेथील सिंहासनावर आरूढ होण्याचे महत्त्वाकांक्षी स्वप्न शिवछत्रपतींनी व त्यांच्या सुपुत्रांनी बाळगले होते, पण शिवशाहीत हे स्वप्न साकार झाले नाही. पुढे पेशवाईत मराठ्यांनी दिल्ली जिंकली, पण मराठा छत्रपती त्या तख्तावर बसला नाही. कारण त्या तख्तावर बसण्याचा मोगल बादशाहाचा अधिकार मराठ्यांनी आपणहून मान्य केला होता, त्याचबरोबर आपण त्या तख्तावर बसायचे नाही, असेही ठरवले होते. शिवछत्रपतींच्या राजनीतीपासून त्यांचे मराठे किती दूर गेले होते, याचे हे लक्षण होते.

***

पुणे विद्यापीठाचे इतिहासाचे सुप्रतिष्ठ प्राध्यापक व टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे कुलगुरू डॉ. अ. रा. कुलकर्णी हे अलीकडच्या काळातील एक आघाडीचे इतिहास संशोधक व इतिहासकार होते. शिवकालीन समाजव्यवस्था, अर्थकारण, शेती, महसूल, मराठ्यांचे इतिहासकार हे त्यांचे खास संशोधनाचे विषय होते. मराठीप्रमाणेच इंग्रजीत लेखन करून आणि विविध परिषदांत आपले संशोधन सादर करून त्यांनी मराठ्यांचा इतिहास राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर पोहोचवला. प्रस्तुत ग्रंथासाठी त्यांचा शिवाजीमहाराजांच्या राज्याची अर्थनीती या विषयावरील लेख निवडला आहे. महाराजांच्या पराक्रमावर, तसेच राजनीतीवर आतापर्यंत अनेकांनी लिखाण केले असले, तरी त्यामानाने त्यांच्या अर्थनीतीवर फार कमी लिहिले गेले आहे. एक प्रकारे हा शिवचरित्रातील थोडासा उपेक्षित प्रांत आहे.

लेखाच्या प्रारंभी डॉ. कुलकर्णी यांनी मराठ्यांचा आद्य इतिहासकार ग्रँट डफ याने मराठा सत्तेच्या उदयाची मीमांसा करत असता प्रसृत केलेल्या 'वणवा' सिद्धान्ताची व त्याला न्या. रानडे यांनी दिलेल्या प्रत्युत्तराची चर्चा केली आहे. मराठी राष्ट्राची (Maratha Nation) निर्मिती ही शिवाजीमहाराजांची मोठी देशसेवा अथवा सर्वश्रेष्ठ कामगिरी होय, असे न्यायमूर्तींचे विधान उद्धृत करून डॉ. कुलकर्णी यांनी म्हटले आहे, "शिवाजीमहाराजांच्या आणखी एका थोर कार्याची दखल घेतली पाहिजे. हे नवनिर्मित राष्ट्र आर्थिकदृष्ट्या कसे सबल होईल यासाठी त्यांनी जे कार्य केले, त्याची इतिहासकारांनी योग्य ती दखल न घेतल्याने मराठ्यांच्या कार्यासंबंधी काही चुकीची विधाने केली जातात."

शेती ही राज्याचा कणा असून शेतीचा विकास म्हणजे राज्याचा विकास हे शिवाजीमहाराजांनी ओळखले होते. आपले प्रशासन शेतकऱ्यांच्या म्हणजे रयतेच्या सुखसमृद्धीस बांधील असले पाहिजे, आपल्या अधिकाऱ्यांनी रयतेस काडीचाही त्रास देता कामा नये, असा दंडक त्यांनी निर्माण केल्याचे सांगून डॉ. कुलकर्णी, महाराजांनी १६७६ साली प्रभानवल्लीचा सुभेदार रामाजी अनंत यास पाठवलेल्या त्यांच्या आज्ञापत्रातील ओळी उद्धृत करतात. त्या सुभेदारास महाराज फर्मावितात : "चोरी न करावी, इमाने-इतबारे साहेब काम करावे, येसी तू क्रियाच (शपथ) केली आहेस. तेणेप्रमाणे येक भाजीच्या देठास तेही मन न दाखवता रास (रास्त) व दुरुस (दुरुस्त) वर्तणे. ... मुलकात बटाईचा तह (अधेलीचा करार) चालत आहे; परंतु रयेतीवर जाल (जुलूम) न पडता रयतेचा

वाटा रयतेस पावे आणि राजभाग आपणास येई ते करणे. रयेतीवरी काडीचे जाल व गैर केलिया साहेब तुजवर राजी नाहीत ऐसे बरे समजणे.'' यावर टिपणी करताना डॉ. कुलकर्णी यांनी म्हटले आहे : ''राज्याभिषेकानंतर लगेचच हा फतवा काढला आहे. शेतकऱ्यांचे हित साधण्याचा मन:पूर्वक प्रयत्न महाराजांनी केला होता हे या पत्रावरून स्पष्ट होते. शिवाजीराजे हे खऱ्या अर्थाने शेतकऱ्यांचे राजे होते. 'इडापीडा टळो आणि बळीचे राज्य येवो' अशी सतत प्रार्थना करणाऱ्या शेतकऱ्यांना दिलासा देणारे हे 'बळीचे राज्य' सतराव्या शतकात महाराष्ट्रात शिवाजीराजाच्या रूपाने निर्माण झाले होते.''

शेतीप्रमाणेच राज्यात व्यापार व उद्योगधंदे यांची वाढ झाली पाहिजे, यावर महाराजांचा कटाक्ष होता. यासंदर्भात त्यांचे धोरण समजून घेण्यासाठी रामचंद्रपंत अमात्यांच्या आज्ञापत्रातील 'साहुकार' हे प्रकरण फार उपयुक्त ठरते. त्यात म्हटले आहे : ''साहुकार म्हणजे राज्याची व राजश्रीची शोभा. साहुकाराच्या योगाने राज्य आबादान होतें न मिळे त्या वस्तुजात राज्यांत येतात. राज्य श्रीमंत होतें. ...''

स्वदेशी साहुकाराविषयी एवढी आस्था बाळगणारे महाराज परदेशी साहुकारांविषयी म्हणजे युरोपियन व्यापाऱ्यांविषयी मात्र अतिशय सावध होते. हे युरोपियन व्यापारी म्हणजे आपल्याकडील शेठसावकारांप्रमाणे बिगर राजकारणी नव्हते, याची त्यांना पूर्ण जाणीव होती. ''त्यास ही हट्टी जात, हातास आलें मेल्यानेही स्थळ सोडावयाचे नव्हेत.'' या दोन वाक्यांत युरोपियन व्यापाऱ्यांची स्वभाववैशिष्ट्ये त्यांनी नोंदवली आहेत आणि म्हणून आपल्या राज्यात त्यांनी या 'टोपीकरां'ची (युरोपियनांची) डाळ शिजू दिली नाही.

डॉ. कुलकर्णी म्हणतात, ''शिवाजीमहाराजांनी काळाची पावले ओळखली होती. काळाच्या पुढे जाणारा तो एक द्रष्टा महापुरुष होता. म्हणूनच इंग्रजांनी या राजाचे वर्णन The greatest diplomat of Eastern Parts असे केले आहे.''

आपल्या राज्यातील उद्योगधंदे भरभराटीस यायला हवेत, त्यासाठी त्यांना सरकारकडून संरक्षण दिले गेले पाहिजे, याविषयी शिवाजीमहाराज किती दक्ष होते, हे त्यांच्या स्वराज्यातील मीठ उद्योगाला दिलेल्या संरक्षणावरून स्पष्ट होते. कोकणात मिठागरात मिठाचे मोठे उत्पादन होई. किनाऱ्यावरील लोकांचे ते एक निर्वाहाचे प्रमुख साधन होते. हे मीठ स्वराज्यात सर्वत्र पाठवले जाई. पण जेव्हा गोव्याच्या बारदेश भागातून तयार होणाऱ्या मिठाची आवक होऊन ते स्वस्तात मिळू लागल्यावर कोकणातील मिठाचा उठाव होईनासा झाला व मिठागरे ओस पडू लागली. महाराजांच्या लक्षात हे संकट येताच त्यांनी बारदेशच्या मिठावर जबर जकात कर आकारायला सुरुवात केली. परिणामी बारदेशीचे मीठ महाग पडू लागले. स्वदेशी मिठाचा उठाव होऊन कोकणातील मिठागरे गजबजून गेली. डॉ. कुलकर्णी म्हणतात, की १९ व्या शतकात याच संरक्षित व्यापार धोरणाचा (Policy of protection) पुरस्कार थोर जर्मन अर्थशास्त्रज्ञ फ्रेडरिच लिस्ट याने केला होता. महाराजांनी लिस्टच्या पूर्वी दोन शतके ह्या धोरणाचा प्रत्यक्ष अवलंब केला होता.

महाराजांच्या अर्थनीतीची चर्चा करताना शेवटी डॉ. कुलकर्णी यांनी पुन्हा एकदा न्या. रानडे यांच्या विधानाचा परामर्श घेत निष्कर्ष काढला आहे : ''न्यायमूर्ती रानडे

म्हणतात, की मराठी प्रदेशाला राष्ट्राचा दर्जा ही शिवाजीराजांची थोर सेवा होय, पण याहून त्या महापुरुषाची थोर कामगिरी म्हणजे या नवनिर्मित 'मऱ्हाष्ट' राज्याला आर्थिक स्थैर्य प्राप्त करून दिले ही होय असे म्हणावे लागेल.''

***

यानंतरचा लेख शिवचरित्रातील एका वेगळ्या विषयावरील, वैचारिक विषयाची चर्चा करणारा आहे. हा वैचारिक लेख गेल्या पिढीतील महाराष्ट्रातील एक थोर विचारवंत समाजशास्त्रे, तत्त्वज्ञान, साहित्य, कला आदी क्षेत्रांचे गाढे अभ्यासक प्राचार्य नरहर कुरुंदकर यांनी लिहिलेला आहे. विषय आहे शिवाजीमहाराजांची धर्मनिरपेक्षता.

शिवाजीमहाराजांना सर्व जातीधर्मांचा नेता मानले जाते. पण त्यांना 'हिंदूंचे धार्मिक नेते' मानणारे लोकही समाजात आहेत. त्यांच्या या प्रवृत्तीचा उगम महाराजांना ईश्वराचा अवतार मानण्याच्या कार्यात आहे. महाराजांचे कार्यच असे अद्‌भुत होते, की त्यांच्या काळातच नव्हे, तर नंतरच्या शे-दीडशे वर्षांच्या काळातही त्यांना ईश्वराचे अवतार मानले गेले. विशेषत: मराठी बखरींनी त्यांची ही प्रतिमा जनमानसावर मोठ्या प्रमाणावर बिंबवली. महाराजांच्या अवतारपणाचे कवच झुगारून देऊन त्यांना 'शूद्रांचा नेता व माणूस' म्हणून पाहण्याचा पहिला मान आधुनिक काळात महात्मा फुले यांच्याकडे जातो, असे जे विधान प्राचार्य कुरुंदकरांनी केले आहे, ते इतिहासाला न्याय देणारेच आहे.

'धर्मनिरपेक्षता' या संकल्पनेची चर्चा करत असता प्राचार्य कुरुंदकरांनी त्यामागचे भिन्नभिन्न आशय कसे आहेत, हे स्पष्ट करून एखादी व्यक्ती आपल्या जीवनात धार्मिक असली तरी ती सार्वजनिक जीवनात धर्मनिरपेक्ष असू शकते, असे प्रतिपादन केले आहे. त्यासाठी त्यांनी महात्मा गांधींचे उदाहरण दिले आहे. गांधीजी ईश्वरावर, पाप-पुण्याच्या कल्पनेवर, पुनर्जन्मावर, प्रार्थनेवर श्रद्धा ठेवणारे होते. म्हणजे ते पूर्णपणे धार्मिक होते, पण म्हणून काही लोक त्यांना हिंदू धर्माचे नेते मानत नाहीत; उलट सर्व जातीधर्मांचे लोक त्यांना भारताचे 'राष्ट्रपिता' मानतात. याचे कारण ते त्यांच्या वैयक्तिक जीवनात धार्मिक असले तरी सार्वजनिक जीवनात त्यांनी धर्मनिरपेक्ष राजकारणाचा पुरस्कार केलेला होता.

शिवाजीमहाराजांची धर्मनिरपेक्षता अशीच होती. वैयक्तिक जीवनात ते शिवभक्त होते, भवानीमातेवर त्यांची भक्ती होती, हिंदू म्हणून ते कुलाचारही पार पाडत होते. पण स्वराज्याचे नेतृत्व करताना, म्हणजे सार्वजनिक जीवन जगताना ते धर्मनिरपेक्ष राजकारणाचा पुरस्कार करत होते.

शिवाजीमहाराजांची धर्मनिरपेक्षता व भारतीय राज्यघटनेमधील 'सेक्युल्यारिझम'ची संकल्पना यांमधील साधर्म्याची चिकित्सा करताना प्राचार्य कुरुंदकरांनी महाराजांची धर्मनिरपेक्षता किती उदात्त पायावर उभी होती, याचे फार मार्मिक प्रतिपादन केले आहे ते म्हणतात, ''सेक्युल्यारिझमची अजून एक महत्त्वाची कल्पना आहे. आधुनिक भारतात महात्मा गांधींनी या कल्पनेच्या भोवती सारे भारतीय राजकारण उभे केले. भारतीय संविधान या कल्पनेवर आधारलेले आहे. आपले माजी राष्ट्रपती डॉ. राधाकृष्णन हे संविधान सभेचेही सभासद होते. त्यांनी या धर्मनिरपेक्षतेचे मोठे मार्मिक वर्णन केलेले आहे. त्यांनी असे म्हटले आहे, की आम्ही धर्म हा माणसाच्या समंजसपणाची व स्वातंत्र्याची खूण मानतो.

धर्म ही एक अशी आध्यात्मिक जाणीव आहे, की तिच्यामुळे माणूस स्वत:च्या पशुत्वापासून मुक्त आणि स्वतंत्र होतो. आणि त्याबरोबरच सर्वांचे स्वातंत्र्य तो आपल्या स्वातंत्र्याइतके महत्त्वाचे मानू लागतो. म्हणून सर्व धर्मांच्याविषयी समान आदर व व्यक्तीच्या स्वातंत्र्यावर श्रद्धा ही आमच्या धर्मनिरपेक्षतेची महत्त्वाची गमके आहेत.

धर्मनिरपेक्षतेची ही कल्पना अनेक दृष्टीने महत्त्वाची आहे. ही कल्पना व्यक्तीच्या स्वातंत्र्यावर आधारलेली आहे आणि म्हणून धार्मिक चालीरीतींनी निर्माण केलेल्या व्यक्तीच्या गुलामगिरीला नाकारणारी अशी ही कल्पना आहे. तरीही माणसांना या कल्पनेत धर्मश्रद्धेचे स्वातंत्र्य आहे. सर्वांना समान न्याय व प्रतिष्ठेचे आश्वासन आहे. धर्म ही परलोक कल्याणाची बाब आहे. तो व्यक्तीच्या खाजगी जीवनाचा भाग आहे, हे या ठिकाणी गृहीत आहे. या कल्पनेत धर्माला नीतिमूल्ये म्हणून मान्यता असते. सर्व धर्मांच्याविषयी आदर हे या कल्पनेचे वैशिष्ट्य असते. शिवाजीमहाराज व्यक्तिगत जीवनात धार्मिक असूनही धर्मनिरपेक्ष नेते आहेत, असे म्हणताना ही भारतीय संविधानाने पुरस्कारलेली चौथी कल्पना डोळ्यांसमोर असते. हा सम्राट अशोक आणि विक्रमादित्याचा आधुनिक भारताशी सांधा आहे. अकबर आणि शिवाजी हेही या प्रवाहात येतात. या प्रवाहात शिवाजीमहाराज हे निर्णायक महत्त्वाचे स्थान आहे.''

इतिहासाच्या प्रवाहात शिवछत्रपतींचे स्थान अशोक, विक्रमादित्य, अकबर या थोर पुरुषांच्या बरोबरीचे असल्याचे लेखकाचे भाष्य कोणाही राष्ट्रप्रेमी महाराष्ट्रीय व्यक्तीस पुलकित करणारे आहे!

वतनदारांच्या जुलमातून रयतेची सुटका करणारा, सर्व धर्मांचे रक्षण करणारा, परधर्मीयांना आदराने वागवणारा, शत्रूच्या स्त्रियांचाही सन्मान करणारा शिवाजी राजा हा खराखुरा 'जनतेचा नेता' होता, असेच चित्र त्याचे चरित्र पाहिल्यावर उभे राहाते, असे लेखकाने म्हटले आहे. पण या चित्राचेही एक असामान्य वैशिष्ट्य आहे. हे चित्र दिसायला मध्ययुगीन असले तरी त्यामागचा आशय मात्र आधुनिक युगाचा आहे. लेखकाच्या शब्दांत ''या चित्राचा आकार मध्ययुगाप्रमाणे राजेशाहीचा आहे. त्याचा आशय आपल्या काळाच्या कक्षा छेदून बाहेर पडणारा, लोकशाहीचा, धर्मनिरपेक्षतेचा व लोककल्याणाचा आहे. शिवाजीने वैदिकमंत्राने राज्याभिषेक करून घेतला एवढेच आपण पाहतो. देवळे बांधणे, दानधर्म करणे, यज्ञ करणे, स्मृतींचा कायदा लागू करणे या असल्या परंपरावादात त्याने कधीही रस घेतला नाही, हे आपण विसरून जातो.''

प्राचार्य कुरुंदकरांचा लेख वाचल्यावर शिवछत्रपतींना राष्ट्रपुरुष का म्हणतात, तसेच लोकशाहीच्या युगातही त्यांच्या नावाचा जयजयकार का केला जातो, या प्रश्नांची उत्तरे कोणाही वाचकास उमजून घेणे सोपे जाणार आहे यात शंका नाही.

***

यापुढचा लेखही शिवाजीमहाराजांच्या कामगिरीच्या अत्यंत महत्त्वाच्या पैलूवर आहे. हा पैलू म्हणजे महाराजांनी स्वराज्याच्या रक्षणासाठी उभारलेली संरक्षण संघटना. या लेखाचे कर्ते ले. कर्नल म. ग. अभ्यंकर असून ते पुणे विद्यापीठाच्या संरक्षणशास्त्र विभागाचे प्रमुख होते. शिवचरित्रातील मोहिमांचे, त्यामधील मराठ्यांच्या पराक्रमांचे रसभरीत

वर्णन शिवचरित्रावरील अनेक ग्रंथांत पाहायला मिळते, पण या पराक्रमांमागची शिवरायांची संरक्षण संघटना कशी होती आणि रणनीती कशी होती, यांची चर्चा फारशी केलेली आढळत नाही. खरेतर, महाराजांची एकेक मोहीम हा एक स्वतंत्र अभ्यासाचा व ग्रंथाचा विषय आहे. गेल्या शतकात कॅ. गणेश वासुदेव मोडक यांनी सतत १८ वर्षे परिश्रम घेऊन शिवचरित्रातील अफझलखानावरील मोहिमेवर 'प्रतापगडचे युद्ध' या नावाचा ग्रंथ सिद्ध केल्याचे (सन १९२७) जाणकार इतिहासप्रेमींना ज्ञात आहेच. अलीकडच्या काळात ले. कर्नल अभ्यंकरांनी युद्धशास्त्रावर इंग्रजीत व मराठीत बरेच ग्रंथ लिहिले आहेत. शिवरायांच्या युद्धमोहिमांवर व रणनीतीवर युद्धशास्त्राच्या दृष्टिकोनातून काही विश्लेषणात्मक लिखाण केलेले आहे. प्रस्तुत लेख त्याचेच एक उत्तम उदाहरण आहे.

शिवाजीमहाराजांच्या मोहिमांचे वर्णन केवळ 'लष्करी' या शब्दाने न करता 'संरक्षण' या व्यापक शब्दप्रयोगाने करावे, अशी सूचना लेखाच्या प्रारंभी करून महाराजांच्या ३५ वर्षांच्या कारकिर्दीमधील झंझावाती मोहिमांचे तीन भाग लेखकाने कल्पिले आहेत :

१. सन १६४५ ते १६६० : बचावात्मक मोहिमा

२. सन १६६१ ते १६७२ : बचावात्मक आक्रमण

३. सन १६७२ ते १६८० : आक्रमणाच्या मोहिमा

यामधील पहिल्या भागात स्वराज्याची स्थापना झाली. ती सह्याद्रीच्या आश्रयाने व मुख्यत: पायदळाच्या साहाय्याने केली गेली. यामध्ये सह्याद्रीच्या पर्वतमय प्रदेशाचा फायदा घेत महाराजांनी काटक मावळ्यांच्या मदतीने बचावात्मक मोहिमा केल्या. अफझलखानावरील मोहीम ही बचावात्मक मोहीमच होती, पण नंतर जेव्हा शायिस्तेखानाची स्वारी आली, त्या वेळी महाराजांनी मोगलांना उंबरखिंडीत गाठून त्यांचा दारुण पराभव केला, ते बचावात्मक आक्रमण मोहिमेत मोडते. ले. कर्नल अभ्यंकरांच्या अंदाजानुसार सन १६७०-७२ च्या सुमारास महाराजांचे सैन्य १० ते १२ हजार पायदळ व १२ ते १५ हजार घोडदळ तसेच तोफखाना व आरमार यांनी सज्ज होते. एवढ्या सज्जतेनिशी महाराजांनी सन १६७२ नंतरच्या कालखंडात आक्रमक मोहिमा काढल्याचे दिसून येते. त्यांतील सर्वांत ठळक मोहीम म्हणजे कर्नाटक दिग्विजय मोहीम होय.

महाराजांच्या संरक्षण व्यवस्थेमधील किल्ल्यांचे महत्त्वही ले. कर्नल अभ्यंकरांनी युद्धशास्त्रीय दृष्टिकोनातून अधोरेखित केले आहे. ते लिहितात, क़ी कोणताही किल्ला हा लष्करीदृष्ट्या एक वर्चस्वबिंदू असतो आणि त्याचे तीन प्रकारचे उपयोग असतात : पहिला उपयोग किल्ल्याच्या आसमंतातील प्रदेशावर जागता पहारा ठेवणारा एक 'संरक्षित तळ' म्हणून. दुसरा उपयोग युद्धासाठी लागणाऱ्या साहित्याचा 'भांडारवजा युद्धागार' म्हणून. आणि तिसरा 'पुरवठावाहिनीतील संपर्कबिंदू' म्हणून. युद्धमोहिमांत महाराजांनी किल्ल्यांचा अशा तिन्ही दृष्टींनी वापर केलेला दिसतो. तसेच किल्ल्यांचा वापर बचावात्मक तळ म्हणून करत असतानाच शत्रूविरुद्धच्या चढाईत त्यांचा त्यांनी आक्रमक स्थान (Springboard for attack) म्हणूनही वापर केल्याचे दिसून येते. अफझलखानाच्या वधानंतर प्रतापगडाच्या आश्रयाने असलेल्या मराठा फौजेने शत्रूच्या तळावर जो हल्ला चढवला, तो याच सूत्राने.

शिवकालीन लष्करी इतिहासाचा एक तेजस्वी पैलू म्हणजे मराठ्यांचा गनिमी

कावा. जगातही अनेक ठिकाणी गनिमी काव्याने लढाया होत आल्या आहेत. अशा गनिमी काव्याची प्रेरणा ही 'देशभक्ती, अन्याय व जुलमाचा प्रतिकार आणि जनतेच्या आशा-आकांक्षा साकार करण्याची आत्यंतिक महत्त्वाकांक्षा या तीन महान जीवनमूल्यांतून निर्माण होते', असे लेखकाने गनिमी काव्याची शास्त्रीय चर्चा करताना म्हटले आहे, ते यथार्थच आहे. खुद्द शिवाजीमहाराजांच्या प्रारंभीच्या विजयी लढाया या गनिमी काव्याची उत्कृष्ट उदाहरणे आहेत. त्यादृष्टीने त्यांना गनिमी काव्याचे महान प्रवर्तक व नेते मानणे योग्यच आहे. तथापि, त्यांचे कार्य व कर्तृत्व त्याहून मोठे होते, हे सांगताना लेखक म्हणतो -

"केवळ गनिमी कावा युद्धाचे पराक्रमी नेते म्हणणे म्हणजे त्यांच्या कर्तृत्वाचे अवमूल्यन करण्यासारखे आहे. प्रारंभीच्या पर्वात जरी त्यांनी गनिमी कावा पद्धतीचा अवलंब केला असला, तरी नंतर त्यांनी अलेक्झांडर, सीझर किंवा नेपोलियन यांच्याप्रमाणे आक्रमक विजय संपादन केले, म्हणून त्यांना जगज्जेता नाही, तरी भारतजेता म्हणणेच अधिक सयुक्तिक होईल."

आपल्या लेखात ले. कर्नल अभ्यंकरांनी शिवाजीमहाराजांच्या संरक्षण संघटनेतील पायदळ, घोडदळ, तोफखाना, शाही संरक्षक दल, लष्करी प्रशासन, लष्करी शिस्त आदी अनेक बाबींचा ऊहापोह केलेला आहे. या सर्वांचा परामर्श येथे घेता येणार नाही. पण त्यांनी जाताजाता महाराजांच्या सेनेचे स्वरूप कसे राष्ट्रीय होते याविषयी जे उद्‌गार काढले आहेत, ते फार महत्त्वाचे आहेत. ते म्हणतात, "शिवाजीमहाराजांच्या सेनेत बहुतांशी महाराष्ट्रातील शेतकरी वर्गाचाच भरणा होता. इतर अल्पसंख्याक आणि दलित समजल्या जाणाऱ्या जमातीतील लोकही सेनेत निरनिराळ्या प्रकारची कामे करीत. थोड्या प्रमाणात मुसलमान व पठाण यांचीही बारगिरीत भरती होई. १६५९ मध्ये विजापूर दरबारचे ७०० पठाण बारगीर सेवेसाठी महाराजांपाशी रुजू झाले. त्यांनाही घोडदळात घेण्यात आले. अशा प्रकारे छत्रपतींची सेना ही एक राष्ट्रीय सेना होती, इतकेच नव्हे, तर ती एक धर्मनिरपेक्ष संघटना होती असेच म्हणावे लागेल."

***

रामचंद्रपंत अमात्याने 'आज्ञापत्र' नावाचा जो राजनीतीपर ग्रंथ रचला आहे, त्याचा संदर्भ मागे येऊन गेलाच आहे. हा शिवाजीमहाराजांच्या अष्टप्रधान मंडळातील एक प्रधान. शिवरायांची राजनीती व रणनीती पाहिलेला, अनुभवलेला व त्यांची अंमलबजावणी करणारा शिवशाहीतील एक राजकार्यधुरंधर अधिकारी. याने आपल्या आज्ञापत्रात शिवरायांचीच राजनीती सांगितली आहे. त्यामध्ये 'आरमार' नावाचे एक प्रकरण शेवटी दिलेले आहे. आरमाराची व्यवस्था कशी असावी, त्यातील दंडक कसे असावेत, संरक्षण-यंत्रणा कशी असावी, आदी बाबींचा खल त्यात केला आहे. तो तर महत्त्वाचा आहेच; पण या प्रकरणाच्या प्रारंभीच अमात्याने आरमाराचे महत्त्व दोन-तीन वाक्यांत सांगितले आहे, ते फार लक्षणीय आहे. अमात्याने म्हटले आहे, "आरमार म्हणजे स्वतंत्र एक राज्यांगच आहे. ... ज्याच्या जवळ आरमार त्याचा समुद्र. याकरिता आरमार अवश्यमेव करावे."

'मराठ्यांचे आरमार' या विषयाचा खास अभ्यास केलेल्या डॉ. भा. कृ. आपटे यांचा शिवाजीमहाराजांच्या आरमारावरील प्रस्तुत ग्रंथातील लेख शिवचरित्रातील आरमाराच्या कामगिरीवर प्रकाशझोत टाकणारा आहे. १६५६ मध्ये महाराजांनी जावळी-

रायगडचा प्रदेश जिंकल्यावर त्यांच्या राज्याची सीमा सागराला जाऊन भिडली आणि त्याच वेळी राज्याच्या किनारी प्रदेशाचे संरक्षण करण्यासाठी आरमाराची गरज असल्याचे महाराजांच्या नजरेत आले. पुढच्याच साली त्यांनी कल्याण-भिवंडीचा प्रदेश ताब्यात आणला आणि लगेचच कल्याणच्या खाडीत त्यांनी मराठी आरमाराची मुहूर्तमेढ रोवली. त्यासाठी जहाजे बांधणाऱ्या पोर्तुगीज तज्ज्ञ कारागिरांची नेमणूक त्यांनी केली होती, पण नव्याने उदयास येणाऱ्या मराठा आरमाराचा धोका पोर्तुगीज व्हाइसरॉयच्या लक्षात येताच त्याने या पोर्तुगीज लोकांना महाराजांच्या सेवेचा त्याग करायला लावले. एके दिवशी हे सर्व पोर्तुगीज आपल्या बायकामुलांसह पोर्तुगीज हद्दीत पळून गेले.

पण ते पळून गेले म्हणून आरमार उभारणीचा उद्योग महाराजांनी थांबवला नाही. पोर्तुगिजांच्या हाताखाली तयार झालेल्या मराठी तंत्रज्ञांच्या साहाय्याने त्यांनी आरमार उभारणीचे कार्य नेटाने चालू ठेवले. त्यात त्यांनी इतकी प्रगती केली, की सन १६६७ च्या एका पत्रात पोर्तुगीज व्हाइसरॉयला 'शिवाजीचे आरमार आम्हास भीतिदायक झाले आहे' असे उद्गार काढावे लागले आहेत!

हिंदवी स्वराज्याच्या समुद्रावर तीन प्रबळ शत्रू होते. ते म्हणजे सिद्दी, पोर्तुगीज व इंग्रज. पैकी सिद्दीची जहागीर तर स्वराज्याला खेटूनच होती. उत्तरेस कुंडलिका नदी तर दक्षिणेस सावित्री नदी या त्याच्या किनाऱ्यावरील सीमा होत्या. रोह्याची खाडी, राजापूरची खाडी व बाणकोटची खाडी या तीन खाड्या आणि राजापूरच्या खाडीवर असणारे दंडराजापुरी हे ठाणे तसेच समोरचा बलदंड जंजिरा किल्ला ही या जहागिरीची वैशिष्ट्ये होती. समुद्रावर चाचेगिरी व जमिनीवर लुटालूट, जाळपोळ, लोकांना ग़ुलाम करणे हाच त्यांचा प्रमुख व्यवसाय होता. अशा क्रूर व धोकेबाज शत्रूपासून आपला किनारी प्रदेश सुरक्षित राखायचा असेल, तर तोडीस तोड आरमार उभे करायला हवे, हे ओळखून महाराजांनी आरमाराचा प्रारंभ केला होता.

सिद्दी प्रथम निजामशाहीचा सरदार होता. ती बुडाल्यावर तो आदिलशाहाचा सरदार बनला. पुढे त्याने मोगलांची ताबेदारी स्वीकारली. असे असले तरी सिद्दी स्वतंत्र सत्ताधीशांप्रमाणेच किनाऱ्यावर वावरत असे. शिवाजीमहाराजांनी त्याचे दंडराजापुरी हे ठाणे घेऊन त्याचा जंजिरा जिंकण्याचे अनेक प्रयत्न केले पण त्यात त्यांना यश आले नाही. त्यासाठी जंजिरा किल्ल्याचे समुद्रातील विशिष्ट भौगोलिक स्थान जसे कारणीभूत होते, तसेच इंग्रजांनी व पोर्तुगिजांनी त्यास वेळोवेळी केलेले साहाय्य व मुंबई बंदरात त्याच्या आरमारास इंग्रजांनी दिलेला आश्रय याही बाबी कारणीभूत होत्या. सिद्दीचा जंजिरा महाराजांना मिळाला असता, तर मराठा आरमाराचे सामर्थ्य वाढून मोठा धोका मुंबईस निर्माण होणार होता. डॉ. आपटे यांनी महाराज व सिद्दी यांच्यात झालेल्या संघर्षाचा धावता आढावा घेत शेवटी निष्कर्ष काढला आहे. ''तोफा व मोठी जहाजे यांच्या अभावी जंजिरा जिंकण्याचे शिवाजीचे स्वप्न साकार होऊ शकले नाही. मराठ्यांच्या नाविक सत्तेला आव्हान देत जंजिरेकर सिद्दी कायम राहिला. याचे प्रमुख कारण सिद्द्याला ऐन वेळी इंग्रज व पोर्तुगीज यांच्याकडून मिळणारी मदत.''

सिद्दीप्रमाणे पोर्तुगिजांशीही मराठ्यांचा संघर्ष सागरावर होत राहिला. सर्व युरोपियनांमध्ये पोर्तुगीज हे अधिक उद्दाम, गर्विष्ठ व हेकेखोर होते. हिंदुस्थानकडे जाणाऱ्या सागरी मार्गाचा शोध त्यांच्या वास्को-द-गामा या सागरवीराने लावल्यामुळे हिंदी

महासागर व अरबी समुद्र हे पोर्तुगालच्या राजाच्या मालकीचे आहेत असे ते समजत असत आणि त्यांच्या परवान्याशिवाय हिंदी सत्तांना सागरावर संचार करण्यास प्रतिबंध करत असत. शिवाजीमहाराजांनी आपले आरमार उभारून पोर्तुगिजांच्या या तथाकथित सार्वभौम सागरी अधिकारास शह दिला. पोर्तुगिजांशी निर्माण झालेल्या संघर्षाचे हे एक प्रमुख कारण होते. या संघर्षात एकमेकांची जहाजे पकडणे, ओलीस ठेवणे, हे प्रकार सतत चालत राहिले. १६६५ साली शिवाजीमहाराजांनी कारवारच्या दक्षिणेस बेदनूर राज्यातील बसरूर बंदरावर पोर्तुगीज आरमारास चकवा देऊन आपल्या आरमाराची स्वारी केली. या स्वारीतही परतत असता पोर्तुगीज आरमाराशी मराठ्यांच्या आरमाराची चकमक झडली होती.

शिवरायांच्या आरमाराच्या इतिहासातील सर्वांत तेजस्वी अध्याय म्हणजे त्यांनी मुंबईकर इंग्रजांच्या नाकावर टिच्चून खांदेरीवर उभारलेला कोट आणि त्यास प्रतिबंध करण्यासाठी आलेल्या इंग्रज आरमाराचा त्यांनी केलेला पराभव!

डॉ. आपटे यांनी या संघर्षाचा वृतान्त देऊन शेवटी म्हटले आहे. ''खांदेरीची लढाई छोट्या प्रमाणावर झाली, पण ती आरमारी लढाई असल्यामुळे तिचे महत्त्व आगळे आहे. शिवाजीने उभारलेले आरमार योग्य नेतृत्वाखाली पाश्चात्त्यांशी यशस्वी झुंज देऊ शकते हे या लढाईने सिद्ध केले.''

अशा प्रकारे शिवाजीमहाराजांनी आरमाराची स्थापना करून समुद्रावरील सिद्दी, पोर्तुगीज, इंग्रज या तीन प्रमुख शत्रूंवर वचक निर्माण केला. या तीन आरमारी सत्तांबरोबर आता मराठ्यांची आरमारी सत्ता समुद्रावर राज्य करू लागली. जे आदिलशाहीला जमले नव्हते, जे मोगल बादशाहीलाही शक्य झाले नव्हते, ते या मराठा राजाने शक्य करून दाखवले. भूमीप्रमाणे समुद्रालाही पालाण (खोगीर) घालून 'भारतीय आरमाराचा जनक' ही बिरुदावली इतिहासात प्राप्त केली!

***

आरमाराप्रमाणेच 'दुर्ग' हे प्रकरण शिवाजीमहाराजांच्या कार्यकर्तृत्वाचा एक महत्त्वाचा पैलू आहे. महाराष्ट्र हा दुर्गांचा म्हणजे गडकोटांचा देश आहे. सह्याद्रीच्या कुशीतील गडकोटांची स्वराज्याच्या निर्मितीमधील भूमिका अनन्यसाधारण आहे. शिवछत्रपतींनी या गडकोटांच्या साहाय्याने स्वराज्य स्थापन केले, वाढवले आणि सुरक्षितही राखले. रामचंद्रपंत अमात्याने आपल्या 'आज्ञापत्रा'त या गडकोटांचे माहात्म्य वर्णन करताना म्हटले आहे-''संपूर्ण राज्याचें सार तें दुर्ग. दुर्ग नसता मोकळा देश परचक्र येतांच निराश्रय, प्रजाभग्न होऊन देश उद्धस (उद्ध्वस्त) होतो. देश उद्धस झाल्यावरी राज्य असें कोणास म्हणावे ? याकरितां पूर्वी जे जे राजे झाले त्यांनी आधीं देशामध्यें दुर्ग बांधून तो तो देश शाश्वत करून घेतला, आणि आलें परचक्रसंकट दुर्गाश्रयीं परिहार केलें.''

अशा या दुर्गांची गोडी आपल्या 'दुर्ग भ्रमणगाथे'ने साऱ्या महाराष्ट्राला लावणारे थोर साहित्यिक व गडकोटप्रेमी गो. नी. दांडेकर यांच्या लेखणीतून उतरलेल्या 'दुर्गपुत्र शिवाजी' या लेखाचा समावेश या ठिकाणी केला आहे.

मराठी माणसास गडकोट पाहिले की शिवाजीमहाराजांची आठवण होते आणि शिवप्रतिमेचे दर्शन घडले की गडकोटांचे स्मरण होते. इतकी महाराजांविषयीची व गटकोटांविषयीची भावना एकरूप झालेली आढळते. किंबहुना महाराष्ट्रातील प्रत्येक गड

शिवाजीमहाराजांनीच बांधला असाही सामान्य ग्रह सर्वत्र आढळतो. गोनीदा म्हणतात, "याचा अर्थ इतकाच, की कुण्या एका गडकोटामध्ये जन्मलेला, जन्मभर गडकोट जिंकण्याचा ध्यास लागलेला, त्यांच्यावर निरतिशय प्रेम करणारा, एका अजेय दुर्गावर स्वतःची राजधानी निर्मिणारा, तिथेच स्वतःला राज्याभिषेक करवून घेणारा आणि अंतिम श्वासही त्याच दुर्गावर घेणारा पुरुष एक शिवछत्रपति वगळता इतिहासात दुसरा कुणी झाला नाही."

शिवाजीमहाराज हे केवळ दुर्गप्रेमी होते असे नाही, तर ते दुर्गनिर्मितीशास्त्राचे तज्ज्ञ होते. त्यांच्याइतका दुर्गशास्त्राचा अभ्यास अन्य कोणी केल्याचा इतिहासात दाखला नाही. त्यांच्या या कार्याचा गौरव करताना गोनीदांनी म्हटले आहे -

"शिवछत्रपतींचा गौरव जर कशासाठी वारंवार करायचा असेल, तर तो यासाठी की त्यांनी दुर्गरचना, त्यांची गरज, उपयोग, महत्त्व, स्थान आवश्यकता इत्यादि सर्व बाबींचा अतिशय सूक्ष्म अभ्यास केला. त्याचे त्यांनी एक स्वतंत्र शास्त्र बनवून टाकले. जुने दुर्ग हस्तगत केले. पडके होते त्यांचा पुनरुद्धार केला. तटाबुरुजांनी त्यांची मजबुती केली. वर तोफा चढवून बंदोबस्त पक्का केला. संरक्षणासाठी नियम तयार केले. अतिशय कठोरपणे त्यांचे पालन करवून घेतले. पूर्वी दुर्ग नव्हते, तिथे मोक्याच्या जागी नवे बांधवून घेतले त्यांच्या बांधणीसाठी लागणारे द्रव्य मिळविले. संपादित केले. त्यासाठी कष्ट केले, साहसे केली."

गोनीदांनी 'प्राकृतिक सौंदर्य, निसर्गाचे दान, बांधणी दुर्गमत्व या दृष्टींनी केवळ अजोड' असणारा राजगड, 'अठरा टोपीकरांच्या छातीवर हे प्रत्यक्ष शिवलंका निर्मिली' असे बखरकाराने ज्याचे वर्णन केले आहे तो सिंधुदुर्ग आणि 'अगदी पाखरू बसू म्हणेल तरी त्यात जागा नाही' असा चहू बाजूंनी तुटलेला ताशीव कडा असलेला रायगड अशा तीन किल्ल्यांचे महत्त्व आपल्या लेखात अधोरेखित केले आहे. तसेच रायगड व राजगड या किल्ल्यांवरील बाजारपेठांविषयीही लिहिले आहे. रायगडच्या बाजारपेठेवर भाष्य करताना ते म्हणतात, "रायगडावरील बाजारपेठ खूपच प्रशस्त. त्रेचाळीस दुकाने दोन ओळींत अशी बांधली आहेत की तो नगरनिर्मात्यासमोर एक चिरकालिक आदर्श बसला आहे.'

पंत अमात्य बावडा, कोल्हापूर, यांच्या दप्तरात शिवछत्रपतींचा १६७१-७२ सालचा एक अस्सल कागद प्रसिद्ध झाला आहे. (पंत अमात्य बावडा दप्तर, खंड १, पृ. २३-२५.) त्यामध्ये स्वराज्यातील गडकोटावर १ लाख ७५ हजार होन खर्च करण्याची यादी असून एकट्या रायगडावर ५० हजार होन खर्च केले जाणार असल्याचे दिसून येते. सिंधुदुर्ग, विजयदुर्ग, सुवर्णदुर्ग, प्रतापगड, पुरंदर व राजगड यांना प्रत्येकी १० हजार होन, तर प्रचंडगड, प्रसिद्धगड, विशाळगड आदी किल्ल्यांना प्रत्येकी ७ हजार होन मिळणार होते!

शिवाजीमहाराज स्वराज्यातील किल्ल्यांच्या बांधणीवर व दुरुस्तीवर लाखो होन खर्च करतात, हे पाहून हा खर्च थोडा कमी करावा, अशी सूचना एका अधिकाऱ्याने करताच त्यांनी त्यास दिलेले उत्तर एका थोर द्रष्ट्या पुरुषाला शोभणारे आहे. ते म्हणाले होते, "दिल्लींद्रासारखा (औरंगजेब) शत्रू उरावर आहे. तो आला तरी नवे जुने तीनशे साठ किल्ले हजरीस आहेत. एक एक किल्ला वर्ष वर्ष लढला तरी त्यास तीनशे साठ वर्षे

पाहिजेत." महाराजांच्या हयातीत दिल्लींद्र आला नाही हे खरे, पण त्यांच्या निधनानंतर अवघ्या दोन वर्षांत तो प्रचंड सेना घेऊन दक्षिणेत मराठ्यांचे राज्य नष्ट करण्यासाठी धावून आला आणि त्याने हे राज्य घेण्यासाठी जंगजंग प्रयत्न केला. हा प्रयत्न तो एक नव्हे, दोन नव्हे तर तब्बल २७ वर्षे करत होता, पण त्याला यश आले नाही. संभाजी-महाराज, राजाराम महाराज व शेवटी महाराणी ताराबाई या मराठा राज्यकर्त्यांनी त्याच्याशी सह्याद्रीच्या रांगांवरील गडकोटांच्या साहाय्यानेच निकराची झुंज दिली. मराठ्यांनी अप्रतिम शौर्याने त्यांचे किल्ले लढवले. किल्ल्याला वेढा घालून बसलेल्या लाखभर मोगली फौजेशी मराठे किल्ल्यावरील शे-पाचशे सैन्यानिशी चार-सहा महिने सहजासहजी लढत असत. त्यामुळे दर वर्षीच्या मोहिमेत औरंगजेबाला मराठ्यांचा फारतर एखाददुसरा किल्ला घेता येत असे. महाराणी ताराबाईच्या कारकिर्दीत तर असे ६-७ किल्ले घेण्यातच त्याच्या आयुष्याची अखेरची ६-७ वर्षे वाया गेली आणि शिवछत्रपतींनी केलेले भाकीत खरे ठरले! मराठ्यांचे दहा-पाच किल्ले घेताघेताच औरंगजेबाची उमर गुजरून गेली आणि त्याला महाराष्ट्रातच आपल्या दफनभूमीचा शोध घ्यावा लागला! हा शिवरायांच्या राजनीतीचा व रणनीतीचा, त्यांच्या शिकवणुकीचा विजय होता!

***

प्रस्तुत स्मृतिग्रंथातील शेवटचा लेख शिवछत्रपतींच्या चित्रांवरचा असून तो थोर इतिहास संशोधक प्रा. ग. ह. खरे यांनी लिहिला आहे. मराठ्यांच्या इतिहासाचे प्रेम, तो प्रकाशात यावा म्हणून कागदपत्रांचा धांडोळा घेण्याची परिश्रमवृत्ती, व्यासंगीपणा, ध्येयनिष्ठा, चिकाटी, कमालीचा साधेपणा या त्यांच्या गुणांचा विचार करता ते इतिहासाचार्य राजवाडे यांच्या पठडीतील शेवटचे इतिहास संशोधक होते, हे कोणीही मान्य करेल. अशा व्यासंगी संशोधकाने शिवाजीमहाराजांच्या आतापर्यंत उपलब्ध असणाऱ्या चित्रांवर लिहिलेला लेख हा एक अधिकृत दस्तऐवज मानावा, इतका महत्त्वाचा आहे.

लेखात शिवाजीमहाराजांच्या एकूण नऊ चित्रांची माहिती दिली आहे. पैकी शेवटचे भारत इतिहास संशोधक मंडळातील तंजावरी पद्धतीचे चित्र व बिकानेर संग्रहातील चित्र, खरे यांच्या मते विश्वसनीय नाहीत. बाकीच्या सात चित्रांचा तपशील असा -

(१) व्हॅलेंटिन या डच चित्रकाराने काढलेले चित्र,

(२) ऑर्मच्या ग्रंथात प्रसिद्ध केलेले चित्र,

(३) लंडनच्या ब्रिटिश म्युझियममधील चित्र,

(४) मुंबईच्या छत्रपती शिवाजीमहाराज वस्तुसंग्रहालयामधील (प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियम) चित्र,

(५) छत्रपती शिवाजीमहाराज वस्तुसंग्रहालयातीलच (प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियम) शिवाजीमहाराज व रुस्तमे जमाँ यांच्यात झालेल्या लढाईचे चित्र,

(६) पॅरिसमधील बिब्लिओथेक नेसिओनेलमध्ये असणारे चित्र,

(७) पुण्यात १९३५ साली भरलेल्या मॉडर्न हिस्ट्री काँग्रेसच्या अधिवेशनात प्रदर्शित झालेले ग्वाल्हेर संग्रहातील चित्र.

उपरोक्त सात चित्रांपैकी सहा चित्रे प्रस्तुत ग्रंथात एकत्र दिली आहेत. सातव्या क्रमांकाचे चित्र प्रयत्न करूनही उपलब्ध झाले नाही. या चित्रांमुळे हा लेख वाचताना

वाचकास या चित्रांचे रसग्रहण चांगल्या प्रकारे करता येईल, असे वाटते. या चित्रांच्या परीक्षणावरून शिवाजीमहाराजांची चेहरेपट्टी, शरीरबांधा, वर्ण, पोशाख, अलंकार, आयुधे आदी बाबींची थोडीबहुत कल्पना येऊ शकते. यांपैकी व्हॅलेंटिनचे चित्र हे शिवाजीमहाराजांना प्रत्यक्ष पाहिलेल्या व्यक्तीने काढले असल्यामुळे त्याला फार महत्त्व आहे. पॅरिसमधील मीर मुहम्मद या चित्रकाराने काढलेल्या चित्राचेही एक आगळे महत्त्व आहे. पांढऱ्याशुभ्र घोड्यावर स्वार झालेल्या शिवाजीमहाराजांच्या अवतीभोवती जे संरक्षक शिपाई व सेवक दाखवले आहेत, त्यांपैकी अनेकजण मुस्लिम आहेत. शिवाजीमहाराजांच्या सैन्यात, विशेषत: त्यांच्या शाही अंगरक्षक दलातही मुस्लिम सैनिकांचा भरणा होता, या ऐतिहासिक सत्यास दुजोरा देणारा हा समकालीन महत्त्वाचा चित्रमय पुरावा आहे. या चित्रामुळे शिवछत्रपती म्हणजे 'सर्व जातीधर्मांच्या लोकांचा राजा' ही त्यांची प्रतिमा अधिक ठळक व्हायला मदत होते, असे म्हटल्यास ते इतिहासशास्त्राला धरूनच होईल.

या ग्रंथांतर्गत चित्रसंग्रहाच्या शेवटी शिवाजीमहाराजांनी निर्माण केलेल्या राज्याचा नकाशा दिलेला आहे. या संदर्भात एक गोष्ट आवर्जून नोंदवली पाहिजे, की संपादक मंडळाने समकालीन कागदपत्रांचे संशोधन करून महाराजांच्या राज्याचा हा नवा नकाशा तयार केला आहे. आत्तापर्यंत कर्नाटकातील मराठी राज्य नकाशात तुटक-तुटक स्वरूपात दाखवले जात असे. प्रस्तुतच्या नकाशात मात्र प्रथमच हे राज्य खानदेशातील (महाराष्ट्र) साल्हेर-मुल्हेर किल्ल्यापासून कोलेरुन नदीपर्यंत (मद्रास किनारपट्टी) सलगपणे दाखवले गेले आहे. या नव्या संशोधित नकाशावर दृष्टिक्षेप टाकला, की शिवाजीमहाराजांनी निर्माण केलेल्या राज्याची खरी व्याप्ती आणि त्यांच्या कामगिरीचे महत्त्व लक्षात येते. दक्षिणेत कोकण किनारपट्टीपासून मद्रास किनारपट्टीपर्यंत मराठ्यांचे राज्य पसरलेले होते, हे समजून घेतल्यावर महाराजांविषयीचा आदर दुणावल्याशिवाय राहणार नाही. प्रस्तुतचा नकाशा पाठ्यपुस्तक मंडळाच्या चौथीच्या पुस्तकात प्रकाशित केला होता, तो आता आम्ही वाचकांसाठी पुनर्मुद्रित करत आहोत.

***

अशा प्रकारे एकूण सात चित्रे, एक नकाशा व सोळा लेख यांचे संकलन असणारा हा शिवचरित्र साहित्य ग्रंथ शिवछत्रपतींच्या कार्यकर्तृत्वाचे विविधांगी दर्शन घडवतो. तो वाचल्यानंतर वाचकाची शिवचरित्राविषयीची गोडी अधिक वाढेल आणि तो या गोडीपोटी शिवचरित्राचे आणखी खोलात जाऊन वाचन व अभ्यास करेल, अशी आशा बाळगण्यास हरकत नसावी आणि तसे घडले, तर संपादक मंडळाने घेतलेले परिश्रम सार्थकी लागले असे म्हणता येईल.

❑❑❑





व्हॅलेंटिन या डच चित्रकाराने काढलेले चित्र.

सौजन्य : व्हॉन व्हॅलेंटिन संग्रह - हेग



ऑर्मच्या 'फ्रॅग्मेंटस्' या पुस्तकात स. १७८२ साली प्रसिद्ध झालेले शिवाजीमहाराजांचे चित्र.

सौजन्य : चित्रमय शिवाजी



शिवाजीमहाराजांचे दख्खनी शैलीतील चित्र (इ.स.१६८५).
सौजन्य : छत्रपती शिवाजीमहाराज वस्तुसंग्रहालय (प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियम), मुंबई



शिवाजीमहाराजांचे मीर मुहम्मद याने काढलेले चित्र (इ.स.१७००).

सौजन्य : म्युझे गीमे, पॅरिस



छत्रपती शिवाजीमहाराज (१७ वे शतक उत्तरार्ध).
सौजन्य : ब्रिटिश म्युझियम, लंडन



शिवाजीमहाराज व रुस्तुमे जमाँ यांच्यामधील लढाईचे चित्र. डाव्या बाजूला शिवाजीमहाराज घोड्यावर असून त्यांच्यावर अब्दागिरी धरली आहे.

सौजन्य : छत्रपती शिवाजीमहाराज वस्तुसंग्रहालय (प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियम), मुंबई.


शिवाजीमहाराजांनी स्थापन केलेले स्वराज्य
सूची
शिवाजीमहाराजांचे स्वराज्य
तंजावरचे राज्य (व्यंकोजीराजे)
परकीय सत्ता
किल्ला
भडोच
नर्मदा नदी
सुरत
तापी नदी
बऱ्हाणपूर
पूर्णा नदी
गणदेवी
रामनगर (धरमपूर)
दमण (पोर्तुगीज)
साल्हेर
कल्याण
चांदूर (चांदवड)
कारंजा
त्र्यंबक
नाशिक
वेरूळ
दौलताबाद
औरंगाबाद
रिदखेड
जालना
नरसी
वसई (पोर्तुगीज)
मुंबई (इंग्रज)
जुन्नर
पैठण
आपेगाव
चौल
चाकण
अहमदनगर
आळंदी
जंजिरा (सिद्दी)
परांडा
गोदावरी नदी
प्रतापगड
इंदापूर
सुवर्णदुर्ग
शिंगणापूर
तुळजापूर
सातारा
पंढरपूर
सज्जनगड
भा
र
गोवळकोंडा
त
भूपालगड
भीमा नदी
विशाळगड
विजयदुर्ग
पन्हाळा
मिरज
अथणी
विजापूर
संगमेश्वर
कोल्हापूर
वल्लभगड
रायबाग
जमखंडी
मुधोळ
सिंधुदुर्ग
कृष्णा नदी
सावंतवाडी
सपगाव
तोरगल
अ
गोवा (पोर्तुगीज)
बेळगाव
बेलवाडी
नवलगुंद
नरगुंद
गदग
कनकगिरी
तुंगभद्रा नदी
हुबळी
कोप्पळ
हंपी
अदोनी
कर्नूळ
आत्मकूर
श्रीशैलम
कारवार
राणीबेन्नूर
हरपनहळ्ळी
बेल्लारी
अंकोला
सोंदे
रायदुर्ग
पेन्नार नदी
बेदनूर
तुंगा नदी
होदीगेरे
चित्रदुर्ग
पेनूकोंडा
बसरूर
भद्रा नदी
कालहस्ती
तिरुपती
शिरे
चिक्कबाळापूर
पुंड्डापोलम
दोड्डबाळापूर
मद्रास (चेन्नई) (इंग्रज)
कोलार
पालार नदी
कांची
होसकोटे
वेल्लोर
अर्काट
आरणी
बंगलोर
कावेरी नदी
वणिकम्बवाडी
जिंजी
वालडोर
लक्षद्वीप बेटे (भारत)
कालिकत
पुदुच्चेरी (पाँडिचेरी) (फ्रेंच)
देवनापट्टण
कडलूर
आदटूर
तिरुवाडी
वृद्धाचलम्
भुवनगिरी
चिदंबरम
वेलोंडपुरम्
तिरुमलवाडी
कोलेरून नदी
तंजावर
तंजावरचे राज्य
कोचीन
उ.
०
१२०
किलोमीटर
श्रीलंका
हिंदी महासागर

# १. शिवराय : संस्कार आणि शिक्षण

## (कवीन्द्र परमानंदकृत संस्कृत श्रीशिवभारताच्या आधारे)

डॉ. आ. ह. साळुंखे

### १. प्रास्ताविक

शिवाजी! नावासारखे नाव. फक्त तीन अक्षरे. पण तीन शतके उलटून गेल्यावरही ही तीन अक्षरे कानांवर पडल्याबरोबर आपल्या हृदयाची स्पंदने आनंदाने आणि अभिमानाने उत्तेजित होतात! आपल्या नसानसांतून रक्ताचा प्रवाह योद्ध्यांच्या चौखूर उधळलेल्या घोड्यांप्रमाणे वेगाने आणि आवेगाने झेपावू लागतो! कोणती जादू आहे या तीन अक्षरांत? कोणते रसायन आहे या तीन अक्षरांचे? खरेतर जादू या तीन अक्षरांची नाही. ते रसायन या तीन अक्षरांचे नाही. ती जादू आहे, या तीन अक्षरांचे नाव धारण करणाऱ्या एका उज्ज्वल आणि उदात्त चरित्राची! ते रसायन आहे, एका नैतिक आणि निरामय चारित्र्याचे!! तो माणसा-माणसांना झपाटून टाकणारा प्रभाव आहे, विलक्षण सामर्थ्य आणि सुलक्षण शील यांच्या समन्वयाचा!!!

एखादा मनुष्य शेकडो वर्षे लोकांच्या काळजांवर प्रेमाने इतके भावपूर्ण अधिराज्य गाजवतो, तेव्हा ती घटना हा काही एखादा योगायोग नसतो. हे सगळेकाही आपोआप घडत नसते. आता, शिवरायांचे व्यक्तिमत्त्व जर असे कर्तृत्वाच्या अत्युच्च शिखरावर विराजमान झालेले होते, तर ते घडण्यामागे नेमके कोणते घटक कारणीभूत झाले होते, हे समजून घेणे आवश्यक आहे.

खरेतर, शिवरायांना सर्व पैलूंनिशी नीट समजून घेण्यासाठी अनेक गोष्टी समजून घेणे आवश्यक आहे. त्यांच्या काळातील भारतातील आणि विशेषत: महाराष्ट्रातील राजकीय; सामाजिक इत्यादी परिस्थिती समजून घेणे तर आवश्यक आहेच, पण शिवपूर्व काळातील परिस्थितीही समजून घेणे अनिवार्य आहे. परंतु प्रस्तुत संक्षिप्त लेखनाचा आवाका इतका व्यापक नाही. असे असले, तरी त्यांना स्वत: त्यांच्या घराण्यातून, आईवडिलांकडून कोणता वारसा मिळाला, हे समजून घेणे मात्र टाळता येण्यासारखे नाही. त्यांनी आपले चरित्र लिहिण्याचा आदेश परमानंदाला दिला, त्यामध्ये आपले विख्यात आजोबा मालोजीराजे यांच्यापासून चरित्रलेखनाला सुरुवात करण्याची सूचना होती. हे पाहता स्वत: शिवराय आपल्याला मिळालेल्या वारशाबद्दल अतिशय कृतज्ञ होते, हे उघड आहे. आपण अचानक सर्वकाही निर्माण केले, अशा भावनेचा यत्किंचितही स्पर्श त्यांच्या मनाला झालेला नव्हता. आपली कौटुंबिक परंपरा महान आहे याचा आवर्जून उल्लेख करावा, असे त्यांना वाटले, याचे कारण त्यांना त्या परंपरेचा सार्थ अभिमान होता. लोकांना आपली ही परंपराही कळली पाहिजे, असे त्यांना वाटत होते.

आता, मालोजीराजे अथवा त्यांच्या आधीचे पूर्वज यांच्याकडून शिवरायांना मिळालेला वारसा हा अप्रत्यक्ष होता, कालदृष्ट्या काहीसा दूरस्थ होता, परंतु शहाजीराजे आणि

जिजाऊ यांच्याकडून जे संस्कारधन लाभले, ते मात्र साक्षात होते, प्रत्यक्ष सहवासातून लाभले होते, त्यांच्या व्यक्तित्वाच्या समग्र स्पर्शातून मिळाले होते. परंतु येथे मनात काही प्रश्न निर्माण होतात. शहाजीराजे आणि जिजाऊ या दोघांच्या व्यक्तिमत्त्वांत खरोखरच आपल्या पुत्राला देण्यासारखे काही उत्तम, उदात्त आणि सामर्थ्यशाली-स्वातंत्र्यशाली होते काय? त्यांच्या गुणांचे केवळ निरीक्षण करूनदेखील पुत्राला प्रोत्साहक ऊर्मी मिळाव्यात, असे प्रेरक गुण त्या दोघांच्या चरित्रात होते काय? त्यांनी प्रत्यक्षरीत्या शिवरायांच्या जीवनप्रवाहाला काही दिशा दिली काय? काही वळण लावले काय? ...

या दृष्टिकोनातून परमानंदाच्या शिवभारताकडे पाहिले असता त्याने शिवरायांना लाभलेल्या परंपरेविषयी अत्यंत तपशीलवार माहिती दिल्याचे आढळते. त्याने शिवरायांना लाभलेला मालोजीराजांच्याही आधीपासूनचा वारसा सांगितला आहे. मालोजींच्या कर्तृत्वाची, पराक्रमाची, लोकोपयोगी कामांची विस्तृत माहिती दिली आहे. त्याबरोबरच, शहाजीराजे आणि जिजाऊ यांच्या व्यक्तिमत्त्वाविषयी विपुल वर्णने केली आहेत. स्वत: शिवरायांच्या गुणवत्तेचे अनेक पुरावे दिले आहेत. ...

### २. परमानंदाने रेखाटलेले शहाजीराजांचे चित्र

शिवरायांना जसा शहाजीराजांकडून मोठा वारसा मिळाला, तसाच वारसा स्वत: शहाजीराजांना त्यांचे वडील मालोजीराजे यांच्याकडून मिळाला होता. परमानंद मालोजीराजांविषयी म्हणतो,"दक्षिण दिशेला श्रीमान मालवर्मा नरेश्वर (क्षत्रिय मालोजीराजे) सूर्यवंशात जन्माला आले. ते स्वत: सूर्यासारखे तेजस्वी होते." ते महाराष्ट्रात राज्य करणारे, प्रसन्न मनाचे आणि आपले कर्तव्य पार पाडण्याच्या बाबतीत धुरंधर राजे होते. पुणे प्रांतात वास्तव्य करणाऱ्या त्यांनी भीमा नदीच्या काठी आपल्या राज्याचा विस्तार केलेला होता, असेही त्याने नोंदवले आहे. ते समृद्ध, बुद्धिमान आणि यशस्वी असल्याचेही वर्णन त्याने केले आहे. तसेच त्यांच्या पराक्रमाचीही विस्तृत वर्णने केली आहेत. त्यांना स्वत:लाही वडिलार्जित राज्य मिळाले होते, हा परमानंदाने केलेला उल्लेख पाहता शहाजीराजांना मालोजीराजांच्याही आधीपासूनचाच एक अतिशय समृद्ध वारसा मिळाला होता, हे स्पष्ट होते.

दु:खाची गोष्ट अशी, की शहाजीराजे पाच वर्षांचेच असताना मालोजीराजांचे एका युद्धात निधन झाले. मालोजींच्या मृत्यूनंतर त्यांचे बंधू विठोजी यांनी शहाजी आणि त्यांचे बंधू शरीफजी यांच्या नावाने राज्य चालवून त्याला स्थैर्य दिले. मालोजींच्या मृत्यूमुळे निजामशहालाही आपल्या सेनेचे पंख तुटल्यासारखे वाटू लागले. मग त्याने शहाजी आणि शरीफजी यांना बोलावून घेतले. त्यांचे सांत्वन केले. तसेच, त्यांच्या पित्याचे जे वैभव होते, म्हणजेच राज्याचे जे अधिकार होते, ते त्यांच्याकडे सोपवले. शहाजीराजांना मिळालेला वारसा हा असा होता.

यानंतर आपण प्रत्यक्ष शहाजीराजांचे व्यक्तित्व कसे होते, ते पाहणार आहोत. परमानंदाने वर्णिलेल्या त्यांच्या गुणांची आधी फक्त नोंद करून घ्यायची आणि मग त्या गुणांचे काही विवेचन करायचे, असे योजले आहे.

निजामशहाने या दोघा भावांना पितृवैभव दिल्यानंतर दोघांपैकी शहाजींना राजा ही पदवी प्राप्त झाली, असे परमानंद म्हणतो. ते ज्येष्ठ असल्यामुळे हे स्वाभाविक होते. शरीफजींचा भाऊ प्रशस्त लक्षणांनी युक्त होता, तो सर्व संपत्तींचे निवासस्थान होता, आता त्याच्याबाबतीत 'राजा' हा शब्द शोभून दिसू लागला, असे परमानंद म्हणतो. याचा अर्थ लहानपणापासूनच शहाजी हे 'राजे' म्हटले जाऊ लागले. ते लहान असल्यापासूनच सरदार लोक त्यांना अभिवादन करू लागल्याचेही परमानंदाने म्हटले आहे. त्यांचे कोणते गुण पाहून यादवराजांनी आपली मुलगी जिजू (जिजाऊ) त्यांना देण्याचा निर्णय घेतला, ते सांगताना परमानंद म्हणतो, ''मालोजीराजांचे पुत्र शहाजी हे वरासाठी आवश्यक असलेल्या लक्षणांनी युक्त होते. (किंवा उत्तम लक्षणांनी युक्त होते.) ते दानवीर, दयावीर, युद्धवीर आणि महान ओजस्वी होते.'' शहाजी प्रत्येक युद्धात विजयी होतात, अशीही त्यांची ख्याती पसरली होती. शहाजी वयाने लहान होते, तोपर्यंत त्यांचे चुलते विठोजी हे त्यांच्या नावाने राज्य चालवत होते. विठोजींच्या मृत्यूनंतर शहाजींनी राज्यकारभाराची जबाबदारी आपल्या अंगावर घेतली, हे सांगताना परमानंद म्हणतो, ''त्यानंतर आपले चुलते विठ्ठलराज (विठोजी) हेही निधन पावल्यावर राजनीतीचे विधी जाणणाऱ्या, आईचा शब्द मानणाऱ्या, महावीर, धैर्यशील, बुद्धिमान अशा शहाजीराजांनी राज्याची मोठी जबाबदारी आपल्या बाहूंवर धारण केली.''

परमानंदाने शिवभारतात वेळोवेळी शहाजीराजांच्या व्यक्तित्वाचे अनेक पैलू स्पष्ट केले आहेत. एका प्रसंगात त्याने त्यांचे इंगितज्ञ, सुधी (उत्तम बुद्धिमत्ता असलेले), पटू, आत्मप्रतापी, विविध प्रकारच्या विजयश्रींचे निवासस्थान, मोठे चिलखत धारण करणारे, महोत्साही, मानी आणि गरुडाप्रमाणे शक्ती असलेले, असे वर्णन केले आहे. शहाजी जेव्हा काही कारणाने निजामशाही सोडून आपल्या जहागिरीत परत आले, तेव्हा निजामशाही किती निस्तेज झाली, त्याचे वर्णन करताना परमानंदाने म्हटले आहे, ''सूर्याच्या अभावी ज्याप्रमाणे आकाश निस्तेज होते, त्याप्रमाणे त्यांच्याविना निजामाचे समृद्ध राज्यही निस्तेज झाले.''

त्यानंतर इब्राहीम आदिलशहाने महाबाहू, महोत्साही आणि महाशय (मोठ्या मनाचे) अशा त्यांना आपल्या मदतीसाठी आपल्याकडे वळवून घेतले. त्यांच्या पराक्रमामुळे त्याचा इतका उत्कर्ष झाला, की त्याने संतुष्ट होऊन आपले अर्धपद शहाजीराजांना दिले असे मला वाटते, असे उद्गार परमानंदाने काढले आहेत. शहाजीराजांनी उग्र अशा अनेक राजांना जिंकून आदिलशहाची भरभराट घडवून आणली, हे सांगताना परमानंदाने शहाजींच्या राजनीतीचा गौरव केला आहे. शहाजीराजांचे वर्णन करताना त्याने एके ठिकाणी म्हटले आहे, ''मालवर्मा यांचा पुत्र, राजांमध्ये उत्तम, महाराज, ज्याने पराक्रम करून दाखवला आहे असा, सुलक्षणी, वाऱ्याप्रमाणे वेगवान, सूर्याप्रमाणे तेजस्वी, सर्व प्रकारे विजयी, पुण्यात्मा आणि महान विक्रम केलेला असा दाक्षिणात्य शाहवर्मा (क्षत्रिय शहाजी) वावरत आहे.''

शहाजीराजे दर्याखानाबरोबर लढण्यासाठी गेले, हे सांगतानाही परमानंदाने त्यांचा

'महाराज', म्हणून उल्लेख केला आहे. शहाजीराजांच्या पराक्रमांची जी अनेक वर्णने परमानंदाने केली आहेत, त्यांपैकी एका वर्णनात त्याने पुढील तपशील नोंदवला आहे, ''शहाजींनी निजामशहाचे शिवनेरी वगैरे गड आपल्या सामर्थ्याच्या जोरावर जिंकून घेतले; तसेच गोदावरी, प्रवरा, नीरा, भीमा यांच्या काठचा प्रदेश जिंकून सह्याद्री आपल्या ताब्यात आणला. त्यामुळे महाराष्ट्रातील अनेक राजे त्यांना येऊन मिळाले आणि शहाजींनी त्यांना आपले सेनापती बनवले.''

शहाजींनी शहाजहान आणि आदिलशहा यांच्याबरोबर तीन वर्षे युद्‌ध केले, हे सांगताना परमानंदाने त्यांना 'सहस्रकरविक्रम' (हजारो किरण असलेल्या सूर्याप्रमाणे विक्रमी) असे विशेषण लावले आहे. आपल्या वडिलांनी शहाजीराजांवर किती प्रेम केले, ते सांगताना महंमद आदिलशहाने एकदा म्हटले आहे, ''इब्राहीमशहांनी या महामानी आणि महाबाहू अशा शहाजीराजावर माझ्यापेक्षा अधिक प्रेम करून त्याला वृद्‌धिंगत केले.'' महंमद आदिलशहाच्या दृष्टीने शहाजीराजांचा आधार मिळणे किती महत्त्वाचे होते, हे नोंदवताना परमानंद म्हणतो, ''त्यानंतर 'अवलंब-द' (आधार देणाऱ्या) शहाजीराजांचा आधार मिळाल्यामुळे महंमदाला पावलोपावली मोठा आनंद मिळू लागला.'' त्याच संदर्भात शहाजीराजांचे वर्णन करताना त्यांच्यासाठी 'बली' आणि 'महाराज' अशी विशेषणे लावण्यात आली आहेत. महंमद आदिलशहाने त्यांना कर्नाटक जिकण्यासाठी पाठवल्यानंतर तिकडच्या असंख्य राजांना शहाजींनी जिंकल्याचे वर्णन परमानंदाने केले आहे. त्यांनी विलक्षण पराक्रम करून अत्यंत सुंदर असे बंगळुरू शहर जिंकले, तेव्हा रणदुल्लाखानाने ते भेट म्हणून त्यांना देऊन टाकले आणि मग विजयी शहाजीराजे त्या नगरामध्ये राहू लागले, असे परमानंदाने नोंदवले आहे.

शहाजीराजांनी शिवरायांना पुण्याकडे पाठवले, तेव्हा शहाजीराजांचे द्रष्टेपण कसे व्यक्त झाले, ते सांगताना परमानंदाने त्यांना 'अर्कद्युतिमत्' (सूर्याच्या तेजासारख्या तेजाने युक्त) आणि 'अर्कज्ञ' (सूर्याला जाणणारे, म्हणजे द्रष्टे) ही विशेषणे लावली आहेत. शिवरायांना पुण्याकडे पाठवून दिल्यानंतर शहाजीराजांनी सर्व कर्नाटक प्रदेश कसा जिंकला, ते सांगताना परमानंद म्हणतो, ''शहाजींनी षाड्गुण्याचा प्रयोग करून आणि विविध प्रकारच्या सल्लामसलतींच्या जोरावर संपूर्ण कर्नाटक प्रदेश आपल्या नियंत्रणाखाली आणला.'' शिवाय, तिकडचे इतर राजेही त्यांच्या सल्ल्याने वागत असल्याचे परमानंदाने नोंदवले आहे. त्यामुळे शहाजीराजांचा प्रभाव कसा वाढला, हे सांगताना परमानंद म्हणतो, ''त्या त्या प्रसंगी योग्य ठरेल अशा सल्लामसलतीचा प्रयोग करणाऱ्या बुद्‌धिमान शहाजींच्या प्रभावामुळे खूप लोकांनी यवनांपासून निर्माण झालेले भय टाकून दिले.''

एका लढाईत ते बाजी घोरपड्यावर चालून गेले, तेव्हा त्यांचे रूप व आवेश यांचे वर्णन परमानंदाने पुढीलप्रमाणे केले आहे, ''महाबाहू, महाराज, महायोद्‌धे शहाजीराजे यांनी आपले शिरस्त्राण पक्के बांधले होते. फेट्याचा शेंबला सोडलेला होता. त्यांच्या एका हातात ढाल होती. त्यांनी चिलखत घातले होते. ते उंचेपुरे होते. ते श्रेष्ठ धनुर्धर

होते. भाल्याने युद्ध करण्यात तरबेज होते. पट्टा चालवण्यात पारंगत होते.'' बाजी घोरपडेबरोबरच्या युद्धात बाजीने केलेल्या भाल्याच्या प्रहाराचा शहाजीराजांवर काहीच परिणाम झाला नाही, याचे वर्णन करताना परमानंद म्हणतो, ''युद्धविद्येत कुशल असलेले आणि वज्रदेखील घुसू शकणार नाही असे शरीर असलेले शहाजीराजे भाल्याच्या त्या आघाताने व्याकूळ झाले नाहीत.'' त्याच युद्धातील शहाजीराजांचे वर्णन करताना परमानंदाने 'जणू काही लोकांचे सर्वस्व आणि सर्वांचेच उत्तम आश्रयस्थान' असे त्यांच्याविषयी म्हटले आहे. तेराव्या अध्यायात उल्लेख करताना त्यांच्यासाठी परमानंदाने अनेकदा 'महाराज' ही पदवी वापरली आहे.

शहाजीराजांना अटक केल्यानंतरही महंमद आदिलशहाच्या मनात शहाजीराजांचा धाक होता, हे त्याच्या मनात त्याप्रसंगी घोळत असलेल्या विचारांवरून स्पष्ट होते. त्याने त्यांचे वर्णन करताना 'कुलीन', 'गुणाग्रणी', 'महाराज' इत्यादी विशेषणे लावली आहेत. त्यांना 'मानार्ह' (सन्मानास पात्र) मानले आहे. आदिलशहा त्यांची मनधरणी करत असताना त्यांनी त्याला स्मितार्धाने उत्तर दिले, हे सांगून परमानंदाने खूप काही सूचित केले आहे. हे सूचित केल्यानंतर शहाजीराजांना 'महाबुद्धी' असे विशेषण लावले आहे. कैदेतून सुटल्यानंतर त्यांचे वर्णन करताना परमानंदाने त्यांच्याविषयी 'सर्व लोकांचा बन्धू' असे म्हटले आहे.

शिवरायांनी त्यांचे वर्णन करताना 'जाणकारांच्या अगदी अग्रस्थानी असलेले', 'महान राजनीतीचे जाणकार', असे शब्द वापरले आहेत. शिवरायांचा मंत्री सोनोपंत याने शहाजीराजांचा उल्लेख करताना 'प्रभावी महाराज' असे शब्द वापरले आहेत.

**शहाजीराजांच्या या गुणांचे काही विवेचन :** परमानंदाने आपल्या ग्रंथात जागोजागी शहाजीराजांचे हे जे वर्णन केले आहे, त्यावरून त्यांची एक अतिशय उज्ज्वल आणि प्रभावी प्रतिमा आपल्यासमोर उभी राहते. परमानंदाने त्यांच्यासाठी वापरलेली काही विशेषणे आदरापोटी लावलेली असतील, हे खरे आहे. ... तथापि त्याची सर्वच वर्णने आदरापोटी, कविकल्पित वा अतिशयोक्त नाहीत. शहाजीराजांनी केलेली कर्तबगारी व मिळवलेले विजय नि:संदिग्धपणे इतिहासाच्या पानांवर नोंदवले गेले आहेत. ते विजयच या वर्णनातील बहुसंख्य विशेषणांना सार्थ ठरवतात. ... खरेतर, शहाजीराजांचे आयुष्यभराचे पराक्रम पाहता परमानंदाने त्यांना लावलेली विशेषणेच अपुरी आणि थिटी आहेत! ... शहाजीराजे प्रत्यक्ष राज्याभिषेकाद्वारे राजसिंहासनावर बसले नव्हते, इतकेच काय ते न्यून होते. बाकी ते स्वतंत्र, सार्वभौम अधिपती असल्याप्रमाणे 'महाराज' म्हणून वावरत होते, हा इतिहास आहे. अनेक शाह्यांना त्यांनी कितीतरी वेळा आपल्या तालावर नाचवले आहे आणि म्हणून परमानंद जेव्हा त्यांचा निर्देश करण्यासाठी पुन:पुन्हा 'महाराज' हा शब्द वापरतो, तेव्हा तो शब्द त्यांना यथार्थपणे लागू पडतो, यात शंका नाही...

वस्तुत: परमानंदाने केलेले वर्णन स्वयंस्पष्ट असल्यामुळे त्याच्या विवेचनाची तशी आवश्यकता नाही, तरीदेखील शहाजीराजांच्या व्यक्तित्वाची ठळक वैशिष्ट्ये सहजपणे

व स्वतंत्रपणे लक्षात यावीत, म्हणून येथे त्यांचे काही विवेचन करत आहे.

**वारसा :** शहाजीराजांना केवळ आपल्या वडिलांपासूनच नव्हे, तर त्यांच्या आधीच्या पिढ्यांपासूनही राजेपणाचा समृद्ध वारसा लाभला होता. परमानंदाने ही बाब 'कुलक्रमागत' या शब्दाने व्यक्त केली आहे. त्यामुळेच वडिलांच्या मृत्यूनंतर अगदी लहान वयात शहाजींना 'राजा' ही पदवी प्राप्त झाली. परमानंदाने त्यांना सातत्याने राजा म्हणून तर सादर केले आहेच, पण त्याने त्यांचा निर्देश करताना वारंवार 'महाराज' हा शब्दही वापरला आहे, हे आपण पाहिले आहेच. हे सर्व पाहता शहाजीराजांनी आपल्या वाडवडिलांकडून मोठा वारसा घेतला आणि तो अधिक झळझळीत बनवला, हे स्पष्ट आहे.

**शरीरसामर्थ्य :** ... शहाजीराजे स्वत: आघाडीवर राहून लढाया जिंकत असत. अशा व्यक्तीकडे कमावलेले शरीर असणे, हा प्राथमिक गरजेचा भाग होता. शहाजींनी असे शरीर कमावलेले होते, म्हणूनच परमानंदाने त्यांना 'बली' (बलवान), 'अतुलबल', महाबाहू' इत्यादी प्रकारची विशेषणे सार्थपणे लावली आहेत. त्यांच्याकडे गरुडासारखी शक्ती असल्याचेही म्हटले आहे. याचा अर्थ शत्रूवर वेगाने झडप घालण्याइतके सामर्थ्य आणि चपळाई त्यांच्या शरीरयष्टीमध्ये होती. ते उंचेपुरे होते. जणूकाही वज्रही घुसू शकणार नाही, इतका मजबूत आणि भक्कम देह त्यांना प्राप्त झालेली उज्ज्वल व्यक्तिमत्त्वाची निदर्शक आहेत. आदिलशहालाही ते 'आधार देणारे' वाटत, यात खूप काही आले आहे.

**महान योद्धे :** त्यांनी आयुष्यभर कितीतरी युद्धे जिंकली. महाराष्ट्रापासून कर्नाटक, केरळ, तमिळनाडू इत्यादी प्रदेशांपर्यंत अनेक राजांना पुन:पुन्हा जिंकले. त्यासाठी आवश्यक असलेले विलक्षण युद्धकौशल्य त्यांच्याकडे होते. पटू, प्रतापी इत्यादी विशेषणांतून परमानंदाने योद्ध्यासाठी आवश्यक असलेली उच्च प्रतीची गुणवत्ता त्यांच्याकडे असल्याचे स्पष्ट केले आहे. उत्साही व महोत्साही ही विशेषणे त्यांच्या गुणवत्तेला चैतन्याची आणि क्रियाशीलतेची जोड असल्याचे दर्शवितात. त्यांच्या ठिकाणी असलेला स्वाभिमान त्यांच्या अंत:करणातील स्वातंत्र्याची उत्कट आकांक्षा प्रकट करणारा आहे.

योद्ध्यासाठी आणखी एका गोष्टीची आवश्यकता असते. ती म्हणजे त्याने शस्त्रास्त्रांचे उत्तम प्रशिक्षण घेतलेले असावे लागते. शहाजीराजे उत्तम धनुर्धर होते. तलवार आणि पट्टा चालवण्यामध्ये पटाईत होते. त्यांना भाला उत्तम रीतीने चालवता येत असे. त्याबरोबरच शिरस्त्राण, चिलखत इत्यादींचा काळजीपूर्वक वापर करून आत्मसंरक्षण करण्याची खबरदारी ते घेत असत. याचा अर्थ ते धैर्यशील आणि साहसी असले, तरी बेदरकार, निष्काळजी वा दुस्साहसी मात्र नव्हते... .

**श्रेष्ठ राजनीतिज्ञ :** ... दीर्घकाळ टिकणारे यश मिळवण्यसाठी वर उल्लेखलेल्या गुणांबरोबरच विलक्षण बौद्धिक क्षमताही असावी लागते. अशी क्षमता त्यांच्याकडे होती. ते 'धीमान्' होते. एवढेच नव्हे, तर 'सुधी', 'महाबुद्धी', 'महामती' होते. ते राजनीतीचे अत्यंत श्रेष्ठ जाणकार असल्याचे अनेक उल्लेख आले आहेत. ते स्वत:

विश्वासू व्यक्तींचा सल्ला घेत असत आणि इतर राजेही त्यांचा सल्ला घेत असत. आपलेच म्हणणे रेटणे वा इतरांवर लादणे, परिस्थिती नीट समजावून न घेता मनाला वाटेल तसे लहरी निर्णय घेणे, मित्रांचा व हितचिंतकांचा सल्ला न जुमानता उद्दामपणे कृती करणे, हे राजाला घातक असते. शहाजीराजांनी या प्रकारचा स्वैरपणा टाळला होता. यातच त्यांचे राजकीय शहाणपण दिसते....

**संपूर्ण दक्षिण भारतात दरारा :** शहाजीराजांच्या कर्तृत्वाला काही मर्यादा नव्हत्या, असे नाही. त्यांना काही वेळा तह करावे लागले. पक्ष बदलावे लागले. एकदा तर पराभूत होऊन कैदेतही जावे लागले आणि मुख्य म्हणजे खऱ्या अर्थाने पूर्णपणे स्वतंत्र असे स्वराज्य- स्वत:चे राज्य, स्थापन करता आले नाही, पण या मर्यादा त्यांच्या उत्तुंग कर्तबगारीला डाग मात्र लावू शकत नाहीत. त्यांनी मिळवलेले यश किती प्रतिकूल परिस्थितीने घेरलेल्या अवस्थेत मिळवले, ते पाहिले पाहिजे. वयाला पाच वर्षे होतात न होतात तोवर वडील वारले. वारसारूपाने वडिलांचे राज्य मिळाले, तरी त्यांच्याकडून प्रत्यक्ष प्रशिक्षण, संस्कार मिळू शकले नाहीत. शत्रू अनेक होते. त्यांपैकी काहींची शक्ती अक्राळविक्राळ होती. अशाही स्थितीत त्यांनी संपूर्ण दक्षिण भारतात आपला एक दरारा निर्माण केला होता. शिवरायांनी पुढे स्वराज्य स्थापन केले, तेव्हा वडिलांचा हा दरारा त्यांच्या पाठीशी होता. याचा अर्थ शहाजीराजांनी एकीकडून स्वराज्याची पार्श्वभूमीही तयार केली आणि प्रत्यक्ष स्वराज्य स्थापन करणाऱ्या आपल्या पुत्राभोवती अदृश्य स्वरूपात एक संरक्षक कवचही उभे केले. हे यश देदीप्यमानच आहे. त्यांच्या या योगदानाची उपेक्षा करणे, हा कृतघ्नपणाही ठरेल आणि इतिहासाच्या आकलनाचा अभावही ठरेल!

परमानंदाने रेखाटलेले शहाजीराजांचे व्यक्तिमत्त्व आपण पाहिले. ... आता जिजाऊंकडे कोणती गुणसंपदा होती, त्याचे काही विवेचन करूया.

### ३. जिजाऊंचे महान व्यक्तिमत्त्व

परमानंदाने जिजाऊंचे जे व्यक्तिमत्त्व रेखाटले आहे, ते अक्षरश: विविधांगी होते. मुलगी, पत्नी, सून, आई इत्यादी अंगांनी तर त्यांचे व्यक्तिमत्त्व गुणसंपन्न होतेच, पण माहेरी आणि सासरी सदैव अनुभवाला येणाऱ्या युद्धाच्या वातावरणात वावरल्यामुळे त्यांच्याकडे उच्च कोटीची राजनीतीची जाण होती; एवढेच नव्हे तर प्रत्यक्ष रणांगणावर जाऊन शत्रूशी लढण्यासाठी आवश्यक असलेली शस्त्रास्त्रे चालवण्याचे प्रावीण्य आणि मनोधैर्य त्यांच्याकडे होते. त्यांच्या या गुणसंपदेचा संक्षिप्त आढावा येथे घेऊया.

**कुलीनता :** शहाजीराजांना जसा कुलक्रमाने महान वारसा लाभला होता, तसाच महान कुलाचा वारसा जिजाऊंना लाभला होता. त्यांच्या विवाहाचे वर्णन करताना परमानंदाने त्यांच्याविषयी 'कुलकन्या कुले धन्या' असे उद्गार काढले आहेत. 'महितान्वया' म्हणजे आदरणीय कुळात जन्मलेली, माहेर आणि सासर अशा दोन्ही अन्वयांमध्ये म्हणजेच कुलांमध्ये मान्यताप्राप्त कुलस्त्री, कुलदेवता असेही त्यांचे उल्लेख करण्यात आले आहेत. त्यांचे रूपही त्यांच्या कुलीनतेला व दोन्ही राजघराण्यांना साजेसे होते.





त्यांच्या रूपाचे बरेचसे वर्णन करताना परमानंदाने संस्कृत महाकाव्यांचे अनुकरण करण्याचा प्रयत्न केला आहे. असे असले, तरी जिजाऊंचे रूप शहाजीराजांची आवडती राणी म्हणून शोभण्यासारखे होते, हे त्याच्या वर्णनातून स्पष्ट होते.

**शील :** त्यांच्या शीलाचे वर्णन परमानंदाने अनेक प्रकारे केले आहे. त्या आपल्या शीलाचे संरक्षण करण्याच्या बाबतीत सज्ज होत्या, असे त्याने म्हटले आहे. त्यांची शालीनता व्यक्त करताना 'जणूकाही मूर्तिमंत लज्जा' असे प्रशंसोद्गार त्याने काढले आहेत. साध्वी स्त्रियांना जीवनाची वाटचाल करताना आपली मर्यादा कळावी, असे मार्गदर्शन जिजाऊंच्या वर्तनातून होत असे, असे त्याने म्हटले आहे. असे मार्गदर्शन करण्यासाठी आवश्यक ती शीलसंपन्नता त्यांच्याकडे होती, हे त्याने त्यांच्यासाठी वापरलेल्या 'महासाध्वी' या विशेषणावरून स्पष्ट होते.

**इतर विविध गुण :** त्या आपल्या सासूबाईंची सेवा करण्यात तत्पर होत्या. जिजाऊ आणि शरीफजींच्या पत्नी दुर्गा या दोघी आपल्या सासूबाई उमा यांची दररोज सेवा करत असत. त्या 'प्रश्रयसंश्रया' म्हणजेच विनयी होत्या. शिवरायांविषयी त्यांच्या अंत:करणातून अतिशय उत्कट वात्सल्यरस ओसंडत होता, हे स्वयंस्पष्टच आहे. त्यांचे बोलणे सत्य आणि गंभीर होते, हे त्यांचे आणखी एक वैशिष्ट्य होय. तात्पर्य, त्या 'निरवधिकगुणा' म्हणजेच अमर्याद गुणांनी युक्त होत्या, हे परमानंदाचे उद्‌गार सार्थ आहेत.

**विजयाच्या प्रेरिका :** यादवराजांनी शहाजीराजांशी त्यांचा विवाह घडवून आणला, तेव्हा त्यांच्याकडे असलेल्या गुणसंपदेचे वर्णन करताना परमानंदाने 'विजयलक्षणा' असे विशेषण वापरले आहे. 'लक्षण' म्हणजे चिन्ह, वैशिष्ट्य, द्योतक. याचा अर्थ जिजाऊंचे व्यक्तिमत्त्व प्रशिक्षणाने असे तयार झाले होते, की त्या विजयाच्या द्योतक बनल्या होत्या. हे पायगुणाच्या परंपरागत श्रद्धेचे सूचक नाही, तर त्यांच्या सिद्धतेचे, तयारीचे दर्शक आहे. परमानंदाने पुढे एकदा त्यांना 'विजयवर्धिनी' म्हटले आहे, यावरून हे स्पष्ट होते. त्या पती आणि पुत्र या दोघांच्या विजयांना बळ देणाऱ्या प्रेरिका होत्या, हे या वर्णनातून स्पष्टपणे व्यक्त होते.

**डोहाळे :** शिवराय उदरात असताना जिजाऊंना लागलेले डोहाळे, हा याचा सबळ पुरावा आहे. या डोहाळ्यांचे परमानंदाने केलेले वर्णन अनेक दृष्टींनी महत्त्वाचे आहे. परमानंद म्हणतो, "त्यांना दिवसेंदिवस पुढील प्रकारचे डोहाळे लागले. पर्वतांवर चढून जावे, हत्तींच्या पाठीवर बसावे. वाघांच्या पाठीवर बसावे. सोन्याच्या सिंहासनावर स्थिरपणाने आसीन व्हावे. डोक्यावर शुभ्र छत्र धरले जावे. ध्वज उंच फडकवावा. सुंदर चवऱ्या ढाळल्या जाण्याची व्यवस्था करावी. नगाऱ्यांचा आवाज ऐकावा. युद्धकर्मे करावी. धनुष्यबाण, 'शक्ति' नावाचे शस्त्र, खड्ग, चिलखत ही युद्धसाधने धारण करावीत. किल्ले जिंकून घ्यावेत. विजयश्री प्राप्त करावी. मोठमोठी दाने देण्यात आनंद मानावा. धर्माची (नीतिमूल्यांवर आधारित) स्थापना करण्याचे मनात आणावे."



जिजाऊंच्या डोहाळ्यांचे हे वर्णन वाचल्यानंतर ती काव्यात्मक अतिशयोक्ती आहे, असे कदाचित कोणाला वाटेल, पण त्यांच्यावर माहेरी लहानपणापासून झालेले संस्कार, लहान वयातच घरात आणि आजूबाजूला सदैव अनुभवलेले युद्धाचे वातावरण, शस्त्र हाताळण्याचे मिळालेले प्रशिक्षण, सासरी आल्यानंतर शहाजीराजांची चाललेली सततची युद्धे हे सर्व पाहता त्यांचे अवघे चिंतन युद्धमय झाले असेल आणि स्वराज्यस्थापनेच्या स्वप्नाने भारावून गेले असेल, हे अगदी मानसशास्त्रीयदृष्ट्याही पूर्णपणे वास्तव म्हटले पाहिजे. स्वाभाविकच, त्यांचे हे चिंतन डोहाळ्यांच्या रूपाने प्रकट झाले. ...

**कालचक्राला नवी दिशा :** जिजाऊंचे हे डोहाळे शिवरायांच्या लहानपणी जिजाऊंनी त्यांच्यावर केलेल्या संस्कारात उतरले, यात शंका नाही. त्यांच्या डोहाळ्यांतून त्यांच्या अंतर्यामीची स्वराज्याबद्दलची, स्वातंत्र्याबद्दलची मधुर स्वप्ने व्यक्त झाली होती. त्यांनी शिवरायांच्या मनात-अंतर्मनात या स्वप्नांच्या बीजांची पेरणी केली. युद्धे जिंकण्याची, ध्वज फडकावण्याची, सिंहासनावर आसीन होण्याची, छत्रपती बनण्याची स्वप्ने शिवरायांच्या मनात तरारून वाढली आणि आपले अवघे अस्तित्व झोकून देऊन त्यांनी ती साकारही केली. ज्या आईचे डोहाळे स्वातंत्र्याचे, त्या आईच्या पुत्राचा झेंडा फडकणार तोही स्वातंत्र्याचाच! जिजाऊंचे हे डोहाळे म्हणजे थोड्याच काळात घडणाऱ्या क्रांतिकारक युगप्रवर्तनाची चाहूल होती, ती कालचक्राला दिली जाणारी एक नवी दिशा होती, ती एक अपूर्व गती असणार होती. हे डोहाळे आपल्या समाजातील हजारो युवकांना समर्पणासाठी सज्ज करणारे होते आणि त्या समर्पणातून सर्वसामान्य जनतेच्या उरांवरची दडपणे आणि श्वासोच्छ्वासांवरची नियंत्रणे दूर होणार होती.

डोहाळ्यांचे हे वर्णन म्हणजे परमानंदाची केवळ कविकल्पना नाही किंवा ते जिजाऊंचे फसव्या मृगजळामागे धावणेही नाही, हे सिद्ध करणारा एक अत्यंत महत्त्वाचा पुरावा आहे. तो म्हणजे, शिवराय पन्हाळ्याच्या किल्ल्यात अडकून पडले असताना, जिजाऊंनी उचललेली पावले आणि उच्चारलेली भाषा हा होय.

**स्वत: युद्धावर जाऊन शत्रूला जिंकण्याची धमक :** एकीकडे शाहिस्तेखानाचे त्सुनामीसारखे आलेले विध्वंसकारी आक्रमण आणि दुसरीकडे शिवाजीराजे पन्हाळगडावर जोहराशी लढण्यात गुंतलेले, अशी स्थिती असताना जिजाऊंनी कोणते पाऊल उचलले, ते नोंदवताना परमानंद म्हणतो, ''यादवराजाची कन्या असलेली शहाजीराजांची महाव्रता पत्नी युद्धरस अनुभवण्यासाठी उत्साहित होऊन लढायला सज्ज झाली. त्यावेळी शिवरायांची ती माता राजगडावर वास्तव्य करून होती. आपल्या गिरिदुर्गांचे रक्षण करण्यासाठी ती दक्ष झाली.''

मोगलांचे आक्रमण झाले, तेव्हा ते थोपवण्यासाठी अथवा अन्य डावपेचांद्वारे त्यावर मात करण्यासाठी स्वत: शिवाजीराजे राजगडावर उपस्थित नव्हते. त्यामुळे ती जबाबदारी जिजाऊंनी स्वत:च्या अंगावर घेतली. गिरिदुर्ग म्हणजे डोंगरी किल्ले हे युद्धतंत्राच्या दृष्टीने इतर सर्व प्रकारच्या किल्ल्यांपेक्षा अधिक महत्त्वाचे मानले जातात. शिवकाळात तर अगदी स्पष्टपणे ही स्थिती होती. जिजाऊंनी स्वराज्यातील गिरिदुर्गांचे

रक्षण करण्याकडे लक्ष दिले. किल्ल्यांच्या रक्षणाची तजवीज करणे ही सोपी गोष्ट नसते. किल्लेदार, इतर अधिकारी, सैनिक या सर्वांना मार्गदर्शन करावे लागते. शत्रूने किल्ल्याला वेढा दिला, तर किल्ला दीर्घकाळ झुंजवता यावा म्हणून किल्ल्यावर अन्नधान्य वगैरे आवश्यक वस्तूंचा योग्य तो साठा करावा लागतो. शत्रूचा हल्ला आल्यास योग्य ती व्यूहरचना करावी लागते. शत्रूच्या हालचाली जाणण्यासाठी विश्वासू हेर पाठवतानाच आपल्या बाजूच्या कोणी फितुरी करू नये याची खबरदारी घ्यावी लागते. हे सगळे जिजाऊ करू लागल्या, हे उघड आहे. याचा अर्थ या क्षेत्रातील प्रसंगोचित निर्णय घेण्याची क्षमता त्यांच्याकडे होती.

जिजाऊंपुढे प्रस्तुत संदर्भात ज्या दोन जबाबदाऱ्या होत्या, त्यांपैकी गिरिदुर्गांच्या रक्षणाची जबाबदारी तर त्यांनी पार पाडली, पण मुख्य जबाबदारी वेगळीच होती. शिवाजीराजांना पन्हाळ्याच्या वेढ्यातून सोडवून आणणे आवश्यक होते. ही मातृहृदयाची उत्कट ओढ तर होतीच, पण स्वराज्याच्या यथार्थ रक्षणासाठी देखील ही बाब फार फार महत्त्वाची होती. त्यासाठी जिजाऊंनी नेताजींजवळ कोणता निर्धार बोलून दाखवला, ते परमानंदाने विस्ताराने नोंदवले आहे. राजमाता म्हणाल्या, ''युद्धासाठी उत्साह धारण करणाऱ्या माझ्या त्या लाडक्या बहिश्चर प्राणाला (शिवाजीराजांना) शत्रूंनी पन्हाळगडावर सर्व बाजूंनी अडकवून ठेवले आहे. ... माझ्या त्या बाळाला स्वत: सोडवून आणण्यासाठी मी प्रयत्न करणार आहे. मी आज युद्धामध्ये जोहराचे मस्तक छाटून आणीन. ज्याच्याविना ही दिशा मला एखाद्या ओसाड अरण्यासारखी वाटत आहे, त्या स्वाभिमानी सिंहासारख्या माझ्या बाळाला मी ताबडतोब घेऊन येईन... तुम्ही येथे एकत्रितपणे शत्रूंबरोबर युद्ध करा. मी स्वत: शत्रू असलेल्या त्या जोहराबरोबर युद्ध करीन.''

त्यांना युद्धावर प्रत्यक्ष जावे लागले नाही, ही गोष्ट वेगळी, पण जाण्याची त्यांची मानसिक तयारी होती. लढाऊ वृत्ती होती. त्यांच्याकडे युद्धामध्ये रस घेण्याचा उत्साह होता, याचा अर्थ त्यांना युद्धाचे दडपण वाटत नव्हते. त्यांचे मन निर्भय होते. जोहराचे मस्तक छाटून आणण्याची भाषा एकीकडून त्यांचा आत्मविश्वास दाखवते, तर दुसरीकडून त्यांनी खड्ग वगैरेंसारखी शस्त्रे चालवण्याचे कौशल्य आत्मसात केले होते, त्यांना माहेरीच त्याप्रकारचे प्रशिक्षण प्राप्त झाले होते आणि सासरी ते वृद्धिंगत झाले होते, असे ठामपणे म्हणता येते.

महत्त्वाची गोष्ट म्हणजे या सर्व गुणांचे संस्कार त्यांनी शिवरायांवर केले होते, यात शंका नाही. त्यांनी आपल्या ठायी असलेले शील, सत्यप्रियता, वाक्चातुर्य, गांभीर्य, दक्षता, जागृती, मनोधैर्य, निर्भयता, शस्त्रप्रयोग, विजयाकांक्षा, स्वराज्यस्वप्न इत्यादी प्रकारच्या सर्व गुणांची संपदा शिवरायांच्या व्यक्तित्वात जाणीवपूर्वक संक्रांत केली!

**जिजूः जागर्ति जगतीतले :** जिजाऊ किती सावधपणे शहाजीराजे आणि शिवराय यांना प्रेरणा देत राहिल्या, ते परमानंदाने देवीच्या तोंडचे उद्गार नोंदवण्याचे निमित्त करून शब्दबद्ध केले आहे. ''शहाजीराजांची पत्नी जिजू पृथ्वीतलावर जागृत आहे,''

हेच ते उद्‌गार. त्यांच्याविषयीचे हे उद्‌गार. ऐकल्याबरोबर आपले अवघे अस्तित्व जागृतीच्या आवाहनस्पर्शाने रोमांचित आणि प्रफुल्लित होते! जागृती, जागृती आणि जागृती! जागृतीविना जीवनात काहीही साध्य होत नाही. अर्थात, जिजाऊंची जागृती ही स्वराज्यस्थापनेच्या ध्यासामुळे डोळसपणे स्वतःहून स्वीकारलेली कर्तव्यदक्ष आणि विजयोन्मुख जागृती होती. या जागृतीमुळे एका गौरवशाली इतिहासाचा पाया घातला गेला. स्वाभिमानी स्वप्नांची पेरणी केली गेली. एका लावण्यशाली युगाचे प्रवर्तन होऊ शकले. एकीकडून शहाजीराजांना स्वराज्याची पार्श्वभूमी तयार करता आली आणि दुसरीकडून शिवरायांना कर्तृत्वाचा बहर दाखवून स्वराज्याची निर्मिती करता आली.

जिजाऊंच्या या विविध गुणांची जोड शहाजीराजांच्या गुणांना मिळाली आणि या समन्वयातून एका नव्या समाजरचनेची पायाभरणी झाली.

## ४. शहाजी आणि जिजाऊ यांची परस्पर–अनुरूपता

जिजाऊंच्या वडिलांनी शहाजी हे 'वरलक्षणलक्षित' आहेत हे पारखूनच जिजाऊंचे लग्न त्यांच्याबरोबर करण्याचा निर्णय घेतला. याचा अर्थ शहाजी आणि जिजाऊ एकमेकांना अनुरूप असल्याचे पाहूनच त्यांचा विवाह करण्यात आला. गंगा समुद्राच्या प्राप्तीने जशी शोभून दिसते, तशा गुणगंभीर जिजाऊ शहाजींच्या प्राप्तीने विराजमान झाल्या, असे परमानंद म्हणतो, तेव्हा तोही अनुरूपताच सूचित करतो.

विवाहानंतर शहाजींनी जिजाऊंबरोबर एका माधुर्याने ओतप्रोत वातावरणात गृहप्रवेश केला, हे सांगताना परमानंद म्हणतो, ''स्वतः प्रसन्नवदन असलेल्या त्यांनी (शहाजींनी) प्रसन्नवदन अशा त्यांच्याकडे दृष्टिक्षेप टाकत गृहप्रवेश केला.'' खरे म्हणजे दोघांसाठी वेगवेगळी विशेषणे वापरून शब्दांच्या पुनरुक्तीचा दोष टाळणे परमानंदाला सहजपणे साध्य असताना त्याने दोघांनाही प्रसन्नवदन म्हटले आहे, त्यामध्ये आशयघन व्यंग्यार्थ आहे. त्या क्षणी दोघेही प्रसन्न होते, निर्मळ आनंदाचा उत्कट प्रत्यय घेत होते, दोघांचे मनोमिलन परिपूर्ण होते, दोघांची हृदये एकमेकांच्या सादाला अनुकूल आणि उत्स्फूर्त प्रतिसाद देत होती, दोघे तादात्म्यच पावले होते, हे सर्व या वचनातून व्यक्त झाले आहे.

जिजाऊ शहाजींना प्रियतर उत्तरे देऊन त्यांचे मन जपत होत्या, तर शहाजी हे जिजाऊंमुळे झळाळू लागले होते. दोघे एकमेकांना पूरक होते, पोषक होते. त्या दोघांचे गृहस्थजीवन अतिशय भावसंपन्न, समाधानी आणि प्रदीर्घ होते, हे परमानंदाच्या पुढील वर्णनावरून स्पष्ट होते, ''चंद्राप्रमाणे सुंदर मुख असलेल्या, सुदती अशा त्या यदुवंशजा (जिजाऊ) महाराजांची (शहाजी महाराजांची) काळजी घेत असत. अत्यंत विभ्रमशील अशा त्या चारित्र्यसंपन्न राज्ञी (राणी) पतीची प्रत्येक इच्छा प्रसन्नपणे सफल करीत असत. त्या शहाजींना त्यांच्या ठायी शुभलक्षणी असे सहा पुत्र झाले. (मात्र) त्यांच्यापैकी शंभू आणि शिव हे दोघेच वंशवर्धक झाले.'' शहाजी आणि जिजाऊ यांचे नाते किती हृद्य, उत्कट, सुमधुर, स्थिर आणि दृढ होते, हे या वर्णनावरून आपल्याला सहजपणे कळू शकते.

शहाजींचा जिजाऊंवर असा जीव असल्यामुळेच जेव्हा निजामाने कटकारस्थान करून शहाजींच्या सासऱ्यांची हत्या केली, तेव्हा त्यांनी निजामाला मदत करायचे बंद केले. परमानंद म्हणतो, ''आपले सासरे यादवेश्वर यांची ती अवस्था झाल्याचे ऐकल्यावर महायशस्वी शहाजींनी निजामाला साहाय्य करायचे थांबविले.'' ...

शहाजीमहाराज शिववर्मा (शिवराय) या आपल्या पुत्रास अतिशय मानत होते, मालोजींच्या पुत्राला म्हणजेच शहाजीराजांना आपल्या त्या पुत्रामुळे कमालीचा आनंद होत असे, असे परमानंदाने नोंदवले आहे.

शिवनेरीवर असो अथवा बंगळुरूमध्ये असो, शहाजीमहाराज शिवाजींवर नितांत प्रेम करत होते. स्वाभाविकच, त्यांच्या मनात भविष्यकाळाविषयी काही स्वप्ने तरळत होती. आपले पुण्याचे राज्य स्वतंत्रपणाने चालवण्याची क्षमता आपल्या या पुत्रामध्ये आहे, हे त्यांनी ओळखले होते आणि तीच क्षमता विकसित करण्यासाठी एक पिता म्हणून जे जे करणे आवश्यक होते, ते ते सर्व त्यांनी केले, असेही परमानंदाच्या विवेचनावरून दिसून येते.

**आईवडिलांविषयी नितांत आदर :** शहाजीराजे आणि जिजाऊ यांच्या मनात आपल्या पुत्रांविषयी जी ममता होती, ती एकतर्फी नव्हती. शंभूराजे आणि शिवराय हे दोघेही आईवडिलांविषयी अपार कृतज्ञता बाळगत होते. आदिलशहाने शहाजीराजांना अटकेत टाकल्याचे कळल्यानंतर शंभूराजेही संतापले आणि शिवरायांनीही सूड घेण्याची प्रतिज्ञा केली, हे नोंदवताना परमानंद म्हणतो, ''शत्रूंनी आपल्या वडिलांना कैद केल्याचे ऐकल्यावर बंगळुरू येथे असलेले शंभूराजे मुस्तुफावर अत्यंत संतापले. प्रतापी शिवरायांनीही शहाजीराजांची अशी अवस्था झाल्याचे ऐकून आदिलशहावर सूड उगविण्याची प्रतिज्ञा केली. ... (शिवराय म्हणाले,) ''शत्रूंनी कैदेत ठेवलेले माझे वडील शहाजीराजे यांना बराच काळ कारागारामध्ये त्रास सोसावा लागला, त्याचा सर्वप्रकारे सूड घेण्यासाठी मी सिद्‌ध झालो आहे.''

परमानंदाने या संदर्भात 'वडिलांच्या शत्रूचा शत्रू' या अर्थाने शिवरायांना उद्‌देशून वापरलेले 'पितृ-द्‌वेषि-द्‌वेषि' हे विशेषणही खूप बोलके आहे. याबाबतीत दोघे भाऊ एकदिलाने वागत होते, हेही परमानंदाने शिवरायांच्या पुढील उद्‌गारांद्‌वारे स्पष्ट केले आहे, ''इकडून मी आणि तिकडून पराक्रमी शंभूराजे असे दोघेही युद्‌ध करून बाबांना मुक्त करू. अतिशय उन्मत्त झालेला तो महंमूद आम्हा दोघांकडून पराभूत झाला म्हणजे आपल्या घमेंडखोरपणाबरोबरच महाराजांना सोडून देईल.''

शिवरायांचा वडिलांच्या कर्तृत्वावर पूर्ण विश्वास होता, हे त्यांच्या पुढील उद्‌गारांवरून स्पष्ट होते, ''आदिलशहा जर मूर्खपणाने महाराजांवर प्रहार करील, तर बाबाच त्याला त्याच्या सहकाऱ्यांसह तावडतोब ठार मारतील.'' वडिलांच्या सुटकेसाठी शंभूराजांनी बंगळुरू शहर सोडून दिले आणि शिवरायांनी सिंहगड सोडून दिला. परमानंद म्हणतो, ''शिवराय युद्‌ध करण्यास समर्थ होते. सिंहगड देणे कोणत्याही प्रकारे योग्य नव्हते. तरीही त्यांनी वडिलांची सुटका अधिक महत्त्वाची मानली आणि सिंहगड वडिलांच्या

सुटकेसाठी देऊन टाकला.''

**शिवरायांवर संस्कार करण्याची क्षमता :** शहाजीराजे आणि जिजाऊ यांच्याकडे असलेली विविध प्रकारची गुणवत्ता, त्या दोघांच्या मनात शिवरायांविषयी असलेले उत्कट वात्सल्य आणि त्या उभयतांचे दोन्ही पुत्रांबरोबरचे उत्कट साद-प्रतिसादाचे नाते यांची अत्यंत तपशीलवार माहिती आतापर्यंत आपण घेतली. एक आदर्श राजा बनण्यासाठी आवश्यक असलेले सर्व संस्कार आपल्या पुत्रांवर करण्याची क्षमता त्या दोघांकडे पुरेपूर होती, हे या माहितीवरून स्पष्ट होते. अशा प्रकारचे संस्कार त्यांनी शंभूराजांवरही केले होते, हे शिवभारतात जागोजागी सूचित झाले आहे. परंतु तो सध्याचा विषय नाही.

मुद्दा हा आहे, की शिवरायांना घरातूनच राज्यकारभाराचे, युद्धतंत्राचे, प्रजापालनाचे, कृतज्ञतेचे आणि नैतिकतेचे संस्कार प्राप्त होऊ शकत होते आणि प्रत्यक्षात तसे ते झालेही. अशा प्रकारच्या वातावरणातच ते लहानाचे मोठे झाले. त्यांना हे संस्कार कसे प्राप्त झाले, याचे विवेचन पुढे येणार आहेच. असे असले, तरी येथे या संबंधातील एक पुढचा मुद्दा आधीच नोंदवून घेतो. शहाजीराजांनी शिवरायांना पुण्याला पाठवल्यानंतर शहाजीराजांनी कर्नाटकात काय केले, असा प्रश्न शिवभारत ऐकणाऱ्या पंडितांनी परमानंदाला विचारला होता. तो प्रश्न विचारताना पंडितांनी पुण्याकडे प्रयाण केलेल्या शिवरायांना उद्देशून 'सनय' हे विशेषण लावले होते. हे विशेषण ऐतिहासिकदृष्ट्या फार महत्त्वाचे आहे, हे पुढील विवेचनावरून स्पष्ट होईल.

**उत्तम तयारी करून घेतल्यानंतरच पुण्याकडे पाठवले :** 'सनय' पुत्राला पुण्याकडे पाठवल्यानंतर शहाजींनी षाड्गुण्याचा प्रयोग करून आणि सल्लामसलतीच्या जोरावर सर्व कर्नाटक प्रदेश आपल्या ताब्यात घेतला, असे परमानंदाने पंडितांच्या प्रश्नांना उत्तर दिले होते. पंडितांनी शिवाजींचा उल्लेख करताना 'सनय' हे विशेषण का लावले, ते परमानंदाच्या या उत्तरावरून नीट समजू शकते. शहाजींनी शिवाजींना पुण्याकडे पाठविले, तेव्हा शिवाजी 'सनय' हे विशेषण लावण्याइतके विकसित झाले होते. शहाजींनी त्यांना सनय बनवून पुण्याकडे पाठवले. या घटनेचा अर्थ कळण्यासाठी आपण सनय या शब्दाचा अर्थ समजून घेतला पाहिजे. त्याचा शब्दशः अर्थ पहायचा, तर 'जो नयासह म्हणजे नयाने युक्त असतो तो सनय' होय. नय शब्दाचा अर्थ संक्षेपाने पहायचा तर राजनीती या शब्दाने तो स्पष्ट करता येईल. शिवाजींना शहाजींनी पुण्याकडे पाठवले, तेव्हा त्यांना राजनीतीचे यथोचित ज्ञान देण्यात आले होते, हे यावरून स्पष्ट होते. स्वतः उच्च कोटीचे राजनीतिज्ञ असल्यामुळे हे ज्ञान देण्याची क्षमता शहाजीमहाराजांकडे होती, हे आपण पूर्वी पाहिलेल्या अनेक तपशिलांवरून सहजपणे स्पष्ट होते.

सनय हे विशेषण वरवर पाहता साधे वाटत असले, तरी प्रत्यक्षात ते अतिशय अर्थपूर्ण असून शहाजीराजांनी शिवाजींची कोणती तयारी करून घेतली होती, त्यांनी त्यांच्यावर लहान वयातच कोणते संस्कार केले होते, ते निःसंदिग्धपणे स्पष्ट करणारे आहे. नय या शब्दाचे मराठीमध्ये होणारे अर्थ सामान्यतः पुढीलप्रमाणे आहेत- मार्गदर्शन,

नेतृत्व, व्यवस्थापन, वागणे, वर्तनशैली, जीवनशैली, दूरदर्शिता (सुजाणपणा), द्रष्टेपणा, धोरण, राजकीय शहाणपण, राजनीतिज्ञता, मुलकी प्रशासन, राज्य धोरण, नैतिकता, न्याय, सत्य आणि न्याय यांवरील निष्ठा, सर्वांना समान न्यायपूर्ण वागणूक, योजना, भावी गोष्टींचा आराखडा, नियोजित प्रकल्प, अनुभवातून प्राप्त करून निश्चित केलेला नियम, तत्त्व, कामकाजाची पद्धत, व्यवस्था, सिद्धांत आणि मत. एखादा मनुष्य सनय आहे, याचा अर्थ त्याच्या व्यक्तिमत्त्वात या प्रकारची गुणसंपदा आहे, असा होतो. ...

षाड्गुण्य हा एकूण नयाचा, समग्र राजनीतीचा एक अत्यंत महत्त्वाचा घटक होय. शहाजीराजे या घटकाचे उत्तम जाणकार होते आणि त्याच्या जोरावरच त्यांनी कर्नाटक प्रदेश जिंकल्याचेही आपण पाहिले आहे. या षाड्गुण्याचेही ज्ञान शिवरायांना शहाजीराजांकडून प्रत्यक्षरीत्या मिळाले होते आणि पुढे त्यांनी त्याचा प्रयोगही केला. परमानंद म्हणतो, ''स्वत: षाड्गुण्यामध्ये निपुण असलेले आणि शत्रूंच्या योद्ध्यांना पार चिरडून टाकणारे (शिवराय) ... जयवल्लीला (जावळीला) पोचले.'' शहाजीराजांनी करून घेतलेली तयारी शिवरायांना पावलोपावली उपयोगी पडली, हे यावरून दिसून येते.

तात्पर्य, शहाजीराजांनी उत्तम तयारी करून घेऊनच शिवरायांना पुण्याकडे पाठविले. येथे चर्चेला घेतलेले त्या तयारीचे घटक हा केवळ नमुना आहे. प्रत्यक्षात शहाजीराजांनी स्वत:कडे जे काही होते, ते सर्व आपल्या या पुत्राला भरभरून दिले. शहाजीराजांचे असंख्य गुण शिवरायांच्या व्यक्तित्वातही आढळतात, यावरून शिवरायांना लाभलेला वारसा व संस्कार स्पष्ट होतात. शहाजीराजांनी त्यांना एका अतिशय जीवघेण्या संघर्षमय जीवनाला सामोरे जाण्यासाठी विविध अंगांनी सज्ज आणि सिद्ध केले. त्यांना विजिगीषू बनवले-विजय मिळवण्याच्या आकांक्षेने भारावून टाकले. आणि ... आणि आपण स्वत: प्रत्यक्षरीत्या स्वराज्य स्थापन करू शकलो नाही, यामागचे कारण सांगून ते शल्य निर्धाराने दूर करण्यासाठी प्रोत्साहितही केले- म्हणून तर शहाजीराजांना स्वराज्यसंकल्पक म्हटले जाते ! ही सगळी शिदोरी बरोबर घेऊन शिवराय पुण्याकडे निघाले. त्या वेळी त्यांच्या अवघ्या अस्तित्वातून चैतन्य ओसंडत होते ! तेथे आल्यावर त्यांनी आईवडिलांचे स्वप्न साकार करताना केवळ त्यांच्याच उरातील नव्हे, तर आपल्या समग्र समाजाच्या उरातील शल्य दूर केले आणि पिढ्यानूपिढ्यांसाठी स्वातंत्र्याचे लावण्यमय जीवन दिले.

पुण्याकडे जाण्यापूर्वी त्यांच्या आईवडिलांनी त्यांची जी तयारी करून घेतली होती, तिचे आणखी काही तपशील आता पाहूया.

**शिवरायांच्या शिक्षणाची प्रत्यक्ष व्यवस्था :** जिजाऊ आणि शिवराय बंगळुरूमध्ये शहाजीराजांबरोबर वास्तव्य करत असताना शहाजीराजांनी शिवरायांच्या शिक्षणाची जाणीवपूर्वक उत्तम व्यवस्था केली होती, म्हणूनच वयाला अवघी अकरा वर्षे पूर्ण झाली असताना, ते सनय बनून एका राज्याची जबाबदारी पेलण्यासाठी पुण्याकडे निघू शकले. शिवरायांच्या जन्मापासूनच शहाजीराजांची समृद्धी वाढत गेल्यामुळे, शहाजीराजे शिवरायांच्या सहवासात अतिशय आनंद अनुभवत होते. अशा स्थितीत पुढे काय

घडले, ते नोंदवताना परमानंद म्हणतो, ''त्यानंतर तो गुणसंपन्न पुत्र सात वर्षांचा झाला आहे, हे पाहून आता हा लिपी शिकण्यास योग्य झाला आहे, असा (शहाजी) राजांनी विचार केला. मग त्यांनी मंत्र्यांच्या समवयस्क पुत्रांबरोबर आपल्या त्या मेधावी आणि स्पष्ट उच्चार करू लागलेल्या पुत्राला शिक्षकाच्या मांडीवर बसविले. शिक्षक त्याला पहिला वर्ण लिहिण्यास सांगतो की नाही, तोपर्यंत हा (शिवराय) दुसरा वर्णही लिहून तो त्या शिक्षकाला दाखवित असे. (अशा प्रकारे), अगदी सर्व विद्यांचे प्रवेशद्वार असलेली संपूर्ण लिपी शिक्षकाने योग्य रीतीने त्याला शिकविली. नृपसिंहाचा पुत्र असलेला तो उपजतच प्रतिभाशाली आणि सुस्वभावी होता. शब्दांनी वर्णन करता येणार नाही, असा त्याचा राजबिंडा प्रभाव होता. आपल्याकडे शिकणाऱ्या मुलांच्या समूहातील या एकट्या मुलाने लिपीची विद्या झटपट ग्रहण केल्याचे पाहून शिक्षकाचे मन संतोष पावले आणि हा मुलगा (इतरांहून) विलक्षण आहे, असे त्याला वाटले.''

शिवरायांची जडणघडण करण्याच्या बाबतीत शहाजीराजे अतिशय जागरूक आणि सावध होते. सदैव युद्धे, लढाया वगैरेंमध्ये गुंतून पडलेले असूनही, आपल्या पुत्राची जडणघडण करण्याच्या बाबतीत कोणताही हलगर्जीपणा होता कामा नये, याची ते काळजी घेत होते. आपल्याला भावी स्वतंत्र राजाला राज्यकारभारासाठी योग्य प्रकारे प्रशिक्षित करायचे आहे, हे ओळखूनच ते त्या बाबतीत कर्तव्यदक्ष होते. म्हणूनच शिवरायांच्या वयाला सात वर्षे झाल्याबरोबर त्यांनी त्यांना तातडीने लिपी शिकवण्याची व्यवस्था केली. त्यांनी या प्रशिक्षणामध्ये मंत्र्यांच्या मुलांनाही सामावून घेतले. याद्वारे त्यांनी अनेक गोष्टी साधल्या. शिकत असताना समवयस्क मित्र बरोबर असल्यामुळे शिवरायांना एकाकीपणा वाटण्याचे कारण उरले नाही. मंत्र्यांच्या मुलांना आपल्या मुलाबरोबर शिकण्याची व्यवस्था केल्यामुळे मंत्र्यांबरोबरचे जिव्हाळ्याचे नाते घट्ट बनले, दृढ झाले आणि लहानपणी लाभलेल्या या संधीमुळे मंत्र्यांची मुले भविष्यकाळात शिवरायांना मन:पूर्वक सहकार्य करतील, हेही निश्चित झाले.

शिक्षक पहिला वर्ण शिकवत असतानाच शिवराय दुसरा वर्ण लिहीत असत, हे वाचताना परमानंद शिवरायांच्या ग्रहणशक्तीचे कौतुक करण्यासाठी एक प्रकारची अतिशयोक्ती करत आहे, असे कोणाला वाटण्याची शक्यता आहे, पण शहाजीराजे आणि जिजाऊ शिवरायांची तयारी करून घेण्यासाठी करत असलेले नियोजन ध्यानात घेतले, तर ही अतिशयोक्ती नसून वस्तुस्थिती आहे, हे ध्यानात येऊ शकते. शिक्षकाने शिकवणीच्या वेळी जे शिकवले तेवढेच घ्यायचे आणि दुसऱ्या दिवशी त्याच शिक्षकाकडून पुढचे काही शिकायचे, एवढीच शिक्षणप्रक्रिया ज्यांच्या नजरेपुढे असेल, त्यांना परमानंदाने वर्णिलेल्या घटनेचा गर्भितार्थ कळणार नाही. प्रत्यक्षात काय घडत असले पाहिजे? शिक्षक एखादे अक्षर शिकवून निघून गेल्यानंतर शिवराय आईवडिलांना ते अक्षर लिहून दाखवत असतील आणि पुढच्या अक्षराच्या लेखनाविषयीची आपली जिज्ञासा त्यांच्यापुढे व्यक्त करत असतील. शहाजीराजे अथवा जिजाऊ त्यांना शिक्षकाच्या अनुपस्थितीत पुढचे अक्षर कसे लिहायचे ते शिकवत असतील, त्यामुळे शिवराय शिक्षकाने न

शिकविलेले असे ते दुसरे अक्षर त्या शिक्षकाला सहजपणे लिहून दाखवू शकत असतील आणि त्याच्याकडून त्यापुढचे अक्षर शिकून घेत असतील.

शिवरायांनी लिपीचे ज्ञान इतक्या द्रुतगतीने प्राप्त केले, की त्यांचे शिक्षक त्यामुळे चकित झाले. लिपी शिकण्याच्या वेळी त्यांच्या वयाला नुकतीच सात वर्षे पूर्ण झाली होती आणि बारावे वर्ष लागल्यानंतरच ते सनय बनून पुण्याला आले. याचा अर्थ लिपीचे ज्ञान प्राप्त केल्यानंतर बारावे वर्ष लागेपर्यंत ते बंगळुरूमध्येच विविध विद्या शिकत होते. नुसतीच लिपी शिकून ते इतकी वर्षे गप्प बसले, असे म्हणता येत नाही. याचा अर्थ आईवडील आणि त्यांनी नेमलेले शिक्षक यांच्याकडून ते पुढच्या विद्या शिकत होते. अशा प्रकारचे अनुमान स्वाभाविक आहे, हे तर खरेच, पण शहाजीराजांनी शिवरायांना पुण्याकडे पाठवण्यापूर्वी त्यांची मोठी तयारी करून घेतली होती, हा त्याविषयीचा भक्कम पुरावा आहे, हे आपण पाहिले आहेच.

**लिपीच्या ज्ञानानंतर भरपूर वाचन :** वयाला सात वर्षे पूर्ण झाल्यानंतर त्यांनी लिपी अगदी झटपट शिकून घेतली आणि वयाला बारावे वर्ष लागल्यानंतरच ते पुण्याकडे आले. या मधल्या काळात त्यांनी विविध विद्यांचे ग्रहण करताना वेगवेगळ्या विषयांवरचे अनेक ग्रंथ स्वत: वाचले असणार, हेही उघड आहे. त्यांनी लिपीचे ज्ञान प्राप्त केले आणि वाचन मात्र काहीच केले नाही, असे घडू शकत नाही. त्यांची जडण-घडण करण्याचे कार्य ज्या सुजाण पद्धतीने चालू होते, ती पद्धत ध्यानात घेता शहाजीराजे आणि जिजाऊ यांनी त्यांना वाचनासाठी प्रवृत्त केले असणार आणि वाचनासाठीचे साहित्यही उपलब्ध करून दिले असणार, हे उघड आहे. त्यांना वेगवेगळ्या विद्या शिकवण्यासाठी नियुक्त करण्यात आलेल्या शिक्षकांनीही त्यांना त्याबाबतीत साहाय्य केले असणार. शिवाय, शिवरायांनी ज्या अर्थी लिपी इतक्या वेगाने शिकून घेतली, त्या अर्थी त्यांच्या मनात त्या लिपीच्या ज्ञानाचा उपयोग करून विविध ग्रंथांमधील विद्या प्राप्त करण्याविषयी आत्यंतिक जिज्ञासा असेल, हेही उघड आहे.

**पुण्याच्या राज्याचे आधिपत्य बहाल :** शिवरायांना बंगळुरूमधून पुण्याकडे पाठवण्याच्या शहाजीराजांच्या निर्णयाची माहिती देताना परमानंद म्हणतो, ''शाहवर्मा (क्षत्रिय शहाजी) हे सूर्यासारखे तेज असलेले द्रष्टे राजे होते. शिववर्मा यांना (क्षत्रिय शिवरायांना) जेव्हा बारावे वर्ष लागले, तेव्हा त्यांनी शंभूच्या शिवलक्षणी अशा या धाकट्या भावाला बोलावून घेतले आणि त्याला पुणे प्रांताच्या प्रमुखपदी नियुक्त केले.'' शहाजींनी शिवाजींची पुण्यदेशाचा अधिपती म्हणून नेमणूक केली, असे पुढे आणखी एका श्लोकात परमानंदाने म्हटले आहे. या नेमणुकीनंतर घडलेल्या घटनांविषयी परमानंदाने दिलेली माहिती आधी जाणून घ्यावी आणि मग तिचे काही विवेचन करावे, हे उचित ठरेल.

परमानंद म्हणतो, ''प्रतापी वडिलांनी ते आधिपत्य दिल्यानंतर आपल्या देशाकडे जाऊ इच्छिणारे शिवराय शोभून दिसू लागले. शहाजीराजांनी एका (सर्वत्र) सजावट केलेल्या दिवशी आपल्या या पुण्यकारी पुत्राला पुण्यदेशाकडे पाठविले. त्या वेळी

त्यांनी शिवरायांच्या समवेत कित्येक हत्ती, घोडे आणि पायदळातील सैनिक दिले. पिढीजात व विश्वासू अमात्य आणि प्रसिद्ध अध्यापकही दिले. बिरुदे आणि उंच-उंच ध्वज दिले. मोठा खजिनाही दिला. सामान्य लोकांना जमणार नाहीत, अशी असाधारण कर्मे करणारे इतर सेवकही दिले. त्यानंतर काही दिवसांनी सूर्यकुळात जन्मलेले ते शिवराय कर्नाटक प्रदेशातून महाराष्ट्र देशाकडे प्रवास करू लागले. ते शिवराय तीन शक्तींनी युक्त होते. त्यांच्याबरोबर सैन्यदले होती. ते स्वत:च्या राजश्रीसह (राजवैभवासह) पुणे नावाच्या नगरीला येऊन पोचले. लोकांचे बंधू असलेले ते भूचक्राचे म्हणजे आपल्या देशाचे प्रिय करणारे होते. आपल्या भूमंडळाला म्हणजे आपल्या राज्याला आनंदाने फुलवून टाकणारे होते. लोकांनी त्यांना पाहिले, तरी त्यांनी त्यांना (खऱ्या अर्थाने) ओळखले (मात्र) नाही. त्यानंतर प्रकृतींना (राज्याच्या सात अंगांना) अनुकूल करून घेऊन प्रजारंजन करीत ते विक्रमी (शिवराय) क्रमाने भरभराटीस पोचले आणि त्यांची कीर्तीही वृद्धिंगत झाली. त्या वेळी त्यांचा आधार मिळाल्यामुळे समृद्ध झालेल्या जनतेने युक्त अशा महाराष्ट्र देशाचे नाव सार्थ झाले. विनयी आणि गुणांनी युक्त अशा त्यांच्या पदरी असलेले आणि मनामध्ये त्यांच्याविषयी अनन्य निष्ठा असलेले शिक्षक कृतार्थ झाले. ते स्वत: पुढील विद्यांमध्ये प्रवीण झाले. श्रुती, स्मृती, पुराणे, महाभारत, दंडनीती, समस्त शास्त्रे, काव्य, रामायण, व्यायाम, वास्तुविद्या, ग्रहनक्षत्रांच्या स्थिती व वेळा यांचे शास्त्र, गणितशास्त्रे, धनुर्वेदाची चिकित्सा, सामुद्रिक मत, विविध भाषा, अनेक छंद (वृत्ते), सुभाषित, गज-रथ-अश्व यांच्यावर स्वार होणे आणि त्यांची लक्षणेही जाणणे, चढणे, ओलांडणे, फिरणे, उडी मारणे या विद्यांमध्ये ते प्रवीण झाले. ते तलवार, धनुष्य, चक्र, भाला, पट्टा, शक्ती ही शस्त्रे वापरण्यास शिकले. युद्ध, द्वंद्वयुद्ध, किल्ल्यांना अधिक दुर्गम बनवण्याची कामे, दुर्गम ठिकाणी घुसण्याची तंत्रे, इंगिते, माया, विषाचा अपाय दूर करण्याच्या विद्या, विविध रत्नांची परीक्षा, अवधान आणि विविध लिपी यांच्यामध्येही ते स्वत: प्रवीण झाले. विविध प्रकारचे प्रत्यभिज्ञान असलेल्या त्या प्रभूने या प्रावीण्याद्वारे विविध शिक्षकांना मोठे यशोवैभव भरपूर प्रमाणात प्राप्त करून दिले.''

आता येथे व्यक्त झालेल्या माहितीमधील काही महत्त्वाच्या मुद्द्यांचे थोडे विवेचन करूया.

**शिवराय मनाने स्वतंत्र राजा म्हणूनच पुण्याला आले :** परमानंदाने ही जी माहिती दिली आहे, ती माहिती शहाजीराजांनी शिवरायांना किती तयारीनिशी महाराष्ट्राकडे पाठवले आणि शिवरायांनीही तेथे गेल्यावर वडिलांच्या उद्देशाचे कसे चीज केले, ते स्पष्ट करणारी आहे. स्वत: शहाजीराजे स्वतंत्र राजासारखे वागत असले, तरी प्रत्यक्ष खऱ्याखुऱ्या स्वराज्यस्थापनेचा काळ अजून आलेला नव्हता, स्वराज्य स्थापण्याचे स्वप्न त्यांनी शिवरायांसाठी काळजीपूर्वक जपले आणि राखून ठेवले होते.

परमानंदाच्या वर्णनात एकाहून अधिक वेळा वापरलेला 'आधिपत्य' हा शब्द असो अथवा 'पुण्यदेशेश्वर' हा शब्द असो, शहाजींनी शिवरायांना केवळ एक

जहागिरी सांभाळण्यासाठी पुण्याला पाठवले नव्हते, तर स्वराज्याचा अधिपती बनवण्यासाठीच पाठवले होते, हे या शब्दांतून सूचित होते. राष्ट्राचे प्रिय करणारा या अर्थाने परमानंदाने त्यांच्याविषयी जो 'चक्रप्रियकर' हा शब्द वापरला आहे, त्यामधील 'चक्र' हा शब्द शिवरायांनी चक्रवर्ती बनावे हे स्वप्न सुचवणारा आहे. पुढे अफजलखानाने शिवरायांना उद्दामपणाने निरोप पाठवला, तेव्हा त्याने त्यांच्यावर घेतलेला एक आक्षेप नोंदवताना परमानंदाने त्यांच्या संबंधात अफजलखानाच्या तोंडी चक्रवर्ती हा शब्द आल्याचे नोंदवले आहे. अफजलखान त्यांना उद्देशून म्हणाला होता, ''तू निर्भय असल्याप्रमाणे चक्रवर्तीची चिन्हे धारण करतोस आणि अनीतिमान होऊन सुवर्णसिंहासनावर अध्यारोहण करतोस...''

शिवराय पुण्यात पोचले, तेव्हा ते तीन शक्तींनी युक्त होऊन स्वत:च्या राजश्रीसह पोचले, असे परमानंद म्हणतो. याचा अर्थ ते त्या वेळी निदान मनाने तरी स्वतंत्र राजा म्हणूनच पुण्याला आले होते. ही चिन्हे स्वतंत्र राजाचीच असतात! त्यांचे हे स्वतंत्र राजेपण, ही राजश्री काळाच्या ओघात पुढे पूर्णांशाने सिद्ध होणार होती. म्हणूनच, 'लोकांनी त्याला पाहिले, पण ओळखले नाही', असे परमानंदाने म्हटले आहे. लोकांना ही ओळख पटण्यास वेळ लागणार होता, पण दुसरीकडे मनात सर्व काही निश्चित झाले होते.

**राज्यकारभारासाठी आवश्यक तीन शक्तींनी युक्त :** शिवराय पुण्यात पोचले तेव्हा ते तीन शक्तींनी युक्त होते, असे परमानंद सांगतो. राजाकडे प्रभुशक्ती वा प्रभावशक्ती, मंत्रशक्ती व उत्साहशक्ती अशा तीन शक्ती असल्या पाहिजेत, असे आपल्याकडच्या राज्यशास्त्राचे तत्त्व होते. राजाकडे प्रभुशक्ती हवी, याचा अर्थ तो स्वत: प्रचंड क्षमता, आकलनशक्ती, दूरदृष्टी, निर्णयशक्ती, विलक्षण कर्तृत्व, धमक इत्यादी गुणसमुच्चयाने प्रभावशाली बनलेला असावा. त्याच्याकडे मंत्रशक्ती हवी, याचा अर्थ निष्कपट मनाने अचूक सल्ला देणारे अमात्य त्याच्याकडे असावेत. उत्साहशक्ती हवी, याचा अर्थ तो मरगळलेला, व्यसनात अडकलेला, निष्क्रिय असा असण्याऐवजी नवी नवी कामे हाती घेण्यासाठी आवश्यक ती ऊर्मी आणि ती तडीला नेण्याची चिकाटी त्याच्याकडे असायला हवी. शिवराय पुण्यात पोचले, तेव्हा त्यांच्याकडे या तिन्ही शक्ती होत्या. अर्थात, हा काळ म्हणजे अजूनही त्यांच्या तयारीचा काळ होता, त्यांचे कर्तृत्व शिखराला पोचल्याचा नव्हे, हे आपण जरूर ध्यानात ठेवले पाहिजे.

**राज्याच्या सात अंगांनी संपन्न :** शिवरायांनी पुण्यात येऊन राज्यकारभार सुरू केल्यानंतर ते 'अनुकूलप्रकृती:' होते असे परमानंदाने म्हटले आहे. येथे प्रकृती हा राज्यशास्त्रातील एक पारिभाषिक शब्द आहे. राज्याची महत्त्वाची अशी जी सात अंगे मानण्यात आली आहेत, त्यांना 'प्रकृती' असे म्हटले जाते. स्वत: स्वामी (राजा), अमात्य, सुहृद (मित्र राजे), कोष (खजिना), राष्ट्र (भूप्रदेश), दुर्ग (किल्ले) आणि बल (सैन्य), ही ती सात अंगे वा राज्याच्या प्रकृती होत. प्रकृती या शब्दाचा प्रजा असाही एक अर्थ आहे. काही वेळा राज्याचे आठवे अंग म्हणून या प्रकृतीचा उल्लेख केला जात असला, तरी सामान्यत: प्रजेचा अंतर्भाव या अंगांत न करता

तिला स्वतंत्र स्थान देण्याची प्रथाच अधिक रूढ आहे. शिवराय 'प्रकृतिरंजन' करीत होते, असे म्हणून परमानंदानेही प्रजेचा स्वतंत्र उल्लेख केला आहे.

शहाजीराजांनी शिवरायांना पुण्याकडे पाठवले, तेव्हा ते या सात अंगांनी संपन्न असतील वा लवकरच तसे होतील याची खबरदारी त्यांनी घेतली होती. स्वामी हे पहिले अंग स्वत: शिवराय हेच आहेत आणि उत्तम प्रशिक्षण देऊन त्यांना आधिपत्य बहाल करण्यात आले आहे. दुसरे अंग अमात्य. शहाजींनी शिवरायांबरोबर अमात्य पाठवले आहेत. त्या अमात्यांना 'मौल' आणि 'आप्त' अशी दोन विशेषणे लावण्यात आली आहेत. मौल याचा अर्थ मूळापासून चालत आलेले म्हणजेच पिढीजात होत. ... 'आप्त' या शब्दाचा अर्थ 'यथार्थवक्ता' असा होतो. याचा अर्थ ज्या माणसाने सत्य वस्तुनिष्ठ रीतीने जाणलेलेही असते आणि जो ते सत्य जसेच्या तसे सांगतही असतो, तो मनुष्य आप्त होय. अमात्य हे सत्य जाणणारेही आणि सत्य स्वरूपात अचूक सल्ला देणारेही असावे लागतात. शहाजींनी असे पिढीजात आणि विश्वासू अमात्य शिवरायांबरोबर पाठवले होते. आपल्या विश्वासातील राजे, सरदार इत्यादींना शिवरायांशी मित्रता राखण्याचा संदेश शहाजीराजांनी दिला होता, यात शंका नाही. विपुल द्रव्य असलेला खजिना त्यांनी शिवरायांबरोबर पाठवल्याचे परमानंदाने स्पष्टपणे म्हटलेच आहे. पुणे प्रांताचे आधिपत्य त्यांच्याकडे दिले, याचा अर्थ त्यांना राष्ट्र हे अंग उपलब्ध करून दिले. तेथे असलेले दुर्ग अल्पावधीतच त्यांनी आपल्या नियंत्रणाखाली आणले.अखेरचे राज्याचे जे अंग ते म्हणजे सैन्य. शहाजीराजांनी गजदळ, घोडदळ आणि पायदळ कितीतरी मोठ्या प्रमाणात शिवरायांबरोबर पाठविले. शिवाय, त्यांना बिरुदे दिली. याचा अर्थ दोन प्रकारे घेता येईल. त्यांना त्यांनी ब्रीद दिले, जीवनाचे नैतिक तत्त्वज्ञान दिले, असा एक अर्थ त्यातून मिळतो. त्याबरोबरच, राजाला साजेशी प्रतिष्ठेची चिन्हे दिली, असाही अर्थ मिळतो. ध्वजही दिले आहेत. हे सर्व पाहता शिवराय राजा म्हणूनच वावरावेत, याची तयारी स्वत: शहाजीराजांनी केली होती, हे उघड आहे. शिवरायांनी पुण्याचे राज्य सांभाळावे, ही शहाजीराजे आणि जिजाऊ यांची अपेक्षा होती. अर्थात, शिवरायांचे वय अजून कोवळे होते. त्यामुळे आईवडिलांनी त्यांच्याबरोबर जाणे आवश्यक होते. परंतु शहाजी बंगळुरूच्या कारभारात अडकल्यामुळे जाऊ शकत नव्हते. स्वाभाविकच, एकट्या जिजाऊंनी शिवरायांबरोबर जाणे हा दोन्हीकडची राज्ये सांभाळण्याच्या दृष्टीने संपूर्ण कुटुंबाने द्रष्टेपणाने व एकमताने घेतलेला निर्णय होता, यात शंका नाही.

**शिवरायांचे गुरू हे वेतन घेऊन शिकवणारे शिक्षक :** शिवरायांना सात वर्षे पूर्ण झाल्यानंतर त्यांच्या शिक्षणाचा प्रारंभ करून देण्यात आला होता, हे आपण पाहिले आहेच. पुढे बारावे वर्ष लागेपर्यंत बंगळुरूमध्ये त्यांचे शिक्षण चालूच होते. अर्थात, त्यांचे लहान वय पाहता पुण्याकडे प्रयाण करण्याच्या वेळी त्यांचे शिक्षण पूर्ण झाले होते, असे मात्र म्हणता येत नाही. पुण्याचे आधिपत्य स्वीकारल्यानंतरही त्यांचे शिक्षण चालू राहणे आवश्यक होते. म्हणूनच त्यांच्याबरोबर अनेक अध्यापक

पाठवण्यात आले. परमानंदाने 'अध्यापक' हा शब्द बहुवचनात वापरला आहे. संस्कृतमध्ये तीन किंवा त्यापेक्षा अधिक गोष्टींचा उल्लेख करायचा असेल, तर बहुवचन वापरण्यात येते. याचा अर्थ शहाजीराजांनी शिवरायांबरोबर वेगवेगळ्या विद्या शिकवू शकणारे कितीतरी शिक्षक पाठवले. लिपी शिकवणारा गुरू हा अध्यापकच होता. शिवरायांना विविध विद्या शिकवणाऱ्या व्यक्तींचा उल्लेख 'गुरव:' असा करण्यात आला आहे. 'गुरव:' हे 'गुरू' या शब्दाचे बहुवचन आहे. हे 'गुरव:' देखील अध्यापकच होत.

प्रस्तुत संदर्भात अध्यापक हे वेतन घेऊन शिकवणारे शिक्षक आहेत. गुरू या शब्दाच्या बाबतीतही संदर्भानुसार वेगवेगळे असे दोन प्रमुख अर्थ होतात. वेतन घेऊन वेगवेगळे विषय शिकवणारा, हा त्याचा एक अर्थ आणि संपूर्ण व्यक्तित्वाची जडणघडण करून शिष्याला अलौकिक उंचीवर जाण्याचे जीवनदर्शन देणारा गुरू, हा दुसरा अर्थ होय. प्रस्तुत संदर्भात आलेला गुरू हा शब्द सर्वत्र पहिल्या अर्थाने आला आहे, हे उघड आहे. लिपी शिकवणारा गुरू हा तर सरळसरळ पहिल्या अर्थाचा गुरू आहे. येथील अध्यापक हा शब्दही त्याच अर्थाचा आहे. 'गुरव:' हा शब्दही पहिल्या अर्थानेच घेतला पाहिजे. त्या शब्दाचे बहुवचनच ही बाब स्पष्ट करते. परंपरेतील अत्युच्च व एकमेवाद्‌वितीय गुरु-शिष्य संबंध सूचित करणारे, शिष्याचे आयुष्य आरपार बदलून टाकणारे, 'शिष्याला अपूर्व अशी दिव्यदृष्टी देणारे' अथवा 'Spiritual Teacher' म्हणता येतील असे अनेक गुरू कोणाला असत नाहीत. शिवरायांच्या गुरूंनी ज्या विविध विद्या शिकवल्या आहेत, त्या पाहता शिवरायांच्या या गुरूंची संख्या फार मोठी असली पाहिजे, हेही स्पष्ट आहे, याचा अर्थ हे गुरू म्हणजे साधे शिक्षक होते, वरील प्रकारचे असाधारण 'गुरू' नव्हते पण या मुद्द्यांपेक्षा अधिक महत्त्वाचा असा एक मुद्दा आहे. या विद्या शिकविणारे हे गुरू शिवरायांच्या पदरी होते, हे सांगण्यासाठी परमानंदाने त्यांच्यासाठी 'आश्रयाला असलेले' या अर्थाचे 'श्रयन्त:' हे विशेषण वापरले आहे. स्वत: दिवेकरांच्या* पुस्तकातही या विशेषणाचे भाषांतर 'पदरी असलेले' असे आहे. जीवन आरपार बदलून टाकणारी दृष्टी देणारा गुरू शिष्याच्या आश्रयाला वा त्याच्या पदरी असत नाही!

**दंतकथांमधील तथाकथित गुरूंचा उल्लेखही नाही :** शहाजीराजे आणि जिजाऊ यांच्या स्वत:च्या क्षमता, त्यांनी शिवरायांवर केलेले संस्कार, स्वत: आणि विविध शिक्षकांमार्फत त्यांची करून घेतलेली तयारी, या सर्वांचे परमानंदाने जे अत्यंत सविस्तर वर्णन केले आहे, ते आपल्यापुढे आहे. हे विस्तृत वर्णन वाचत असताना एक गोष्ट आपोआपच ध्यानात येते. महाराष्ट्रात शिवरायांचे गुरू म्हणून काही व्यक्तींना उभे करणाऱ्या दंतकथांमधील कोणत्याही व्यक्तीचा साधा उल्लेखही परमानंदाने आपल्या संपूर्ण ग्रंथात एकदाही केलेला नाही. याचा अर्थ त्याच्या काळात या प्रकारच्या दंतकथा अस्तित्वात नव्हत्या. अशा प्रकारचे काही ऐतिहासिक वास्तव नव्हतेच, हे यामागचे सुस्पष्ट कारण आहे. परमानंद हा शिवरायांना समकालीन ब्राम्हण आहे आणि त्याने शिवभारत हा ग्रंथ स्वत: शिवरायांच्या आदेशाने लिहिला आहे. शिवरायांनी

* श्रीशिवभारत या ग्रंथाचे अनुवादक व संपादक स. म. दिवेकर-संपादक.

त्याला म्हटले होते, ''हे बुद्धिमंता, या पृथ्वीतलावर मी जी जी कार्ये केली आणि जी जी कार्ये माझ्याकडून केली जात आहेत, त्या त्या सर्व कार्यांचे वर्णन कर. हे महाभागा, माझे विख्यात आजोबा मालोजीराजे यांच्यापासून सुरुवात करून तू या महनीय कथेचे निरूपण कर.'' आपले चरित्र लिहायला सांगण्याचा द्रष्टेपणा शिवरायांनी दाखविला, या महत्त्वाच्या बाबीचा स्वतंत्रपणे सविस्तर विचार करता येईल.

**अनेक विद्या आईवडिलांकडूनच मिळाल्या :** शिवरायांनी ज्या विद्या शिकून घेतल्या, त्यांतील अनेक विद्या त्यांना त्यांच्या आईवडिलांकडून मिळाल्या होत्या. उदाहरणार्थ, त्यांनी इंगितांच्या विद्या प्राप्त केल्या. 'इंगित' जाणणे म्हणजे हावभाव, अभिनय, देहबोली इत्यादींवरून मनातील अभिप्राय जाणणे होय. स्वत: शहाजीराजे इंगितज्ञ असल्याचा निर्देश आपण पूर्वी पाहिला आहेच. शिवराय विविध शस्त्रे चालवायला शिकले आणि ही विद्या केवळ शहाजींकडेच नव्हे, तर जिजाऊंकडेही होती, हेही आपण पाहिले आहे. शिवराय विविध भाषा व लिपी शिकले. स्वत: शहाजीराजांना अनेक भाषा येत होत्या आणि जिजाऊंकडेही भाषांचे चातुर्य होते. त्यांनी आईवडिलांकडून खूप काही घेतले, असे म्हटल्यामुळे त्यांच्या अत्युच्च कर्तृत्वाला कोणताही उणेपणा वा कमीपणा येत नाही.

शिवराय विविध विद्या शिकत असताना लिपी शिकले, हा उल्लेख करण्यासाठी परमानंदाने 'लिपि' या शब्दाचे 'लिपिषु' असे बहुवचन वापरले आहे. याचा अर्थ शिवराय केवळ एकच 'लिपी' शिकले, असे नसून त्यांनी अधिक लिपींचे ज्ञान प्राप्त केले होते. त्यांना बहुधा मोडी-देवनागरीबरोबरच कानडी व उर्दू लिपीही अवगत असाव्यात, असे नि:संदिग्धपणे म्हणता येते.

'सामुद्रिक मत' या विद्येचा शरीरावर आढळणाऱ्या हस्तरेषा वगैरेंसारख्या चिन्हांवरून व्यक्तीचे भविष्य सांगण्याची विद्या (Palmistry) असा अर्थ सध्या घेतला जातो; परंतु 'सामुद्रिक' हे 'समुद्र' (सागर) या शब्दापासून बनलेले विशेषण आहे, हे ध्यानात घेता त्याचा आपटे यांच्या कोशात अग्रक्रमाने आढळणारा Oceanic (सागरविषयक) हा अर्थ प्रस्तुत संदर्भात अधिक उचित आहे. स्वत: शहाजीराजांचे समुद्रावरील आरमाराकडे बारीक लक्ष होते आणि शिवरायांनी तर एक सामर्थ्यशाली आरमार उभारले होते. आरमाराबरोबरच समुद्रावरील व समुद्राच्या किनाऱ्यावरील किल्ल्यांचे महत्त्व त्यांनी जाणले होते आणि त्या दृष्टीने पावले टाकली होती. परदेशी लोकांचे आगमन, व्यापार इत्यादी बाबींवरही त्यांची करडी नजर होती. हा इतिहास पाहता येथे 'सामुद्रिक' या शब्दाचा 'आरमार' या अर्थासारखा काही अर्थ घेणे हेच त्या संज्ञेला न्याय देणारे ठरेल, असे वाटते. शिवरायांनी सागरविषयक विविध गोष्टी शिकून घेतल्या होत्या, हेच परमानंदाला सुचवायचे असले पाहिजे.

**परमानंद शिवरायांना नि:संदिग्धपणे क्षत्रिय मानतो :** शिवराय ज्या विद्या शिकले, त्यांमध्ये परमानंदाने श्रुतींचा म्हणजे वेदांचा निर्देश केला आहे. हा निर्देश नि:संदिग्धपणे त्यांच्या क्षत्रियत्वाचा द्योतक आहे. त्याने वापरलेले 'मालवर्मा', 'शाहवर्मा'

आणि 'शिववर्मा' हे शब्द देखील तो या सर्वांना क्षत्रिय मानत असल्याचे स्पष्ट करतो. 'वर्मन्' म्हणजे चिलखत. क्षत्रिय लोक युद्धासाठी 'वर्मन्' वापरत असल्यामुळे त्यांच्या नावापुढे 'वर्मन्' शब्द लावला जातो. 'वर्मा' हे 'वर्मन्' हा शब्द कोणत्याही नावाला जोडल्यानंतर होणारे त्याचे प्रथमेचे रूप आहे. तो शब्द संबंधित व्यक्तीचे क्षत्रियत्व सूचित करतो. परमानंदाने त्यांचा चक्रवर्ती म्हणून केलेला उल्लेखही तेच दर्शवतो. त्याने हे सगळे काशीच्या वैदिक ब्राम्हण पंडितांना ऐकवले आहे आणि त्यांनी काही आक्षेप घेतल्याचे दिसत नाही. ...

**विद्यांमध्ये स्वतः प्रावीण्य मिळवले :** शिवरायांनी विद्या प्राप्त केल्याचे नोंदवताना परमानंदाने एक अत्यंत महत्त्वाचा निर्देश केला आहे. या विविध विद्यांमध्ये ते स्वतः प्रवीण झाले, असे त्याने म्हटले आहे. शिक्षकांचे ऋण नाकारण्यासाठी हा उल्लेख आलेला आहे, असे नव्हे. शिवरायांनी आपल्या शिक्षकांना मोठे यश मिळवून दिले, कारण शिवरायांकडे 'प्रत्यभिज्ञान' होते, असे त्याने म्हटले आहे. ही कृतज्ञता महत्त्वाचीच, परंतु शिक्षकांच्या मर्यादा आणि शिवरायांची अत्युत्तम ग्रहणशक्ती यांच्याकडे दुर्लक्ष करणेही योग्य नव्हे. लिपी शिकवणारा शिक्षक एक वर्ण शिकवत असतानाच शिवराय जसे दुसरा वर्ण लिहून त्याला दाखवत असत, तसेच या विद्यांच्या बाबतीतही बऱ्याच प्रमाणात झाले असले पाहिजे. कारण, शिवराय हे 'मेधावी' तर होतेच, पण 'सहजमेधाशाली' होते, असे परमानंदाने सांगून ठेवले आहे. याचा अर्थ ते उपजतच प्रतिभाशाली होते. ते 'उपजत' बुद्धिमान होते, याचा अर्थ त्यांना आईवडिलांकडून आनुवंशिकरीत्या व संस्कारांद्वारे उच्च प्रतिभा लाभली होती. म्हणून तर त्यांच्या पहिल्या शिक्षकाला हा मुलगा बौद्धिकदृष्ट्या इतरांपेक्षा काही वेगळा आहे, हे जाणवले होते. त्यांचा बौद्धिक प्रभाव शब्दांनी वर्णन करण्यापलीकडचा असल्याचेही त्याला जाणवले होते. शिवरायांनी विविध प्रकारच्या विद्यांमध्ये स्वतः प्रावीण्य मिळवले, असे परमानंद का म्हणतो, ते यावरून स्पष्ट होते. ... तात्पर्य, शिवरायांची ग्रहणशक्ती, आकलनशक्ती, एकाग्रता, ज्ञाननिष्ठा, जिज्ञासा ही त्यांच्या भावी कर्तृत्वाच्या दृष्टीने निर्णायक ठरली आणि त्यांच्या असाधारण यशाला कारणीभूत झाली.

**विद्याप्राप्तीसाठी खडतर तपश्चर्या :** ज्याला यशस्वी आणि न्यायप्रिय राजा व्हायचे असते, त्याने केवळ शस्त्र चालवायचे नसते, लढाया मारायच्या नसतात, युद्धे जिंकायची नसतात, तर या सर्व गोष्टी करतानाच प्रजेला सर्व प्रकारे न्याय मिळेल, तिला स्वास्थ्य प्राप्त होईल, तिचा विकास होत राहील आणि ती सुखीसमाधानी होईल, हेही पाहायचे असते. स्वाभाविकच, ज्याला युगप्रवर्तक राजा व्हायचे असते, त्याने समाजजीवनाच्या सर्व अंगांशी संबंधित अशा विद्या उत्तम रीतीने प्राप्त करणे आवश्यक असते. त्या दृष्टीने शिवरायांचा विद्याव्यासंग पाहता त्याची व्याप्ती अतिशय विशाल, किंबहुना प्रचंडच आहे. सिद्धान्त (Theory) आणि प्रात्यक्षिक (Practical) या दोन्ही अंगांकडे लक्ष दिल्यामुळे त्यांचा हा व्यासंग परिपूर्ण बनला होता.

त्यांना उत्तम रीतीने लिहिता-वाचता येत होते, ही त्यांची मोठी जमेची बाजू

होती. त्यामुळे कुणी अमात्य, सहकारी, विरोधक वा शत्रू कोणत्याही प्रकारे त्यांना फसवू शकत नव्हते. अन्यथा अनेकदा जवळची माणसेच राजाच्या निरक्षरतेचा गैरफायदा घेतात. अमात्य वगैरेंचा सल्ला घेणे वेगळे आणि त्यांच्यावर पूर्णांशाने अवलंबून राहणे वेगळे. शिवरायांना परिस्थितीचे आकलन करण्यासाठी असे परावलंबी व्हावे लागत नव्हते, ही महत्त्वाची बाब आहे. त्यांनी ज्या विद्या प्राप्त केल्या आहेत, त्यांच्या कक्षा टोकाच्या विरोधी म्हणता येतील अशा आहेत. या विद्यांची मोठी संख्या, त्यांच्यातील सिद्धान्तांची सूक्ष्मता, त्यांच्या उपयोजनासाठी प्रचंड क्षमतेची असलेली आवश्यकता, यांसारख्या गोष्टी ध्यानात घेतल्या असता, शिवरायांना या विविध विद्या आत्मसात करण्यासाठी अक्षरशः खडतर तपश्चर्या करावी लागली असेल, यात शंका नाही.

प्राणघातक ठरू शकले असते अशा प्रसंगांतून ते वारंवार निसटले, ते त्यांच्या संतुलित निर्णयक्षमतेमुळे आणि अत्युच्चकोटीची विविध कौशल्ये प्राप्त केलेली असल्यामुळे होय, पण त्याबरोबरच नैतिकता, चारित्र्य, संकटांच्या प्रसंगी इतरांना पुढे करण्याऐवजी धोका पत्करून स्वतः आघाडीवर जाण्याची समर्पणशीलता, त्यामुळे सहकाऱ्यांचा प्राप्त झालेला विश्वास आणि प्रजावात्सल्य, या गोष्टी त्यांच्या राजेपणाला असाधारण बनवतात. त्याबरोबरच, आईवडील आणि थोरले भाऊ यांच्याविषयीचा त्यांचा आदर, कृतज्ञता आणि आत्मीयता अनुकरणीय होती. राजा असण्यापूर्वी ते अगोदर एक अतिशय उमदे आणि उन्नत मनाचे गुणसंपन्न माणूस होते. लहानपणी त्यांनी आईवडिलांकडून आयुष्यभर पुरेल असे खूप काही घेतले आणि आपल्या तेजस्वी कर्तृत्वाने ते सगळे मोहरून-बहरून टाकले. त्या मोहराचा, त्या बहराचा सुगंध आजही तुमच्या-आमच्या जीवनात दरवळत आहे, त्यांच्या पावलांवर दोन पावले का होईना टाकण्यासाठी आपल्याला भावपूर्ण आवाहन करीत आहे!

**अनल्पधी शिवराय बुद्धीने लढले :** शिवराय विलक्षण बुद्धिमान होते, हे परमानंदाने वेगवेगळ्या प्रकारे स्पष्ट केले आहे. ते अफजलखानाला भेटण्यासाठी गेले, तेव्हा त्यांचे वर्णन करण्यासाठी परमानंदाने वापरलेला 'अनल्पधी:' हा शब्द माझ्या काळजाला स्पर्श करून गेला आहे आणि मस्तकामध्ये कोरला गेला आहे. त्यांच्याकडे अनल्प बुद्धिमत्ता होती असे तो म्हणत आहे. 'धी' म्हणजे बुद्धी. अल्प म्हणजे थोडी. अल्प नव्हे, ती 'अनल्प'. शिवरायांकडे अनल्प बुद्धी होती, असे परमानंद म्हणतो, तेव्हा तो शिवरायांची असंख्य विद्या आत्मसात करण्याची अनल्पता तर सूचित करतोच, परंतु त्याबरोबरच विद्यांचे प्रत्यक्ष जीवनात उपयोजन करण्यासाठी आवश्यक असलेल्या त्यांच्या बौद्धिक कौशल्यांची विपुलता आणि कुशाग्रताही सूचित करतो.

त्यांच्या प्रत्यक्ष चरित्रात त्यांच्या बुद्धीची ही विलक्षण संपन्नता वारंवार व्यक्त झाली आहे. ते अफजलखानाशी केवळ हातांनी, केवळ शरीराने वा केवळ शस्त्रांनी लढले, असे नाही ते त्याच्याशी या अनल्प बुद्धीने लढले. बुद्धी हेच त्यांनी केलेल्या शरीराच्या आणि शस्त्रांच्या प्रत्येक लढाईचे अधिष्ठान होते. किंबहुना,

त्यांचा आयुष्यभरचा संघर्ष हा मूलतः बौद्धिक संघर्षच होता. तो शरीराच्या व शस्त्रांच्या माध्यमातून व्यक्त होत होता, इतकेच. बुद्धीच सर्व कर्तृत्वाचे ऊर्जाकेंद्र असते. तीच सर्व पराक्रमांची जननी असते. जीभ, हात किंबहुना एकूण शरीर आणि विविध शस्त्रे यांना आदेश, दिशा, नियंत्रण, अचूकता व विवेक देण्याचे काम बुद्धीच करते आणि शिवरायांकडे तर ती बुद्धी 'अनल्प' होती! आज आम्हांला त्यांच्याकडून इतर गोष्टींबरोबरच या अनल्प बुद्धीचा वारसा घेण्याची - बुद्धीने लढण्याचे त्यांचे तंत्र आत्मसात करण्याची गरज आहे!

❒❒❒

टीप : मूळ लेखात शेवटी विस्तृत संदर्भ सूची दिलेली आहे. विस्तारभयास्तव ती येथे घेतलेली नाही.

('शिवराय : संस्कार आणि शिक्षण' या पुस्तिकेतून संक्षेपाने)



# २. शिवाजीचा राज्यकारभार

## न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे

अनुवाद : प्रा. न. र. फाटक

शिवाजीच्या लष्करी मर्दुमकीचा वृत्तान्त हा त्याच्या प्रभुत्वशील चित्तवृत्तीच्या एका भागाचे दर्शन घडवतो आणि राज्यकर्ता या नात्याने त्याच्या अंगी वसणाऱ्या गुणांचा विसर पडतो. वस्तुत: आपले चित्त वेधून घेण्याचा अधिक बळकट मान राज्यकर्तृत्वाच्या गुणांचा आहे. पहिल्या नेपोलियनप्रमाणे आपल्या काळात शिवाजी हा महान संघटनाकार आणि प्रजेच्या जीवनाला उपयोगी पडणाऱ्या संस्थांचा विधाता होता. यामुळेच त्याने आरंभलेली चळवळ बहुतांशी यशस्वी झाली. त्याच्या मागून थोड्याच वर्षांनी देशावर जी संकटे कोसळली तिच्यातून देश सुरक्षित पार पडला, हा त्याच्या पूर्वोक्त कर्तृत्वाचा परिणाम होता. देश सुरक्षित राहिला एवढेच नव्हे, तर मोगल साम्राज्याच्या सर्व सामर्थ्याशी वीस वर्षे झगडून त्याने आपल्या राष्ट्रीय स्वातंत्र्याचा हक्क सिद्ध केला याचेही कारण शिवाजीच्या संघटना करण्याच्या व संस्था स्थापण्याच्या गुणांशिवाय दुसरे नाही. या संस्थांचा विशेष अगत्याने अभ्यास केल्याखेरीज शिवाजीच्या बुद्धीची मौलिकता आणि त्याच्या मनोगतांची विशालता गळी उतरणार नाही. त्याच्या राज्यकारभाराची पद्धत ही पूर्वीच्या मुसलमान किंवा हिंदू राज्यपद्धतीची नक्कल नव्हती. याहून जास्त लक्ष वेधणारी गोष्ट ही आहे, की स्वातंत्र्ययुद्ध संपून महाराष्ट्र हा स्वतंत्र देश अशी मान्यता मिळाल्यावर त्याचे वारस पूर्वपरंपरेकडे वळले; मराठ्यांच्या राज्यसंस्थापकाने घालून दिलेले वळण त्यांनी सोडले आणि त्याचा आदर्श सोडताना शिवाजी जे टाळावे म्हणून आपल्या उद्योगाच्या वेळी अतिशय कटाक्षाने काळजी बाळगत होता ते फाटाफुटीचे आणि विभक्तपणाचे बीज त्याच्या वारसांनी आपल्या कारभारात पेरले. ...

शिवाजीच्या प्रत्यक्ष अमलाखालच्या (बिनलष्करी) प्रदेशाचे प्रांत (जिल्हा) या नावाने विभाग पाडले होते. यांत (१) मावळ म्हणजे मावळ, सासवड, जुन्नर, खेड - आज हे तालुके आहेत. यांत मोठाले अठरा डोंगरी किल्ले असून त्यांच्याकडे या प्रांताच्या संरक्षणाची जबाबदारी होती; (२) वाई, सातारा, कऱ्हाड हे प्रांत - हल्लीच्या सातारा जिल्ह्याच्या पश्चिमेकडील भाग, त्यांत पंधरा किल्ले संरक्षक होते; (३) प्रांत पन्हाळा - कोल्हापुराचा पश्चिम भाग, तेरा डोंगरी किल्ल्यांसह; (४) प्रांत दक्षिण कोकण - रत्नागिरी, अठ्ठावन्न पहाडी व समुद्र किनाऱ्यांच्या किल्ल्यांसह; (५) प्रांत ठाणे - उत्तर कोकण जिल्हा, बारा किल्ल्यांसह; (६-७) प्रांत त्रिंबक आणि बागलाण - नाशिक जिल्ह्याचा पश्चिम भाग, बासष्ट किल्ल्यांसह - हा प्रदेश लष्करी ठाण्यांनी व्यापलेला होता; (८) प्रांत वानागड - धारवाड जिल्ह्याचा दक्षिण भाग, बावीस

किल्ल्यांसह; (९, १०, ११) बेदनूर, कोल्हार, श्रीरंगपट्टण - अर्वाचीन म्हैसूर, अठरा किल्ल्यांसह; (१२) प्रांत कर्नाटक - कृष्णेच्या दक्षिणेस असलेल्या मद्रास इलाख्याचे जिल्हे, अठरा किल्ल्यांसह; (१३) प्रांत वेलोर - आजचा अर्काट जिल्हा, पंचवीस किल्ल्यांसह; आणि (१४) प्रांत तंजावर - सहा किल्ल्यांसह. सह्याद्रीच्या श्रेणीवर सर्वत्र किल्ले पसरलेले आहेत. या किल्ल्यांच्या पश्चिमेकडील समुद्रापर्यंतचा प्रदेश व पूर्वेकडील प्रदेश यांची रुंदी पन्नास ते जास्तीत जास्त शंभर मैलांच्या मर्यादेत कमी-जास्त आढळते.

शिवाजीच्या ताब्यात दोनशेऐंशी किल्ले होते, असा निर्देश बखरीतून सापडतो. एका अर्थाने असे म्हणता येईल, की डोंगरी किल्ले व त्यांच्या अमलातील प्रदेश हा शिवाजीच्या राज्यकारभाराचा एक घटक होता. नवे किल्ले बांधणे व जुन्यांची डागडुजी करणे याकरिता शिवाजी खर्चाकडे पाहात नसे. किल्ल्यावरील शिपाई, त्यास लागणारी निर्वाहाची व लढाईची सामग्री, या संबंधांतील व्यवस्था ही फार बारकाईच्या तपशिलाची होती. बाहेरून होणाऱ्या हल्ल्याच्या प्रतिकाराची किंवा बाहेर करायच्या चढाईची केंद्रे म्हणून सुरुवातीस झालेल्या मराठ्यांच्या लढ्यात किल्ले हीच मुख्य महत्त्वाची बाब होती. यामुळेच पुष्कळ किल्ले तेथील लष्करी मर्दुमकीने प्रख्यात झालेले आहेत. साम्राज्य हे या किल्ल्यांच्या साखळीने बांधलेले होते. विपत्तीत तेच संरक्षणाला उपयोगी पडत. सातारा जिल्ह्यात साताऱ्याचा किल्ला औरंगजेबाच्या सर्व लष्करी बळाशी कित्येक महिने झुंजत राहिला. ...

शिवाजीच्या पहिल्या विजयाशी तोरणा व राजगड यांचा संबंध आहे. शिवनेरी हा शिवाजीचा जन्म जेथे झाला तो किल्ला. मुरारबाजीने किल्ला शत्रूच्या हाती जाऊ नये म्हणून गाजवलेल्या बहादुरीमुळे पुरंदरला कायमची संस्मरणीयता लाभलेली आहे. रोहिडा आणि सिंहगड हे शूर तानाजीच्या स्मृतीशी जोडले गेले आहेत. खेळणा (विशाळगड) हा बाजीप्रभूने दुसऱ्या वेळी किल्ल्याच्या वाटेवरील खिंड धरून किल्ल्याच्या बचावाकरिता केलेल्या पराक्रमामुळे प्रसिद्ध आहे. बाजीप्रभूला तेथे प्राणार्पणाचा स्वार्थत्याग करावा लागला. समुद्रावरील स्वाऱ्यांसाठी मालवण आणि कुलाबा येथे आरमार सज्ज केले जात असे. अफझलखानाच्या वधाने प्रतापगड गाजला आहे. मराठा मावळ्यांनी अटीतटीची झुंज खेळून मोगल सरदारांची दाणादाण उडवली ही दृश्ये माहुली व साल्हेर येथे होऊन गेली. शिवाजीच्या प्रदेशातील सदर किल्ल्यांच्या पूर्वेकडील सरहद्दीवर कल्याण, भिवंडी, वाई, कऱ्हाड, सुपे, खटाव, बारामती, चाकण, शिरवळ, मिरज, तासगाव, कोल्हापूर येथील किल्ल्यांची मालिका होती. या किल्ल्यांनी बजावलेली कामगिरी पाहिली म्हणजे शिवाजी त्यांच्याविषयी जी काळजी बाळगत होता ती योग्यच होती, असे कबूल करावे लागेल. प्रत्येक किल्ल्यावर एक मराठा हवालदार प्रमुख असे, त्याच्या हाताखाली जे मदतनीस असत त्यांची बचावासाठी उभ्या केलेल्या वर्तुळाकार तटावर नेमणूक असे. हे मराठा

जातीचेच असत. हवालदाराच्या जोडीला ब्राम्हणांच्या तीन मुख्य विभागातून निवडलेला एक ब्राम्हण सुभेदार किंवा सबनीस असे आणि एक कारखानीस हा प्रभू जातीचा असे. हवालदार व त्याचे मदतनीस यांनी किल्ल्यावरील सैनिकांची लष्करी बाजू सांभाळायची. ब्राम्हण सबनिसाकडे मुलकी व जमाबंदीचे काम असे. हे काम किल्ल्यापुरतेच नसून किल्ल्याच्या अमलातील खेड्यांच्या जमाबंदीची जबाबदारी त्यावरच असे. दाणा, चारा, युद्धोपयोगी वस्तू आणि डागडुजी यांची व्यवस्था प्रभू अधिकाऱ्याकडे असे. याप्रमाणे कामाच्या वाटणीने या तिन्ही जाती एकत्र जुळवल्या होत्या. यामुळे विश्वास वाढून मत्सराला जागा मिळत नसे. डोंगराच्या बाजू संरक्षणाच्या कडक नियमाने सांभाळल्या जात. म्हणून गडाखालच्या रानांचे रक्षण रामोशी व इतर जातींकडे सोपवलेले असे. दिवसरात्रीच्या देखरेखीची कामे कशी बजावली जावी, याचे फार बारीक नियम होते. गडावरील सैनिकांची संख्या, गडाचा आकार व महत्त्व यांस अनुसरून कमी-जास्त असे. दहा शिपायांवर एक नाईक, तोफा, आखूड तलवारी, भाले व पट्टे, लांब पातळ पात्याच्या तलवारी, ही गडावरील हत्यारे असत. प्रत्येक माणसाला रोकड व धान्यादी वस्तू ठरलेल्या रकमेप्रमाणे व अधिकाराप्रमाणे मिळत असत.

गडावरून खालील मैदानी प्रदेश महाल आणि प्रांत यांत विभागलेला असे. आज जी तालुकापद्धती आहे त्याच पद्धतीची जवळजवळ ती व्यवस्था होती. तालुक्याचे उत्पन्न सुमारे पाऊण लाखापासून सव्वा लाखाइतके असे. दोन किंवा तीन महालांचा एक सुभा किंवा जिल्हा बने. वर्षास सुमारे चारशे होन म्हणजे दरमहा शंभर रुपये हा सुभेदाराचा पगार होता. खेड्याचे पाटील, कुळकर्णी किंवा जिल्ह्याचे देशमुख, देशपांडे यांच्या हातात जमाबंदीचा कारभार मोगलांनी ठेवलेला होता. शिवाजीने ही व्यवस्था सोडून सुभेदार किंवा सुभ्याचे किंवा महालाचे महालकरी यांच्यामार्फत जमाबंदीचे काम घेण्याची नवी व्यवस्था अमलात आणली. दोन किंवा तीन खेड्यांच्या समूहाची व्यवस्था कमावीसदाराकडे असे. (कमावीसदार म्हणजे कारकून.) खेड्यांच्या आणि जिल्ह्याच्या अधिकाऱ्यांच्या मिळकतीला शिवाजीने धक्का लावला नाही पण जमाबंदीची सूत्रे त्यांच्या हातातून शिवाजीने काढून घेतली.

घोडदळ व पायदळ यांमध्ये अधिकाराच्या ज्या पायऱ्यांना जे नियम लागू होते तेच गडावरील सैनिकांसंबंधात शिवाजीने अमलात आणले होते. पायदळाच्या प्रत्येक तुकडीत दहा माणसांवर एक नाईक, पाच नाईकांवर एक हवालदार, दोन हवालदारांवर एक जमादार, दहा जमादार म्हणजे हजार माणसांची एक तुकडी, तिचा जो प्रमुख तो हजारी, सात हजारींवर एक सरनोबत, तो मावळी पायदळाचा सर्वश्रेष्ठ अधिकारी. घोडदळात बारगीर व शिलेदार असा भेद होता. पंचवीस बारगिरांवर किंवा शिलेदारांवर एक हवालदार, पाच हवाल्यांचा एक जुमला, दहा जुमल्यांवर एक हजारी. पाच हजारींचा जो प्रमुख तो पंचहजारी आणि त्याहून श्रेष्ठ तो घोडदळाचा सरनोबत. पंचवीस

घोड्यांमागे पाणी-घासदाण्याकरिता एक इसम नेमलेला असे. घोडदळाच्या आणि पायदळाच्या प्रत्येक बड्या अंमलदाराच्या हाताखाली एक ब्राम्हण सबनीस आणि एक प्रभु कारखानीस किंवा ब्राम्हण मुजुमदार आणि प्रभु जमीनीस, हे असायचे. पावसाळ्यात बारगिरांचे घोडे छावण्यातून ठेवत. तेथे चारा व धान्य ही सामग्री मिळण्याची तजवीज केलेली असे. स्वाराकरिता राहण्याला इमारती (बराकी) होत्या.

प्रत्येक शिपायाला व अंमलदाराला ठरावीक वेतन दिले जाई. पागा हजारीला एक हजार होन आणि पागा पंचहजारीला दोन हजार होन याप्रमाणे वेतन होते. पायदळात हजारीला पाचशे होन. खालचे अधिकारी व शिपाई यांना ३ रु. पासून रु. ९ पर्यंत आणि घोडदळात वरच्या किंवा खालच्या वर्गातील स्वारांना रु. ६ ते रु. २० पर्यंत वेतन मिळत असे. वर्षाचे आठ महिने फौजेने मुलुखगिरी करून म्हणजे मोगल जिल्ह्यांतील चौथ-सरदेशमुखीच्या मिळकतीवर निर्वाह पार पाडावा, अशी अपेक्षा असे. मुलुखगिरीवर जाताना माणसांनी आपली बायकामुले बरोबर नेऊ नयेत असा सक्त नियम होता. शहर लुटल्यास प्रत्येक शिपायाला व स्वाराला आपल्या लुटीचा हिशेब द्यावा लागत असे. शिपाई व स्वार हा सैन्यात दाखल करताना त्याची वागणूक चांगली राहील अशाबद्दल त्याच्या स्नेहसोबत्यांकडून जामीनपत्र घेतल्याशिवाय त्याची भरती होत नसे. सैन्याधिकाऱ्यांना आगाऊ वेतन दिले जाई कारण जमवलेल्या चौथ' - सरदेशमुखीचा हिशेब त्यांना द्यावा लागे. शिवाजीच्या वेळी सरकारी उत्पन्न किंवा जमीन लष्करी नोकरीनिमित्त देण्याचा प्रघात नव्हता. इतके कडक निर्बंध असूनही त्यांची लष्कर भरतीला अडचण होत नसे. लष्करच्या चाकरीइतका दुसरा कोणताच व्यवसाय लोकप्रिय नव्हता. दसऱ्याचा दिवस हा या नोकरीच्या पाचारणाचा दिवस. प्रत्येक दसऱ्याला घाटमाथ्याचे मावळे, कोकणचे हेटकरी व मुख्य महाराष्ट्राचे शिलेदार आणि बारगीर मोठ्या संख्येने रार्ष्ट्रीय निशाणाकडे धावून जात असत.

रोकड वेतन आणि सरकारमार्फत प्रत्यक्ष (देशमुख-देशपांड्याची मध्यस्थी नसलेली) जमाबंदी या दोन्ही पद्धती शिवाजीने आपल्या राज्यात सर्वत्र चालू केल्या. बखरीतून या पद्धतींचा प्रामुख्याने उल्लेख येतो, कारण या पद्धती जुन्या परंपरेला सोडून होत्या. शिवाजीचा जास्त भर आपल्या नव्या पद्धतीवर असला पाहिजे हेसुद्धा बखरीतील या संबंधाच्या चर्चेचे कारण असू शकेल. खेड्याच्या व जिल्ह्याच्या जमाबंदीची कर्तव्ये जमीनदारांकडे सोपवल्यामुळेच पूर्वीच्या काळात अंदाधुंदी माजलेली होती अशी शिवाजीची खात्री होती. त्यांनी वाजवीहून जास्त पैसा रयतेकडून उकळावा आणि सरकारात वाजवीहून कमी भरावा; संधी मिळाल्यास दंगेधोपे चालवावे, केंद्र सत्तेचे हुकूम धुडकावून लावावे, असा जमीनदारांचा व्यवहार होता. शिवाजी हा कमावीसदार, महालकरी, सुभेदार यांना पगार देऊन त्यांच्याकडून चाकरी घेत असे. शिवाजीपूर्वी या सर्वांची कामे जमीनदार करत असत. पिके उभी असताना धान्य व रोकड वसूल करण्याचे कर्तव्य कमावीसदारांचे होते. शेतांची कसोशीने मोजणी करून

त्यांची नोंद शेतमालकाच्या नावाने दप्तरी केली जात असे. जे देणे राहील त्याच्या वर्षावर्षाला कबुलायती घेतल्या जात. साऱ्याकरिता जे धान्य घ्यायचे ते एकंदर पिकाच्या दोन पंचमांशाहून जास्त नसे. बाकीचा तीन पंचमांश हा पिकाचा वाटा म्हणून शेतकऱ्याचा असे. संकटकाळात किंवा काही अपघात झाल्यास उदारपणे तगाई आगाऊ दिली जाऊन तिची फेड चार किंवा पाच वर्षांत हप्त्याने करून घेतली जात असे. सुभेदारांना मुलकी व फौजदारी कामे करावी लागत. मुलकी न्यायाला तेव्हा फारसे महत्त्व नव्हते आणि तंटे उपस्थित झाले म्हणजे गावाच्या पंचाकडे सुभेदाराने पाठवून द्यावे. जास्त महत्त्वाचा बखेडा असेल तर दुसऱ्या गावाच्या पंचांना बोलावत व जो निर्णय लागेल तो मात्र सुभेदार सक्तीने अमलात आणायला चुकत नसे.

जिल्ह्याच्या मुलकी कारभाराची व्यवस्था साहजिकच केंद्रीय अधिकाऱ्यांच्या नियंत्रणात असे. त्यांतले दोन पंतअमात्य व पंतसचिव यांच्याकडे अनुक्रमे ज्यास आपण फडणीस (फायनान्स मिनिस्टर) आणि जनरल अकाउंटंट व ऑडिटर म्हणतो त्यांची कामे होती. जिल्ह्याचे हिशेब या दोन अधिकाऱ्यांकडे पाठवावे लागत. तेथे ते एकत्र करून त्यात नियमबाह्य दोष आढळल्यास अपराध्याला शिक्षा दिली जात असे. या अधिकाऱ्यांना जिल्हा कामगारांचे काम कसे चालते हे पाहण्यासाठी आपल्या हाताखालची माणसे पाठवण्याची मुखत्यारी होती. पेशव्याच्या खालोखाल पंतअमात्य व पंतसचिव हेच दोघे मोठे मुलकी अधिकारी होते. जमाबंदीच्या कर्तव्याबरोबर त्यांच्याकडे लष्करी अधिकारही होते. ज्याला अष्टप्रधान - आठ खात्यांचे प्रमुख - म्हणत, त्या राज्यव्यवस्था मंडळाचे हे दोन महत्त्वाचे सदस्य होते. राजाखाली पेशवा म्हणजे मुख्य प्रधान. मुलकी व लष्करी कारभाराच्या शिरोभागी हाच असे आणि सिंहासनाखाली उजव्या बाजूस बसण्याचा त्याचा मान होता. सेनापती हा लष्करी कारभाराचा प्रमुख - सिंहासनाखाली डाव्या बाजूचे पहिले स्थान त्याचे असे. पेशव्यानंतर अमात्य आणि सचिव, त्याच्याखाली मंत्री - राजाचे खाजगी खाते त्यांचे. सुमंत हा परराष्ट्रीय कामाचा सचिव. त्यानंतर पंडितरावांचे नाव घ्यावे लागते. धर्मखात्याचा तो मुखत्यार, त्याच्या खाली डाव्या बाजूस सरन्यायाधीशाचे स्थान असे... तो काळ असा होता की अष्टप्रधानातील पंडितराव आणि न्यायाधीश वगळून बाकी सर्वांना लष्करी अंमलदाराची कामे करावी लागत. यामुळे ज्याने मोठाले विजय मिळवले असतील त्याच्या हाती सत्तेची सूत्रे जावी हे साहजिकच अपरिहार्य होते. मराठा मंडळाच्या ऱ्हासाची बीजे या वस्तुस्थितीमध्ये होती. लष्करी अधिकार वंशपरंपरेचे नसावे अशी खबरदारी घेऊन वरील संकटाला शिवाजीने आपल्या कारभारात वावच ठेवला नव्हता. त्याच्या कारकिर्दीत एकंदर चार सेनापती - माणकोजी दहातोंडे, नेताजी पालकर, प्रतापराव गुजर आणि हंबीरराव मोहिते झाले. त्याने पहिला पेशवा अधिकारावरून काढला आणि मोरोपंत पिंगळ्याला तो अधिकार दिला. पंत अमात्य बदलले. इतर अधिकारही विशिष्ट कुटुंबांतून वंशपरंपरेने ठेवले नाहीत. ...

आणखी एका बाबतीत शिवाजी आपल्या काळाच्या मानाने फार पुढे गेलेला होता असे दिसते. त्याच्या यशस्वी मुलकी व लष्करी अंमलदारांना जहागीर देण्याच्या तो विरुद्ध होता. शिवाजीच्या राज्यकारभारातील पेशवा सेनापतीपासून अगदी खालच्या पातळीवरील शिपाई- कारकुनापर्यंत प्रत्येकाने आपला पगार धान्याच्या किंवा रोकडीच्या स्वरूपात सरकारी खजिन्यातून व कोठारातून घ्यावा असा शिवाजीचा दंडक होता. पगाराची रक्कम निश्चित ठरलेली होती व ती नियमित वेळी मिळत असे. उत्तम स्थितीत व उत्तम हेतूने सुद्धा जमिनी इनाम देण्याच्या पद्धतीचे दुष्परिणाम होऊ शकतात. जहागीरदार साहजिकपणे आपल्या टापूतला किंवा सरंजामातला सर्वाधिकारी बनतो आणि जेव्हा त्याचे वर्चस्व आनुवंशिक नात्यागोत्यांनी बळावते तेव्हा त्याला जहागिरीवरून काढायचे म्हटल्यास सक्तीशिवाय दुसरा उपाय नसतो. विभक्तपणाला आणि सवत्या सुभ्याला पोसणारी फुटीर वृत्ती हिंदुस्थानात स्वभावत:च फार बळकट आहे आणि जहागीर देणे व त्या जहागिरीच्या मिळकतीमधून त्याला फौज बाळगण्याची सवड असणे, या योगाने फुटीरपणाची प्रवृत्ती इतक्या थरास पोचते, की उत्तम राज्यव्यवस्था सुद्धा अशक्य होऊन जाते. जिल्ह्यांतील जमीनदारांना स्वत:च्या बचावाखातर किल्ला बांधावासा वाटला तर शिवाजी तसे करू देत नसे. त्यांनी रयतेप्रमाणे साध्या घरातून राहावे, असा त्याचा कटाक्ष होता. शिवाजीच्या कारकिर्दीत प्रख्यातीस चढलेल्या पुरुषांपैकी कोणीही आपल्या वंशजांच्या हवाली आपल्या मालकीच्या मोठाल्या जमिनी देऊ शकला नाही. मोरोपंत पिंगळे किंवा आबाजी सोनदेव किंवा राघो बल्लाळ किंवा अण्णाजी दत्तो किंवा निराजी रावजी किंवा मराठ्यांतले मालुसरे, किंवा कंक किंवा प्रतापराव गुजर, नेताजी पालकर, हंबीरराव मोहिते किंवा शिलेदार यांपैकी एकालाही वंशपरंपरेचे घराणे स्थापन करता आले नाही. अठराव्या शतकाच्या सुरुवातीस शाहूच्या प्रधानांनी अशी घराणी उदयास आणली. शिवाजीने ही गोष्ट कोणालाच साधू दिली नाही.

फक्त देवळे किंवा धर्मकार्ये याकरिता शिवाजी इनाम जमिनी देत असे. अशी इनामे ही सार्वजनिक निधीसारखी असत. सदर इनामदारांना लष्करी कामे करावी लागत नव्हती, यामुळे राज्याला त्यांच्यापासून धोका पोचण्याची भीती नसे. विद्यार्जनाच्या उत्तेजनार्थ ब्राम्हणांना धर्मादायातील दक्षिणा वाटण्याच्या पद्धतीचा शिवाजी पुरस्कर्ता होता. अर्वाचीन काळी परीक्षेच्या निकालावर देणगी अवलंबून असे. शिवाजीची दक्षिणापद्धती ही अर्वाचीन पद्धतीची जुनी आवृत्ती होती. दक्षिणा कोणाला किती द्यायची याबद्दल नियम होते व ते फार विचारपूर्वक केलेले होते. विद्यासंपन्नतेचा गुण आणि विस्तार या दोन्हींची तरतूद त्या नियमांत होती. त्या काळी सार्वजनिक शाळा नव्हत्या. विद्वान पुरुष आपल्या घरात विद्यार्थ्यांना शिकवत असत. दरसाल त्यांना ज्या देणग्या मिळत त्यांची रक्कम न्यायबुद्धीने ठरवली जात असे. विद्यार्थी आणि गुरुजी यांना कसलीही टंचाई जाचणार नाही, अशा हिशेबाने वार्षिक देणग्या वाटल्या

जात असत. शिवाजीचा उदय झाला तेव्हा देशाच्या या भागात (महाराष्ट्रात) संस्कृत विद्या पराकाष्ठेने खालावली होती, परंतु शिवाजीने उत्तेजनाचे उपाय अमलात आणल्यावर थोड्याच अवधीत गाढ अभ्यासाच्या विद्वानांनी दक्षिणची कीर्ती वाढवली. हे विद्वान अभ्यासाकरिता बनारसला जात व तेथून मानसन्मानाने परत स्वदेशी येत असत; येथे त्यांचा राजा त्यांची देणग्यांनी संभावना करी. ...

स्वराज्याच्या लहानशा मर्यादेबाहेर मराठ्यांची सत्ता फैलावू लागल्यावर राज्यव्यवस्थेच्या पूर्वोक्त नव्या अंगांपैकी काही अंगे जशीच्या तशी टिकून राहणे अशक्य होते. मराठ्यांचे वर्चस्व पूर्वेस कटक, पश्चिमेस काठियावाड, उत्तरेस दिल्ली आणि दक्षिणेस तंजावर याप्रमाणे चारी दिशांत पसरत गेले. मराठ्यांच्या खऱ्या प्रदेशात राष्ट्र, सैन्य, अधिकारी आणि राजे हे सर्व एकाच हाडामांसाचे असल्यामुळे ते परस्पर निष्ठेच्या सूत्राने बांधले गेले होते. हिंदुस्थानाच्या दूरच्या प्रदेशांत हा प्रकार अशक्य होता. महाराष्ट्राबाहेरच्या प्रदेशातील लोक व मराठे सैनिक यांच्यात भिन्नता होती. पुष्कळदा जिंकलेल्या मुलखांतील मराठ्यांच्या फौजा या फक्त नावालाच मराठ्यांच्या होत्या. बहुधा तेथील पोटभरूंच्या भरतीने त्या फौजा उभारल्या जात. वरचे अधिकारीच काय ते मराठे. अशा पोटभरू सैनिकांमध्ये आपल्या वरिष्ठ अंमलदारांविषयी किंवा केंद्रीय सत्तेच्या प्रतिनिधींविषयी आपण सारे एकच या भावनेची निष्ठा नसे. यावरून हे लक्षात येईल, की शिवाजीच्या संस्था देशाच्या सर्व भागांत कार्यक्षम राहण्यासारख्या लवचीक नव्हत्या, उदाहरणार्थ, पहाडी किल्ले आणि त्यांच्या अधिकारातील मैदाने हा प्रकार इतक्या संकुचित स्थानिक स्वरूपाचा होता, की तो गुजरात किंवा माळवा किंवा महाराष्ट्राच्या पूर्वेकडील जिल्हे या भागात राज्यकारभाराच्या दृष्टीने अव्यवहार्य होता. शिवाजीने जमाबंदी साक्षात सरकाराच्या हाती घेतली. मक्तेदार व जमीनदार हे काढून टाकले. ही व्यवस्था जेथील राज्यपरंपरा या व्यवस्थेला विरोधी होती, त्या प्रदेशात चालू करणे अशक्य होते. या व इतर काही बाबतींत शिवाजीच्या राज्यव्यवस्थेविषयी प्रतिकूल मताला सवड दिली तरी एकंदर परिणामाचा विचार केल्यास शिवाजीच्या राज्यकारभाराला सोडचिठ्ठी दिल्याने नुकसान झाले हे कबूल करावेच लागेल. ...

शिवाजीच्या मागून राज्यावर आलेल्या माणसांना त्याच्या (मूळ) योजनेतील शहाणपणा समजला नाही, ते आपल्या वेळच्या सोईंना बळी पडले. याचा परिणाम म्हणजे शिवाजीने निर्माण केलेले संघटित ऐक्य जाऊन त्याची जागा अगदी शिथिल बंधनाने एकत्र असणाऱ्या असंघटित जमावाने घेतली. हा जमाव इतिहासातील आणीबाणीच्या पहिल्या धक्क्याने अस्ताव्यस्त होऊन गेला; याप्रमाणे शिवाजीच्या कारभारावर पाणी सोडणाराबद्दल बोलता येईल. ...

या विवेचनावरून असे दिसून येणार आहे, की शिवाजीने राज्यकारभाराकरिता जी तत्त्वे ठरवली होती ती त्याच्या वारसांनी सोडल्यामुळे आपल्याला मराठ्यांच्या सत्तेचा दुबळेपणा व ऱ्हास यांच्या कारणांचा, ब्रिटिश सत्तेशी संघर्ष होण्यापूर्वीच्या काळातच

छडा लावता येतो. ब्रिटिशांची सत्ता श्रेष्ठ ठरल्यावर तिने शिवाजीच्या तत्त्वांना बुद्धीपुरस्सर मान देऊन त्याच्या वारसांच्या राज्यव्यवहाराचे धोरण उपेक्षिले. ब्रिटिशांच्या हिंदुस्थानातील राज्यात मुलकी आणि लष्करी कारभार वेगळे ठेवलेले असून लष्कर हे मुलकीच्या नियंत्रणात राहावे अशी व्यवस्था आहे. त्या सत्तेचा भर नोकरीचे वेतन रोकडीने चुकते करण्यावर असून लष्करी किंवा इतर नोकरीनिमित्त जमिनी इनाम देण्याच्या ती (ब्रिटिश सत्ता) सपशेल विरुद्ध आहे. लहान किंवा मोठ्या नोकरीच्या संबंधात वंशपरंपरेचे हक्क ही सत्ता कबूल करत नाही. बोर्ड व कौन्सिले यांच्याद्वारे राज्यकारभार चालतो. कोणत्याही एका राज्यकर्त्याच्या स्वैर मनोगताने तो चालत नाही. शेतसारा पगारी हस्तकामार्फत वसूल केला जातो. जुने जमीनदार किंवा मक्तेदार यांना मक्ते दिले जात नाहीत. सरकारी नोकऱ्या प्रजेच्या सर्व वर्गांतील माणसांमध्ये वाटल्या ज़ातील अशी तरतूद ब्रिटिशांनी केलेली आहे. राज्य चालवण्याचे प्रमुख धोरण पाळले जात असल्यामुळे मूठभर इंग्रज माणसे सर्व देशावर अंमल गाजवतात आणि त्यांच्या कारभाराचा अभ्यास करणाऱ्या देशी-विदेशी माणसांना इंग्रजांच्या मुत्सद्देगिरीची ही एक विलक्षण करामत आहे असे वाटते. शिवाजीच्या तत्त्वाच्या शहाणपणाची तरफदारी त्याला मिळालेल्या यशाने होतेच पण जे मराठा मंडळ जुटीने राहावे म्हणून शिवाजीचा प्रयत्न होता व जे शिवाजीची मार्गदर्शक तत्त्वे त्याच्या वारसांनी सोडल्यामुळे मोडले, त्या मराठा मंडळाच्या नाशावर ज्यांनी आपली सत्ता उभी केली त्याची यशस्वितासुद्धा शिवाजीच्या शहाणपणाला उचलून धरणारी आहे.



(मूळ ग्रंथ : 'Rise of the Maratha Power' यामधून संक्षेपाने)



# ३. शककर्ता शिवाजी

## गोविंद सखाराम सरदेसाई

कोणत्याही दोन ऐतिहासिक व्यक्तींची तुलना हुबेहूब जुळणे शक्य नाही तथापि, अशा तुलनेपासून वर्ण्य व्यक्ती मनात ठसण्यास मदत होते. शिवाजी अनेक बाबतींत लोकोत्तर पुरुष होऊन गेला. त्याने आपल्या राष्ट्राचे गुणावगुण बरोबर ओळखून लोकांचा स्वाभिमान जागृत केला आणि त्यांची एकी करून त्यास नानाविध पराक्रम करण्यास उद्युक्त केले. शिवाजीपेक्षा जास्त पराक्रम गाजवणारे किंवा जास्त देश जिंकून त्याजवर राज्य करणारे पुरुष इतिहासात पुष्कळ आढळतील; पण त्याच्याइतका गुणसमुच्चय एका व्यक्तीत एकत्रित झालेला सहसा आढळत नाही. फार काय शिवाजीत अमुक एक दोष दाखवा असा प्रश्न कोणी केल्यास आपणांस बहुधा निरुत्तर व्हावे लागते.

ग्रीसचा सिकंदर बादशहा इतिहासात मोठा पराक्रमी गणला जातो, परंतु सिकंदरास सर्व जग जिंकण्याची हाव होती. जिंकलेल्या प्रदेशाची सुधारणा करून राज्यव्यवस्था ठरवण्यात त्याने लक्षच घातले नाही. शिवाजी त्याच्यासारखा जगज्जेतृत्वासाठी किंवा दिगंत कीर्तीसाठी हपापलेला नव्हता. शिवाय सिकंदराच्या बापाने अगोदरच मोठे राज्य कमावून ठेवलेले होते, तशी गोष्ट शिवाजीची नव्हती. तसेच शहर काबीज केल्यावर तेथच्या लोकांची नाहक कत्तल करणे, अमोलिक ग्रंथसंग्रह जाळून टाकणे, शरण आलेल्या बंदिवानास यमसदनी पोचवणे व सुरादेवीच्या भक्तीत बेफाम होणे, असली घोर पापे शिवाजीस कधीही शिवली नाहीत. प्रसिद्ध रोमन सरदार जूलिअस सीझर व शिवाजी यांच्यात वरच्याहून जास्त साम्य आहे. दोघेही धोरणी, राजकारणकुशल व व्यवस्थित होते, पण सीझरही जगज्जेतृत्वाच्या हावेपासून अलिप्त नव्हता. रोमन राष्ट्राच्या विस्तृत व संपन्न पायावर सीझरने पराक्रम गाजवणे व मुळात काहीच नसता शिवाजीने आपल्या राष्ट्रास स्वातंत्र्य प्राप्त करून देणे, यांत पुष्कळ फरक आहे.

युरोपच्या इतिहासातील तिसरा मोठा पुरुष नेपोलियन बोनापार्ट होय. शिवाजी व बोनापार्ट यांजमध्ये जरी अनेक बाबतींत पुष्कळ विरोध आहे, तरी दोघांमध्ये साम्यही बरेच आहे. निष्ठा व कल्पक बुद्धी, लोकांवर छाप बसवण्याची विलक्षण हातोटी, राष्ट्र ऊर्जितावस्थेस आणण्याची अनावर उत्कंठा इत्यादी महान पुरुषास अवश्य लागणारे गुण दोघांच्याही ठिकाणी वसत होते, पण फ्रेंच राज्यक्रांतीने तयार केलेले आयते वातावरण नेपोलियनास मिळाले आणि शिवाजीने तसे वातावरण स्वतः निर्माण केले. हा फरक ध्यानात ठेवला पाहिजे. अठराव्या व एकोणिसाव्या शतकांत युरोपीय राष्ट्रांचे शिक्षणही निराळ्या तऱ्हेचे होते. ह्यामुळे हरएक विषयात नाव गाजवण्यास बुद्धिमान पुरुषास युरोपात जसा अवकाश होता, तसा हिंदुस्थानात नव्हता. अर्थात मोठमोठे विजय संपादून दिगंत कीर्ती मिळवण्याची सवड बोनापार्टास युरोपात मिळाली, तशी शिवाजीस हिंदुस्थानात मिळाली नाही. ... नैसर्गिक बुद्धिमत्ता व जगाचा विस्तृत अनुभव एवढ्यावर शिवाजीने आपली कमाई केली. फ्रान्ससारख्या संपन्न देशात विद्या, कला, लोकोपयोगी कामे

इत्यादी विषयांत नवीनच सुधारणा करून देशास ऊर्जितावस्था प्राप्त करून देणे व सभोवारच्या इतर राष्ट्रांस भावी उन्नतीचा मार्ग दाखवणे यात बोनापार्टास जी संधी मिळाली, ती हिंदुस्थानच्या तत्कालीन परिस्थितीत शिवाजीस शक्यच नव्हती. ऑस्ट्रिया, रशिया, प्रशिया, इंग्लंड इत्यादी रणशूर राष्ट्रांशी घनघोर संग्राम करण्याचे अनेक प्रसंग बोनापार्टास आल्यामुळे त्याच्याकडून युद्धकलेस जसे नवीनच स्वरूप प्राप्त झाले, तसे शिवाजीच्या हातूनही थोडेबहुत झाले, तेच पुढे पेशवाईत वृद्धी पावले.

दुसऱ्या कित्येक गोष्टींत शिवाजी बोनापार्टाची बरोबरी करू शकेल. इतकेच नाही, तर काही बाबतींत तो महत्तर दिसतो. नेपोलियनची इच्छा जरी बुध्या प्राणहानी करण्याची नव्हती, तरी परिणामी त्याच्या संग्रामांनी भयंकर प्राणहानी झालेली आहे. शिवाजीच्या हातून तशी प्राणहानी झाली नाही. स्वतःविषयी अनावर महत्त्वाकांक्षा नेपोलियनच्या ठिकाणी होती, परंतु राष्ट्रहितापुढे स्वतःची महती शिवाजी मुळीच समजत नसे. नवीन फौज तयार करणे, किल्ले वगैरे प्रचंड कामे तयार करून देशाचा बंदोबस्त करणे, देशात सुरळीत राज्यव्यवस्था व आबादानी करणे, ह्या बाबतींत शिवाजी नेपोलियनइतकाच कल्पक व दूरदृष्टीचा दिसतो. नेपोलियनच्या पराक्रमाचा पाया फ्रान्ससारख्या संपन्न देशावर निर्माण झाला. शिवाजीपाशी मुळात काहीच नव्हते. सर्व देश परचक्राखाली दडपून गेलेला होता. अशा स्थितीत शिवाजीने परचक्रातून स्वराष्ट्रास सोडवून त्यास भाग्योदय प्राप्त करून दिला आणि मूळचाच स्वतंत्र असलेला फ्रान्ससारखा सुशिक्षित व सुसंपन्न देश नेपोलियनने महत्पदास चढवला, यात काही अंशी शिवाजीचीच कर्तबगारी जास्त आहे. शिवाजीचे खासगी वर्तन अत्यंत निर्मळ व पवित्र होते, तसे नेपोलियनचे नव्हते. अनावर महत्त्वाकांक्षा व जबरदस्त बुद्धिमत्ता यांच्या योगाने बोनापार्टने युरोपीय राष्ट्रांचे प्रखर वैर मात्र संपादिले; पण भलतीच महत्त्वाकांक्षा धारण न केल्यामुळे, शिवाजीचे शत्रूसुद्धा निष्प्रभ होऊन, त्याच्या स्नेह संपादून राहू लागले, हा त्याच्या सौजन्याचा प्रभाव होय.

वास्तविक शिवाजीशी तुलना करण्यास सर्व बाजूंनी साजेल असा पुरुष सापडणे कठीण आहे. काही अंशी मोगल बादशाहीचा संस्थापक बाबर बादशहा याच्याशी शिवाजीचे साम्य आहे. बाबराचे वडिलोपार्जित राज्य लयास गेले होते. शिवाजीप्रमाणेच त्याचे आयुष्य विपत्तीत गेले. अंगचे अप्रतिम साहस, बुद्धिमत्ता व सोशिकपणा या गुणांच्या जोरावर त्याने उत्तर हिंदुस्थानची बादशाही कमावली. शिवाजीप्रमाणेच बाबरही आईच्या अर्ध्या वचनात असे. बाबर शूर असून राज्यकारभारातही काही कमी नव्हता. शिवाजीसारखाच तोही अल्पायुषी झाला व तो जास्त दिवस जगता तर कदाचित त्याचाही लौकिक मोठा झाला असता. तथापि बाबरही परदेश जिंकण्याच्या दोषापासून मुक्त नाही. बाबराप्रमाणे शूर व सोशिक, अकबराप्रमाणे सर्वांवर समदृष्टी ठेवून राज्यकारभाराची व्यवस्था करण्यात कुशल, शहाजहानप्रमाणे काटकसर करून प्रजेच्या सौख्यात दंग असणारा असा शिवाजी हा प्रतापी मोगल बादशहांच्या अनेक गुणांचा निष्कर्ष होता. बाबर व अकबर यांप्रमाणे शिवाजीने स्वतः संकटे भोगली असल्यामुळे,

गरिबांचे हाल कसे असतात, हे तो चांगले समजत असे. जहांगीर किंवा शहाजहानप्रमाणे शिवाजी ऐषआरामी नव्हता; आणि ऐषआराम करण्यास वडिलांनी केलेली कमाई शिवाजीपाशी नव्हती. औरंगजेबाची जबरदस्त उद्योगशीलता शिवाजीच्या ठिकाणी असूनही कपट व विश्वासघात यांच्या योगाने औरंगजेबाचा नाश झाला, ते दुर्गुण शिवाजीस शिवले नाहीत. सारांश, शिवाजीशी तुलना करण्यास साजेल असा एकही पुरुष इतिहासात सापडणे कठीण आहे. इतक्यावरूनच तो लोकोत्तर पुरुष होता असे म्हटले पाहिजे.

इंग्लंडचे इतिहासातही शिवाजीसारखा पुरुष झाला नाही. इंग्लंडात स्वराष्ट्रास स्वातंत्र्य मिळवून देण्याचे कृत्य नवव्या शतकाचे अखेरीस आल्फ्रेड राजाने केले. त्या वेळी डेन्स लोकांनी सर्व इंग्लंड देश आक्रमून टाकला होता; त्यांजपासून थोडासा प्रदेश परत मिळवून आल्फ्रेडने स्वदेशाची बाजू राखली आणि कित्येक लोकोपयोगी कामे केली. त्याबद्दल त्यास 'थोर' ही पदवी देण्यात आली आहे. त्यामानाने पाहता शिवाजीची कामगिरी आल्फ्रेडपेक्षा पुष्कळच जास्त योग्यतेची असल्यामुळे थोर अगर त्याहून श्रेष्ठ असे पद त्यांस सर्वथैव योग्य आहे. आल्फ्रेडनंतर इंग्लंडवर परचक्र आले नाही असे नाही. डेन्स लोकांनीच तो देश पुनरपि जिंकला आणि पुढे फ्रान्सातून नार्मन लोकांनी येऊन तो देश संपूर्णपणे काबीज केला. तेव्हा इंग्रज लोकांस काहीच उपाय न राहिल्यामुळे शेवटी ते नार्मन लोकांत मिसळून गेले आणि तसे संमेलन होण्यास त्यांस साधनेही विपुल होती. आल्फ्रेडपेक्षा एका अर्थाने स्कॉटलंडच्या रॉबर्ट ब्रूसशी शिवाजीची तुलना शोभण्यासारखी आहे. अमेरिकेतील संयुक्त राज्याचा संस्थापक वॉशिंग्टन याजशी थोड्याबहुत अंशाने शिवाजीची तुलना करता येईल. तसेच युरोपच्या इतिहासात हॉलंड देशास स्वातंत्र्य मिळवून देणारा ऑरेंजचा सरदार, पहिला वुइल्यम याजशी शिवाजीची तुलना बऱ्याच अंशी शोभण्यासारखी आहे.

राजवाडे लिहितात, ''शिवाजीचे वर्तन न्यायाचे, नीतीचे, पराक्रमांचे, स्वधर्मपरायणतेचे व परधर्मसहिष्णुतेचे होते. अनेक लढायांत विजय संपादन करणे, मैदानात, समुद्रतीरावर किंवा डोंगरावर तीन-चारशे किल्ले बांधणे; नवीन सैन्य तयार करणे, नवीन आरमार निर्मिणे, नवे कायदे करणे, स्वभाषेला उत्तेजन देणे; कवींना आश्रय देणे; नवी शहरे वसवणे; स्वधर्म स्थापन करून त्याचे ऐश्वर्य वाढवणे; सारांश, स्वराष्ट्राचा उद्धार करून स्वदेशाला स्वतंत्र व सुखी करणे; या लोकोत्तर कृत्यांनी जर कोण्या पुरुषानेच या भूमंडळाला अक्षय ऋणी करून ठेवले असेल, तर ते शिवाजीनेच होय. शिवाजीची खासगी वर्तणूक व सार्वजनिक पराक्रम इतके लोकोत्तर होते, की त्यांच्याशी तुलना करण्यास जी जी म्हणून व्यक्ती घ्यावी ती ती या नाही त्या गुणाने शिवाजीहून कमतरच दिसेल. या अवतारी पुरुषाविषयी लिहिता लिहिता समर्थ म्हणतात, तयाचे गुणमहत्त्वासी तुलना कैंची! 'यशवंत, कीर्तिवंत, सामर्थ्यवंत, वरदवंत, नीतिवंत, जाणता, आचारशील, विचारशील, दानशील, कर्मशील, सर्वज्ञ, सुशील, धर्ममूर्ती, निश्चियाचा महामेरू, अखंड निर्धारू, राजयोगी अशी नाना प्रकारची विशेषणे शिवाजीला रामदासांनी लावली आहेत. निःस्पृही व स्पष्टवक्त्या अशा समकालीन ग्रंथकाराने हे गुणवर्णन





केलेले आहे हे लक्षात घेतले असता, शिवाजीच्या अंगी असलेल्या जाज्वल्य गुणांच्या इयत्तेचा अंदाज सहजासहजी करता येतो; व कित्येक इंग्रज व मुसलमान बखरकारांनी या महापुरुषाची निंदा केलेली पाहून त्यांच्या मनातील कुत्सितपणाचा ठाव घेण्यास संधी मिळते.''

ज्या पुरुषास कधी कोणतेही दुर्व्यसन शिवले नाही, ज्याने परस्त्रीस मातेसमान मानले, ज्याने स्वधर्माप्रमाणेच परधर्मास आदर दाखवला, ज्याने युद्धात पाडाव केलेल्या शत्रूचे लोकांस त्यांच्या जखमा बऱ्या करून स्वगृही पोचवले, ज्याने फौज, किल्ले, आरमार इत्यादी योजनांनी स्वदेशसंरक्षणाची योग्य तजवीज करून ठेवली, ज्याने सर्वांचे आधी स्वतः संकटात उडी घालून आपल्या लोकांस स्वदेशाची सेवा करण्यास शिकवले, ज्याने अनेक जिवावरच्या प्रसंगी केवळ बुद्धिसामर्थ्याने स्वतःचा बचाव केला, ज्याने औरंगजेबासारख्या प्रतापी बादशहाचे भगीरथ प्रयत्न सतत तीस वर्षे पावेतो यत्किंचित चालू दिले नाहीत, इतकेच नव्हे, तर तीन राज्यांचा पाडाव करून अखिल भरतखंडांत अपूर्व असे स्वराष्ट्राचे स्वतंत्र राज्य स्थापन करून, त्याची कीर्ती पृथ्वीवर अजरामर करून ठेवली; त्या प्रतापी व पुण्यशील पुरुषाची योग्यता पूर्णपणे वर्णन करण्यास कोण समर्थ आहे! पुण्यास प्रत्यक्ष राहत्या वाड्यात पाच वर्षे पावेतो औरंगजेबाचे सुभेदार तळ देऊन बसले, तेव्हा त्याची ती मगरमिठी सुरतेचे नाक दाबून मोठ्या युक्तीने शिवाजीने सोडवली, या त्याच्या युद्धकौशल्याची इतिहास सदैव तारीफच करत राहील. कोणास कधी जागिरी अगर जमिनी तोडून न देणारा, न्यायाचे कामात कोणाची भीडमुर्वत न धरणारा, दुष्टांचा काळ पण गरिबांचा कनवाळू, एकंदर रयतेस पोटच्या मुलांप्रमाणे वागवणारा, सदैव सावध व उद्योगी, नेहमी मातेच्या अर्ध्या वचनात राहून अहर्निश राष्ट्राची चिंता वाहणारा; स्वदेश, स्वभाषा व स्वधर्म या विविध संपत्तीचे संगोपन करणारा, पापभीरू परंतु रणशूर, असा हा आधुनिक काळाचा अद्वितीय राज्यसंस्थापक छत्रपती शिवाजी, प्राचीन पुण्यश्लोकांचे पंक्तीस बसण्यास सर्वथैव पात्र आहे.

❑❑❑

(मराठी रियासत : 'खंड १' यामधून संक्षेपाने)



# ४. छत्रपती शिवाजीमहाराजांचे गुणसंकीर्तन

## कृष्णराव अर्जुन केळूसकर

शिवाजी महाराजांच्या उज्ज्वल चरित्राचे कथन (आम्ही) उपलब्ध माहितीच्या आधाराने साधेल तेवढे सुसंगत केले आहे, त्याचे पर्यालोचन करणारांस त्यांच्या ठायी कोणकोणते गुण वाखाणण्यासारखे होते व शत्रूंनी त्यांच्यावर जे दोष लादण्याचा प्रयत्न केला आहे त्यात किती तथ्य आहे, हे सहज समजण्यासारखे आहे. तथापि, अभियुक्त ग्रंथकारांच्या पद्धतीस अनुसरून या गुणदोषांचे यथातथ्य स्वरूप सामान्य वाचकांच्या सोयीसाठी एकवटीने निदर्शित करणे उचित दिसते. ... आता मुख्य कथाभाग आटोपल्यावर कथानायकांच्या ठायी कोणते गुणावगुण होते व तच्चरितश्रवणाने महाराष्ट्रीयांस किंबहुना अखिल भारतवर्षीयांस कोणता बोध प्राप्त होण्यासारखा आहे, याचे दिग्दर्शन यथामती करण्याचा अधिकार चरित्रकारास आहे; हे जाणून हा पुढील गुणदोषांचा आढावा वाचकांपुढे मांडिला आहे. ...

**गुणज्ञता व निःपक्षपातबुद्धी :** लोकसंग्रह करणारा प्रभू खरा गुणज्ञ व गुणांची बूज करणारा असला पाहिजे. महाराजांच्या ठायी ही गुणग्राहकता अलौकिक होती. प्रत्येकाच्या अंगच्या वास्तविक गुणांची पारख करून त्यास यथोचित कामगिरी सांगावी व त्याच्या अंगच्या वर्धमान योग्यतेच्या मानाने त्याची बढती केवळ निःपक्षपातबुद्धीने करावी असा त्यांचा अव्याहत क्रम असे. हा आपला मित्र किंवा हा आपला सुहृत्संबंधी आहे, याला मोठ्या मानाची किंवा मोठ्या किफायतीची कामगिरी सांगावी असा पक्षपाताचा काहीसा प्रकार त्यांच्या हातून कदापि घडत नसे. खऱ्या लायक माणसांच्या हक्कांचा विचार करून तंतोतंत न्यायाने त्यांची योग्यता वाढवावी असा त्यांचा नियम असे. ह्यामुळे ज्याला त्याला अशी पूर्ण खात्री असे, की आपल्या गुणांचा व कर्तृत्वाचा योग्य विचार करून आपली बढती करणारा असा हा खरा गुणज्ञ प्रभू आहे. दुसरा एक उत्कृष्ट गुण ह्या लोकनायकाच्या अंगी असा वसत असे, की आपल्या पदरच्या लोकांच्या ठायी विश्वासूपणा उत्पन्न करण्याची हातोटी त्यांस उत्तम साधलेली असे. कोणालाही एखादे कितीही महत्त्वाचे काम सोपवल्यावर ते बजावण्यासंबंधीने त्याच्यावर ते पूर्ण भरवसा टाकत असत. प्रथमतः असा भरवसा ठेवण्यास तो मनुष्य लायक आहे किंवा कसे हे नीट पाहायचे आणि मग एकदा त्याच्यावर भरवसा टाकला म्हणजे त्याच्याविषयी सहसा संशय घ्यायचा नाही, असा त्यांचा क्रम असे. त्याच्या संबंधाने कोणी द्वेषी किंवा मत्सरी मनुष्याने महाराजांचे मन कलुषित करीन म्हटले तर त्याची त्यांच्या कानास लागण्याची प्राज्ञा नसे. अशा मनुष्यास आपल्या वाऱ्यासही ते घेत नसत. कोणाच्या लौकिक वर्तनाविषयी अंमळ संशय आला असता त्याची माहिती ते आपल्या गुप्त हेरांद्वारे पहिल्याने मिळवत आणि मग त्यासंबंधाचा वास्तविक पुरावा

काय आहे तो राजरोस रीतीने पाहून त्याची योग्य शहानिशा करत. ह्या त्यांच्या वृत्तीस्तव त्यांच्या पदरच्या लहानमोठ्या सर्व कामदारांस असा पक्का भरवसा असे, की आपण आपली कामे नेकीने व दक्षतेने केली असता आपणांस आपल्या हुद्द्यावरून दूर होण्याची भीती ह्या प्रभूकडून कदापि नाही. हा असा प्रत्येकावर पूर्ण भरवसा टाकल्यामुळे व त्याला आपल्या हुद्द्याविषयीची निश्चित शाश्वती वाटत असल्यामुळे लोकांच्या ठायी इमान, स्वामिनिष्ठा, स्वकार्यदक्षता इत्यादी वृत्तींचा विकास होत गेला.

**निष्कपटीपणा व मित्रभाव :** लोकसंग्रह करणाऱ्या लोकनायकाच्या हातून पदरच्या लोकांशी निष्कपटीपणाचे व मित्रत्वाचे वर्तन होणे इष्ट असते. ह्यासंबंधाने तर महाराजांचा हातखंडा असे. ज्यावर एक वेळ इतबार टाकला त्याच्याशी ते कदापि कपटाने वागत नसत. आपण योजलेले बेत व तत्सिद्ध्यर्थ करायचे उपाय ह्यांविषयीचा खल ते आपल्या विश्वासू कामदारांशी केवळ प्रांजल बुद्धीने करत असत. त्यांची काय मसलत असे ती ते आदरपूर्वक ऐकून घेत असत. आत एक व बाहेर एक असे त्यांचे आपल्या लोकांशी कधीही वर्तन नसे. तसेच अधिकाराच्या जोरावर कोणाशी दिमाखाचे किंवा गर्वाचे वर्तन ते कधीही करत नसत. आपल्या हाताखालचे लोक आपल्या मित्रांसमान आहेत असे समजून त्यांच्याशी ते खऱ्या स्नेहभावाने वर्तत असत. कोणाचा उपमर्द किंवा मानहानी ते सहसा करत नसत. ह्याप्रमाणे स्वकीय जनांशी त्यांचे सदोदित आचरण असल्यामुळे ज्याला त्याला असे वाटे, की आपला स्वाभिमान व इभ्रत कायम राखून ह्या प्रभूची सेवा आपणांस करता येईल आणि त्यांच्या स्नेहयुक्त वर्तनामुळे प्रत्येकाच्या ठायी त्यांजविषयी प्रेम व अभिमान ह्या वृत्ती उत्पन्न होत असत.

**जरब :** महाराज ह्याप्रमाणे आपल्या अधिकाऱ्यांशी मित्रभावाने व आदराने वागत असत, तरी त्यांची त्यांजवर जरबही पराकाष्ठेची असे. महाराज आपला इतका मानमरातब राखतात व आपणाशी स्नेहभावाने वागतात एवढ्यावर जाऊन कोणी कारभाऱ्याने शिरजोर होऊ पाहिले किंवा आपल्या कामात कुचराई केली, तर त्यास महाराजांकडून कदापि गय होत नसे. तो केवढाही मोठा अंमलदार असला तरी त्यास त्याबद्दल योग्य शासन करण्यास ते कधीही चुकत नसत. ह्यामुळे त्यांचा दरारा सर्वांवर सारखा असे आणि त्यांस असे वाटे, की ह्या प्रभूंची सेवा इमानाने व हुशारीने केली तरच ह्यांची कृपा आपणावर कायम राहील. हा असा त्यांचा करडा अंमल असल्याकारणाने त्यांस इतक्या लोकांवर पूर्ण ताबा चालवता येऊन त्यांच्याकडून हवी ती कामगिरी करवून घेता आली.

**उद्यमशीलता :** हा असा दरारा राहण्यास आणखी एका गोष्टीची महाराजांस पूर्ण अनुकूलता असे. ती गोष्ट ही, की त्यांस स्वत: अंग मोडून मेहनत करण्याची लहानपणापासून सवय असून राज्यप्राप्तीस व राज्यव्यवस्थेस लागणाऱ्या हरएक गुणाचा व कर्तबगारीचा विकास त्यांच्या ठायी उत्तम प्रकारे झाला होता. रणभूमीवर शत्रूशी

लढताना आपल्या सैनिकास शत्रूच्या तोंडी देऊन स्वत: कोठेतरी सुरक्षित जागी प्रेक्षकाप्रमाणे उभे राहण्याचा जसा कित्येक सेनापतींचा किंवा राजांचा क्रम असतो, तसा प्रकार महाराजांकडून कदापि होत नसे. हाती समशेर घेऊन रणकंदनात ते सर्वांच्या पुढे असत व आपल्या अंगचे अप्रतिम शौर्य, वीर्य व युद्धकौशल्यही प्रकट करत. तेणेकरून त्यांच्या पदरच्या कोणाही वीरास महाराजांपेक्षा आपल्या अंगी हे गुण अधिक आहेत अशी घमेंडी मिरवण्यास बिलकुल अवकाश नसे. त्याप्रमाणेच आपल्या सेनापतीस मुलूखगिरीवर किंवा एखाद्या स्वारीवर पाठवून आपण स्वस्थ मजा मारत असावे असा क्रम बहुतेक नृपतींचा असतो. त्यामुळे विजयशाली सेनापतींचे प्रस्थ त्यांच्या राज्यात पराकाष्ठेचे माजते व अशा सेनापतींच्या मुठीत असले राजे बहुतकरून असतात; परंतु महाराजांच्या हातून असा प्रकार आमरण झाला नाही. ते स्वत: कोणत्या ना कोणत्या मोहिमेत सर्व काळ गुंतलेले असत. आळश्यासारखे स्वस्थ बसून राहण्यास त्यांना मुळी सवडच नव्हती. अशा उद्योगसातत्यामुळे व अविश्रांत परिश्रमामुळे त्यांनी आपणावर कोणाही सेनापतीची किंवा सरदाराची मात्रा चालू दिली नाही. आपण निरनिराळ्या मोहिमा करून जे पराक्रम गाजवतो त्यापेक्षा कांकणभर जास्त पराक्रम महाराजांच्या हातून घडतात असे पाहून त्यास स्वत:चा दिमाख किंवा तोरा मिरवण्यास मुळीच जागा नसे. महाराजांपुढे आपण केवळ हीनपराक्रम आहो असे त्यास सर्वदा भासे. असाच प्रकार राज्यव्यवस्थेसंबंधानेही असे. किल्ल्यांचा बंदोबस्त, जमीनमहसुलाची सुव्यवस्था, बिकट कारस्थाने रचण्याच्या कामी लागणारी युक्तिमत्ता इत्यादीकांसंबंधाने त्यांच्या पदरच्या कोणाही मुत्सद्द्यास त्यांजवर शेखी मिरवण्यास मुळी सवड नसे. हा असा अष्टपैलूपणा त्यांच्या अंगी पूर्णपणे वागत असल्यामुळे प्रत्येक कामदार त्यांच्यापुढे अगदी लीन व नम्र असे; व त्यांचा दरारा प्रत्येकास अतिविलक्षण वाटे. ह्याच सुप्रसिद्ध गुणास्तव त्यास रामदासस्वामींनी आपल्या पत्रांत सर्वज्ञ हे विशेषण दिले आहे.

**लोकवशीकरण :** तेव्हा एकंदरीत काय, की लोक वश करून घेऊन त्यांच्याकडून हवी ती कामगिरी इमानेइतबारे करवून घेण्याची कला जी महाराजांस इतकी अप्रतिम साधली होती तिची मीमांसा सदरी निर्दिष्ट केलेल्या गुणसमुच्चयाचा विकास त्यांच्या ठायी उत्तम झाला होता हे लक्षात आणल्याने होणारी आहे. ही लोकवशीकरणाची मोहिनी किंवा जादू त्यांस उत्तम साधली असल्यामुळे त्यांच्या पदरच्या सर्व कामदारांत इमान, स्वामिनिष्ठा व कर्तव्यदक्षता हे गुण उत्पन्न झाले असून त्यांची परस्परात नेहमी चढाओढ लागून राहिलेली असे. महाराजांकडून शाबासकी मिळवण्यातच त्यांस कृतकृत्यता वाटे. स्वामिकार्यी प्राणाहुती देण्याचा प्रसंग आला तरी त्यांचे त्यास काहीच वाटत नसे. अशा अलौकिक पुरुषाची सेवा काया वाचा मने करून करण्यातच आपले जीवितसाफल्य आहे असा त्यांच्या बुद्धीचा पूर्ण निर्धार झाला होता. पुढेपुढे तर महाराज कोणत्या पुण्यकृत्यांत गुंतले होते हे त्यांच्या लक्षात आल्यामुळे त्यांच्याशी बेइमानीचे किंवा

दग्याचे वर्तन केले असता महत्पाप होईल असे त्यांस वाटू लागले. ही अशी त्यांच्या ठायी महाराजांविषयी पूर्ण भक्ती व देशकार्याची खरी महती पूर्णपणे बिंबल्याकारणाने त्यांच्या हातून फंदफितुरी किंवा दगाफटका असा बिलकुल झाला नाही. महाराज आग्र्यास जाऊन तेथे अटकेत पडले व आठ-नऊ महिने पुन: स्वराज्यात आले नाहीत त्या वेळी किंवा कर्नाटकात मोहीम करून तिकडेच अठरा महिने ते गुंतून राहिले त्या वेळी त्यांच्या पदरच्या कोणाही मुत्सद्द्याने किंवा सरदाराने त्यांच्याशी दग्याचे वर्तन करण्याचे मनातही आणले नाही. हा त्या धामधुमीच्या काळी मोठाच चमत्कार समजला पाहिजे; परंतु महाराजांच्या ठायी लोकवशीकरणास लागणाऱ्या लोकोत्तर गुणांचा विकास कसा झाला होता हे लक्षात आणिले म्हणजे हे एवढे गूढ कोणासही वाटणार नाही.

**कल्पकता :** महाराजांच्या ठायीचा दुसरा मोठा ठळक गुण म्हटला म्हणजे अप्रतिम कल्पकता हा होय. हा गुण त्यांच्या अंगी इतका परिपूर्ण वसत नसता तर स्वराज्यसाधनाची बुद्धी त्यांस कदापि सुचली नसती. कारण असे पाहा की, यवनी अमलात दहाहजारी, वीसहजारी असे बलाढ्य मराठे सरदार नांदत असता व ते मोठमोठ्या जहागिरी वहिवाटीत असता, त्यांच्या मनात ही स्वराज्यसाधनाची कल्पना का उत्पन्न झाली नाही बरे? त्या सगळ्यांच्याच ठायी स्वातंत्र्यप्रीती, स्वधर्माभिमान व यवनसत्ताद्वेष ह्या वृत्ती वसत नव्हत्या असे कोण म्हणेल? त्याप्रमाणेच शौर्यपराक्रमादी गुणांचा त्यांच्या ठायी अभाव होता असे म्हणता येईल काय? तर ह्या सरदारांस ही बुद्धी का सुचली नाही बरे? ह्या प्रश्नाचे उत्तर एवढेच आहे, की त्यांच्या ठायी कल्पकता हा गुण फारसा वसत नव्हता. स्वराज्यसाधन कोणत्या उपायांनी करता येईल व त्यांपैकी काही उपाय प्रसंगी फसले असता दुसरे कोणते उपाय योजता येतील याचा योग्य विचार करून तदनुरूप वागण्यास लागणारी कल्पकता महाराजांच्या अंगी अल्पवयापासून विकसित झाली होती. ही कल्पकता मुख्यत्वेकरून बुद्धिमत्तेवर अवलंबून असते. महाराजांची बुद्धी, अतितीव्र असून त्यांस सर्व प्रकारची माहिती मिळवण्याचा हव्यास अमर्याद होता. ह्या चौकसपणामुळे त्यांचे ज्ञानभांडार सर्वदा परिपूर्ण असे. दुसऱ्यांच्या अनुभवांचे उत्तम साहाय्य घेऊन त्यात आपल्या प्रत्यक्ष अनुभवांची भर घालून, हे सर्व ज्ञान आपल्या दिलदप्तरात कायमचे नमूद करून ठेवण्यात त्यांची बरोबरी कोणाच्यानेही होणार नाही. हा फक्त स्मृतीचा गुण झाला; परंतु नुसती स्मरणशक्ती प्रबल असल्याने कल्पकता वाढत नसते. तिला विवेकशक्तीचे उत्तम साहाय्य हवे असते. ही विवेकशक्ती महाराजांच्या ठायी अतिप्रखर होती हे निर्विवाद आहे. ह्या स्मरणशक्तीच्या व विवेकशक्तीच्या अप्रतिम बलाने प्राप्त अनुभवाचा व ज्ञानाचा उद्दिष्ट कार्याच्या सिद्धीकडे विनियोग करता येऊन अलौकिक युक्तिमत्ता त्याच्या ठायी विकास पावली. एक युक्ती फसली असता दुसरी युक्ती योजावी, तीही फसली असता तिसरी योजावी, हताश होऊन कदापि बसू नये, असा त्यांचा नेहमी निर्धार असे. हा

निर्धार सर्वांसच साधत नसतो. ज्याच्या ठायी कल्पकतेच्या बलावर युक्तिप्रयुक्तींचा जसा काय अखंड झरा वाहत असतो त्यालाच तो साधतो. महाराजांनी हा अप्रतिम गुण अगदी आरंभापासून प्रगट केल्यामुळेच त्यांच्यावर त्यांच्याहून जाणत्या व अनुभवी लोकांची श्रद्धा ते अल्पवयी असताही इतकी निःसीम बसली. हा वयाने लहान परंतु बुद्धीने थोर आहे, अशी खात्री झाल्यामुळे त्यांच्या सकृद्दर्शनी असंभवी दिसणाऱ्या बेतास त्यांच्या आसपासचे लोक सर्वस्वी अनुकूल झाले. त्यांची कल्पना उत्तम असून ती साध्य करण्यास त्यांनी सुचवलेल्या युक्त्या यथायोग्य आहेत अशी त्या लोकांची पूर्ण खात्री झाली म्हणून ते त्यांच्याबरोबर आपले जीव धोक्यात घालण्यास सिद्ध झाले, असे एरवी होते ना. ह्या कल्पकतेच्या बलावर त्यांनी पुढे आपणावरील मोटमोठी अरिष्टे कशी निवारण केली हे त्यांच्या चरित्रात पदोपदी आढळून येते, किंबहुना त्यांच्या एकंदर कर्तृत्वाचे मूळ ह्या गुणांतच मुख्यत: आहे असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही. ह्या गुणांच्या साहाय्याने त्यांनी आपल्या पदरच्या लोकांच्या ठायी आपणाविषयी पुरा भरवसा उत्पन्न केला होता. म्हणूनच ते स्वराज्यसिद्धीच्या कामी आपल्या प्राणांचे स्वाहास्वधाकार करण्यास प्रवृत्त झाले. कोणता कसाही बिकट प्रसंग प्राप्त झाला तरी त्यातून पार पडून स्वकार्यसिद्धी करण्यास हवी असणारी युक्तिमत्ता ह्या लोकनायकाच्या ठायी परिपूर्ण आहे अशी खात्री त्यांच्या पदरच्या एकूणएक लोकांची होऊन ते पाहिजे तै धाडसाचे कृत्य करण्यास सर्वदा उद्युक्त असत.

**तेजस्विता व स्वाभिमान :** महाराजांच्या ठायींचा तिसरा वर्णनीय गुण म्हटला म्हणजे तेजस्विता हा होय. खरे तेजस्वी पुरुष जे असतात त्यांस दुसऱ्याची ताबेदारी बिलकुल सहन होत नाही. ते पुरे स्वाभिमानी असल्यामुळे स्वाभिमानास प्रतिकूल अशी जी परतंत्रता ती त्यास अगदी असह्य होते. स्वत:च्या पायावर उभे राहून काय ओलीकोरडी भाकर मिळेल तीत संतोष मानून राहण्यातच त्यास विशेष सुख वाटते. महाराजांच्या अंगी हा लोकोत्तर गुण वसत असल्याकारणाने स्वपित्याची परावलंबी स्थिती त्यांस मुळीच चांगली वाटली नाही. ती झुगारून देण्यात जीवितहानी होण्याचा संभव आहे हे ते पूर्णपणे जाणून होते; परंतु अशी श्ववृत्ती स्वीकारून यवनांनी तोंडावर टाकलेला तुकडा खात बसण्यापेक्षा जीवितसंशय पतकरला, असा त्यांच्या मनाचा धडा होऊन गेला होता. आपण अंगीकारलेल्या दुर्घट उद्योगांत हटकून यश येईल याची त्यांस आरंभी भ्रांतीच होती असे म्हणण्यास काही चिंता नाही; परंतु परतंत्रतामूलक ऐहिक धनसंपदा व सौख्य ही त्यांस अत्यंत तुच्छ वाटून त्यांनी ह्या उद्योगास मोठ्या धैर्याने व अढळ निश्चयाने हात घातला. प्राप्त स्थितीत सुख मानून राहावे असे म्हणणाऱ्या दादाजी कोंडदेवासारख्या पुरुषांनी त्यास त्या उद्योगापासून परावृत्त करण्याविषयी प्रयत्न केला; परंतु त्यांचा निश्चय अचल राहिला, पुढे प्रत्यक्ष त्यांच्यावर नाही तरी त्यांच्या प्रिय पित्यावर प्राणसंकट आले असता मुळीच न डगमगता त्यातून त्यांची

मुक्तता करण्याची त्यांनी अजब युक्ती योजली; परंतु स्वसंकल्प कदापि सोडला नाही. यात त्यांच्या ठायीचा तेजस्वीपणा चांगलाच व्यक्त होतो. ह्या गुणाच्या अनुषंगाने असणारा जो स्वाभिमान तो तर त्यांच्या अंगात ओतप्रोत भरला होता. मोगल दरबारात औरंगजेबासारख्या सार्वभौम बादशहाच्या पूर्ण तावडीत ते सापडले असताही तेथे झालेली मानखंडना त्यांस बिलकुल सहन झाली नाही. खरे वीरपुरुष जे असतात त्यांचा हा महाभूषणप्रद गुण होय. ह्या गुणाच्या अभावी पुरुष केवळ निर्माल्यवत होतो. कोणी आपला उपमर्द करू नये किंवा कोणी आपणांस दोष लावू नये किंवा तुच्छ लेखू नये, याविषयी महाराज अहर्निश जपत असत. म्हणून त्यांच्या हातून असे अलौकिक पराक्रम झाले. महातेजस्वी पुरुष राष्ट्राच्या अभ्युदयास कसे कारणीभूत होतात हे महाराजांच्या चरित्रावरून उत्तम प्रकारे प्रत्ययास येते. वीर्य, शौर्य, साहस आदी करून उज्ज्वल गुण व सदाचार, निर्व्यसनता इत्यादी नैतिक गुण यांचे मूळ या तेजस्वितारूप गुणांत आहे. कारण तेजस्वी पुरुष आपली तेजोहानी जेणेकरून होण्यासारखी असते ते सर्व हरप्रयत्नाने टाळून वास्तविक तेज जेणेकरून वृद्धिंगत होईल ते करण्यास सर्वदा तत्पर असतो. इतकेच नव्हे तर आपल्या ठायींच्या तेजाच्या प्रभावाने अन्य जन सुखी व समृद्ध करण्यास सर्वदा झटल्यानेच आपल्या जीविताचे साफल्य होईल असे त्यास वाटत असते. ही कसोटी लावून पाहता तीस महाराज किती उत्तम प्रकारे उतरतात हे मार्मिक वाचकास सांगावयास नकोच. सारांश काय, की महाराजांच्या ठायींच्या या तेजस्वितेमुळेच मुख्यत: आमच्या देशास काही काळ स्वातंत्र्य प्राप्त होऊन महाराष्ट्रीयांच्या ठायी काही विशेष आज आहे असे सर्व जगास विदित झाले.

**स्वप्रजावात्सल्य :** स्वप्रजावात्सल्य हा महाराजांच्या ठायींचा आणखी एक स्तुत्यर्ह गुण होय. शेतकरी, व्यापारी व उदमी यांचा उत्कर्ष व्हावा, त्यास कोणाकडून उपद्रव होऊ नये व त्यास योग्य न्याय मिळावा यासाठी ते आपल्या राज्याची सुव्यवस्था लावण्यास सर्वदा झटत असत. हा सर्व कारभार बिनबोभाट चालावा व कोणत्याही प्रकारची बेबंदाई होऊ नये म्हणून त्यांनी पूर्वी कोणाही नृपतीस न सुचलेली अशी अष्टप्रधानमंडळाची कल्पना काढली. राज्यातल्या निरनिराळ्या कारभाराची जबाबदारी निरनिराळ्या प्रधानांवर टाकून त्यांच्यावर एकंदर प्रधानमंडळाची व स्वत:ची जरब ठेवल्याने रयतेस सुख लाभेल असे त्यांच्या लक्षात आले म्हणून त्यांनी आपल्या अधिकाराची अशी समसमान वाटणी केली व आपल्या पदरच्या लायक पुरुषांची इभ्रत व दबदबाही चोहोंकडे स्थापित केला. प्रजेस अन्यायाने त्रास देणारा अधिकारी कितीही मोठा असला तरी त्यास शासन करायास ते कदापि चुकत नसत. त्यांच्या हातून कसा काय कारभार होतो हे पाहण्यासाठी मुख्य प्रधानाची तर त्यावर देखरेख असे. त्याशिवाय आणखी त्यांचे हेर स्वराज्यात जिकडे तिकडे सर्वकाळ हिंडत. त्यामुळे प्रत्येक अंमलदारास असे वाटे, की रयतेशी आपण यत्किंचितही अन्यायाचे वर्तन केले

तर त्याची वार्ता महाराजांस कळून योग्य चौकशी होऊन आपणांस शिक्षा होईल. हा धाक सर्व लहानमोठ्या अधिकाऱ्यांस सर्वकाळ असल्यामुळे महाराजांच्या रयतेस शांती व सुख यांचा अनुभव घडू लागला.

या प्रजावात्सल्याचे आणखी एक असे अंग असते, की राजाने आपल्या प्रजेला समतेने व नि:पक्षपातपणे वागवावे. यात तर महाराजांची बरोबरी करणारा प्रभू आजपर्यंत कोणीच झाला नाही असे म्हटल्यास अतिशयोक्ती होईल असे वाटत नाही. आपल्या अमलातील निरनिराळ्या जातींच्या लोकांस त्यांच्या मगदुराप्रमाणे राज्यातील कमी-जास्त महत्त्वाची कामे सांगून त्यांस संतुष्ट व सुखी करावे असा त्यांचा क्रम असे. केवळ आपले जातभाईच तेवढे आपल्या कृपेस पात्र आहेत असा पक्षपात त्यांच्या मनात कदापि वागला नाही. फार काय, पण त्यांच्या अमलातील यवनी प्रजेसंबंधानेही हा पक्षपात त्यांनी कधी केला नाही. जे यवन आपल्याशी इमानाने वागून त्यांवर सोपवलेली कामे दक्षतेने करतील असे वाटे, त्यास ते मोठमोठ्या कामगिऱ्या सांगून खूश राखत. या अशा नि:पक्षपाताच्या वर्तनामुळे त्यांच्या राज्यात फंदफितूर किंवा दंगेधोपे कधीही झाले नाहीत. सर्व जातींची प्रजा त्यांस देवासारखे पूज्य मानी.

**व्यावहारिक वर्तन :** आता महाराजांच्या व्यावहारिक वर्तनात कोणते गुण विशेषत: दृष्टीस पडत ते थोडक्यात सांगू. बखरकारांचे मुख्य लक्ष राजकीय घडामोडींकडेच असल्यामुळे त्यांनी महाराजांच्या व्यावहारिक आचरणाचा उल्लेख फारसा कोठे केलेला नाही, यास्तव यासंबंधाने विशेष काही सांगता येणार नाही, तरी ते आचरणाने फार शुद्ध असत. त्यांचा पोशाख नेहमी अगदी साधा असे. त्यांना कोणतेही व्यसन नसे. थट्टामस्करी व विनोद यांचा त्यांस पुरा तिटकारा असे. महाकवींची काव्ये व कथापुराणे ऐकण्याचा तेवढा नाद त्यांस असे. इतर कोणत्याही सुखविषयात ते रममाण होत नसत व तसे रममाण होण्यास त्यांना आमरण अवकाशही नव्हता. कोणीही गुणी मनुष्य किंवा विद्वान पुरुष आला असता त्याची योग्य संभावना करण्यास ते सर्वदा तयार असत. ज्या गुणी जनांचा आपणांस उपयोग होण्यासारखा असे त्यास ते योग्य वेतन देऊन पदरी ठेवून घेत. त्याप्रमाणेच आपल्या सुहृत्संबंधी जनांचा व इतर सरदार व राजे यांचा यथोचित आदरमान करण्यात ते सर्वदा दक्ष असत. सारांश काय की, ऐश्वर्यमद, सत्तामद इत्यादी अनन्वित वृत्ती त्यांच्या चित्तास कदापि शिवल्या नाहीत व त्यांच्या हातून कोणत्याही प्रकाराचा अनाचार किंवा अन्याय झाला नाही.

**कौटुंबिक वर्तन :** पूर्वसंकल्पास अनुसरून महाराजांच्या कौटुंबिक वर्तनासंबंधाने येथे दोन शब्द बोलले पाहिजेत; परंतु यासंबंधाने बखरकारांनी फारसा उल्लेख केलेला नाही. एवढे ऐश्वर्य व एवढी सत्ता केवळ स्वपराक्रमाने प्राप्त झाली असता त्याच्या गर्वाने फुगून जाऊन स्वमाता-पितरांचा व स्वबंधूंचा उपमर्द किंवा अवहेलना करण्याचे

निंद्य कर्म महाराजांसारख्या सत्ताधीशाच्या हातून कदापि झाले नाही. हे त्या काळच्या यवन बादशहांची स्थिती पाहता मोठे अलौकिक होय. ... महाराजांच्या ठायी एकंदर स्त्रीजातीविषयी अतिशयित आदरबुद्धी वसत होती. म्हणूनच त्यांचा आपल्या लष्करास सर्वदा असा हुकूम असे, की कोणाच्याही स्त्रियांस कदापि त्रास देऊ नये. यामुळे त्यांच्या लष्कराकडून कधी कोणाच्या स्त्रीवर जुलूमजबरी झाली नाही. खुद्द महाराजांनीच आपल्या एतद्विषयक आचरणाचा कित्ता आपल्या पदरच्या लोकांस अगदी अल्प वयापासूनच घालून दिला होता.

**लोकाग्रणींनी घेण्यासारखा बोध :** आता आपल्या लोकाग्रणींनी कोणता बोध घ्यावा ते सांगू. अखिल जनसमाजाच्या कल्याणासाठी किंवा विवक्षित जनवर्गाच्या उत्कर्षासाठी उपस्थित झालेल्या संस्थांचे चालकत्व ज्यांच्याकडे असते त्यांनी शिवाजीमहाराजांस उत्तम प्रकारे साधलेल्या लोकवशीकरणाच्या कलेचा अवलंब अवश्य केला पाहिजे. ... आमच्या देशांत अनेक धर्म प्रचलित असून सहस्रावधी जातींचे बंड अस्मार्त काळापासून चोहोंकडे माजले असल्याकारणाने येथील जनसमाजाचे सहस्रावधी खंडविखंड झाले आहेत. स्वधर्माभिमान व स्वजात्यभिमान यांचा लोकांच्या हृदयांत वरपगडा होऊन ते एकमेकांचा मत्सर व हेवा करत आहेत व एकमेकांस हीन व तुच्छ समजत आहेत. अशा स्थितीमध्ये सार्वजनिक कल्याणाचा हेतू धरून कोणी पुरुष पुढे सरसावले असता त्यांच्या मनातला हा आपपरभाव समूळ नष्ट झाला पाहिजे. केवळ आपल्या धर्माच्या किंवा आपल्या जातीच्या लोकांस तेवढे एकवट करून त्यांचे हित साधण्याचा उद्देश मनांत धरला असता त्यास इतर जनांचे साहाय्य कदापि मिळणार नाही. आरंभी ते काहीसे फसले तरी त्यांचा वास्तविक उद्देश काय आहे ते समजताच ते त्यास आपले अग्रणी समजणार नाहीत व त्याजवर विश्वास ठेवणार नाहीत, असे झाले म्हणजे संघशक्तीने होणारी कार्ये कदापि यशोलाभास येणार नाहीत. या बाबतीत महाराजांनी आमरण कसे वर्तन ठेवले होते ते सर्वदा लक्षात वागवण्यासारखे आहे. त्यांनी आपल्या सत्तेतल्या जनसमाजांतील अमुक एका जातीवर किंवा जनवर्गावर विशेष कृपादृष्टी न करता सर्वांस समबुद्धीने वागवले. ते लोकांच्या अंगच्या गुणांकडे व योग्यतेकडेच फक्त पाहात असत. त्यांची जात कोणती आहे किंवा त्यांचा धर्म कोणता आहे याचा विचार ते सहसा करत नसत. फार कशाला, यवनाविषयी आरंभी त्यांच्या मनात एवढी प्रबळ अढी होती तरी ती लवकरच नाहीशी होऊन त्यांस आपल्या पदरी ठेवण्यास ते तयार झाले. शिवाय त्यांच्या राज्यांत जी यवनप्रजा असे तिला ते इतर हिंदूप्रजेसारखीच वागवून धर्माच्या भिन्नत्वास्तव त्यांचा छळ किंवा तिरस्कार यत्किंचितही करत नसत. ही त्यांच्या ठायींची समता त्यांच्या त्या काळच्या समजुतीप्रमाणे व व्यवहाराप्रमाणे पाहता अत्यंत स्तुत्यर्ह होय. सांप्रत काळी विचारयुगाचा प्रभाव सर्वत्र इतका झाला असता हा आपपरभाव आमच्या पुढारी म्हणवणाऱ्या लोकांच्या चित्तांतून निर्मूळ होऊ नये हे चमत्कारिक नव्हे काय? ग्रंथ

लिहायचे, वर्तमानपत्रे व मासिके चालवायची, सार्वजनिक संस्था स्थापायच्या, मोठमोठे कारखाने घालायचे. त्यात स्वजातीच्या किंवा स्वधर्माच्या लोकांचा बडेजाव व उत्कर्ष कसा होईल इकडेच लक्ष पुरवणारे पुरुष लोकाग्रणी म्हणवून घेण्यास मुळीच लायक नाहीत. त्यांनी शिवरायाची गुणकदृष्टी आपल्या अंगी वाढवण्याचा प्रयत्न अवश्य केला पाहिजे. अशा नि:पक्षपाताच्या वर्तनास त्यांचे कोत्या समजुतीचे जातिबांधव काही वेळ दोष देतील हे खरे; परंतु एकंदर जनसमूहाचे हित साधण्याचे पुण्यकर्म त्यांच्या हातून सुसाध्य होऊन शेवटी ते लोकस्तुतीस पात्र होतील. आमच्या शिवरायांचे एतदविषयक व्रत पुढे पेशवाईत पाळले गेले असते तर आम्हांस जी आज परतंत्रता प्राप्त झाली आहे ती कदाचित कधीही आली नसती. एवढा प्रचंड राष्ट्रीय अनर्थ ज्या जात्यभिमानामुळे व स्वार्थेकपरतेमुळे गुदरला व ज्याची विषमय फळे आम्हांस व आमच्या वंशजांस आणखी कैक शतके भोगावी लागतील असा दृढ संभव आहे, तो आमच्या अग्रेसर म्हणवणाऱ्या लोकांच्या अंगांतून अद्यापि जाऊ नये हे आमच्या देशाचे मोठेच दुर्भाग्य होय. आमच्या देशातला जातिभेद नष्ट होण्यास कालावधी लागणार हे खरे आहे. तरी जात्यभिमानमूलक पक्षपात व मत्सरभाव यांचा सांप्रतच्या दैन्यावस्थेत समूळ उच्छेद होणे अत्यंत इष्ट होय. ही इष्टता लक्षात वागवून आमच्या अग्रेसर म्हणवणाऱ्या गृहस्थांनी स्ववर्तन ठेवण्यास झटले असता त्याचे अनुकरण इतर सामान्य जन हळूहळू करू लागतील व आमच्या जनसमाजात परस्परांमध्ये ऐक्य, प्रेम व विश्वास या वृत्ती उत्तरोत्तर वृद्धिंगत होत जातील आणि जे ते आपापल्या जातीपुरते उद्योग उपस्थित करून फळ्या व तट करत आहेत ते बंद होऊन त्यास खरे सार्वजनिक स्वरूप प्राप्त होईल व त्यांस संघशक्तीचे यथोचित साहाय्य मिळून सर्वजनसुखवर्धक होतील. तेव्हा तात्पर्य काय, की लोकाग्रणींच्या ठायीं खरी देशहितबुद्धी वास करू लागून ते वास्तविक लोकमान्य व्हावे असे असल्यास त्यांनी शिवरायांच्या चरित्राचे मनन सर्वकाळ करणे उचित होय.

**संसारी जनांनी घेण्याजोगा बोध :** येथवर लोकाग्रणींनी महाराजांच्या चरित्रापासून कोणता बोध घेण्यासारखा आहे त्याचे नुसते दिग्दर्शन केले. आता सामान्य संसारी जनांनी त्यांच्या चरित्रापासून कोणता बोध घ्यावा ते थोडक्यात सांगतो. प्रपंचात नेहमी सुख व यश लाभावे असे प्रत्येकास वाटत असते. त्यांची सिद्धी मुख्यत्वेकरून उद्योगशीलता, निर्व्यसनता, दृढनिश्चय, सदाचार, साहस, बुद्धिमत्ता, कुशलता इत्यादी गुणांनी प्राप्त होणारी असते. या गुणांचा प्रकर्ष महाराजांच्या ठायी किती झाला होता हे त्यांचे चरित्र वाचल्याने ध्यानात येणारे आहे. प्राप्त स्थितीत समाधान मानून स्वस्थ बसण्यात काहीएक पुरुषार्थ नाही. ती साधेल त्या योग्य उपायाने सुधारण्याचा उद्योग निरलसपणे अहर्निश करत राहिल्याने अंगी खरा मर्दपणा उद्भवून व्यसनासक्ती व दुर्वर्तन यांस थारा नाहीसा होतो. हे उत्तम तत्त्व महाराजांच्या चरित्रश्रवणाने प्रत्येकाच्या मनावर उत्कृष्ट प्रकारे बिंबणारे आहे. बुद्धिमत्ता व कुशलता अंगी उत्तरोत्तर वृद्धिंगत व्हावी

एतदर्थ अहोरात्र परिश्रम केल्यावाचून आपले तेज कोठेच पडायचे नाही व साहसादी इष्ट गुणांचा प्रादुर्भाव अंगी कदापि व्हायचा नाही. कारण असे पाहा, की ज्याला स्वबुद्धिबलाचा व स्वतःच्या अंगच्या कर्तबगारीचा पुरा विश्वास नसतो त्याच्या हातून कोणतेही धाडसाचे कृत्य होणे नाही. महाराजांच्या ठायी या गुणांचा विकास उत्तमप्रकारे झाला होता म्हणून त्यांच्या हातून एवढा पराक्रम झाला. तसेच वित्ताची व ऐश्वर्याची कितीही अनुकूलता असली तरी सन्मार्गापासून कदापि च्युत व्हायचे नाही व कोणतेही दुर्व्यसन लावून घ्यायचे नाही असा अढळ निर्धार करून आपले आचरण सर्वदा पवित्र राखणारास खरी सौख्यप्राप्ती होऊन लोकांकडून मान मिळतो, ही गोष्ट महाराजांच्या चरित्रात उत्तमप्रकारे प्रत्ययास येते.

सांप्रतच्या दुर्वह स्थितीत प्रत्येक मनुष्य आपल्यापुरते पाहू लागला तर ते कदापि चालणार नाही. ज्या देशात किंवा ज्या जनसमाजात आपणांस आयुष्यक्रमण करायचे आहे त्याच्याशी आपले कर्तव्य काय आहे ते पूर्णपणे ओळखून ते बजावण्यास त्याने काया वाचा मने करून झटले पाहिजे. सार्वजनिक हितसंबंधांत खासगी द्वेषमत्सरादिकांस अजी फाटा दिला पाहिजे. जातिभेदमूलक उच्चनीचत्वाचा भाव जितका कमी होईल तितके आपल्या समाजात ऐक्य व परस्परप्रेम वृद्धिंगत होऊन हरएक देशकार्य सुसाध्य होणार आहे, हे तत्त्व त्याने अहर्निश चित्तात वागवले पाहिजे. कोणत्याही धर्मासंबंधी किंवा व्यावहारिक चालीचा अप्रयोजक अभिमान धरून समाजात दुफळी किंवा कलह माजवण्याचे दिवस आता उरले नाहीत. सांप्रत संघशक्ती जितकी वाढेल तितकी आपल्या देशाच्या हिताची आहे हे लक्षात ठेवून तिला विघातक अशी कृती ज्याच्या हातून होत असेल त्याचा निषेध व अधिक्षेप करण्यास कधीही चुकता कामा नये. तो आपल्या जातीचा आहे किंवा आपल्या धर्माचा आहे हा विचार बिलकुल न करता त्याचे करणे सर्व जनसमाजाच्या हिताविरुद्ध आहे, यास्तव तो देशद्रोही आहे असे मानावे. अशा रीतीने जो वागेल तोच खरा स्वदेशाभिमानी होय. हल्ली पाहावे तर आमच्या समाजातील कित्येकांच्या बोलण्याचालण्यात जो स्वदेशाभिमान दृष्टोत्पत्तीस येत आहे तो बऱ्याच अंशी स्वज्यात्यभिमानमूलक आहे. कित्येकांच्या आचरणात तर स्वदेशाभिमान व स्वजात्यभिमान हे एकरूप होऊन गेले आहेत. ही अनिष्ट मनोविकृती हळूहळू नाहीशी होईल तरच आमच्या देशाचा तरणोपाय आहे; परंतु अलीकडे काही सुशिक्षित म्हणवणाऱ्या मनुष्याच्या ठायी ही मनोविकृती विशेष प्रबल झालेली दृष्टीस पडते. त्यावरून ही अभीष्ट संसिद्ध व्हावयास अद्यापि पुष्कळ काळ काढावा लागेल असे वाटते. एकंदर जनसमाजाचे हित जेणेकरून सुसाध्य होईल अशा संस्था उपस्थित करून त्या चालवण्याची योग्यता आमच्या लोकांस अद्यापि आली नाही असे स्वजात्यभिमानाने पछाडलेल्या आमच्या सुशिक्षित म्हणवणाऱ्या गृहस्थांच्या सध्याच्या आचरणावरून मोठ्या कष्टाने म्हणावे लागते. स्वधर्माचा किंवा स्वजातीचा अप्रयोजक अभिमान चित्तात वागवून जे लोकाग्रणी समाजात वैरभाव व दुफळी माजवण्यास प्रवृत्त





होत असतील त्यांचे अग्रणीत्व बिलकुल मान्य करायचे नाही व त्यास कोणत्याही प्रकारचे उत्तेजन द्यायचे नाही असा निर्धार प्रत्येकाने केला तर असल्या अहंमन्य देशबुडव्या लोकांच्या त्रासापासून आमचा देश लवकरच मुक्त होईल. आम्हांस आज जे पुढारी पाहिजेत ते शिवरायांसारखे पवित्र व्रत पाळणारे पाहिजेत. या कसोटीस जे खरोखर उतरतील तेच आपले पुढारी होत असे प्रत्येकास वाटले पाहिजे. ...

❒❒❒

('क्षत्रियकुलावतंस छत्रपति शिवाजीमहाराज यांचे चरित्र' यामधून संक्षेपाने)

टीप : केळूसकरांच्या शिवचरित्रातील 'गुणदोष विवेचन' या प्रकरणातून हा लेख संक्षपाने घेतला आहे. या प्रकरणाच्या प्रथम भागात महाराजांवर शत्रुपक्षाने केलेल्या दोषारोपांचे खंडन त्यांनी केलेले आहे तथापि, तो भाग विस्तारभयास्तव येथे घेतलेला नाही. - संपादक.



# ५. शिवाजी–एक महान नेता

**सर जदुनाथ सरकार**

**अनुवाद : प्रा. गणेश राऊत**

राष्ट्रनिर्माता म्हणून मान्यता पावणे यासारखे मनुष्याच्या आयुष्यात अन्य कोणतेही श्रेष्ठ विधिलिखित असू शकत नाही; नेमके हेच महत्कृत्य शिवाजीने करून दाखवले आहे. शिवाजी झाला नसता तर मराठी माणसांच्या आयुष्याची दिशा वेगळ्याच दिशेने मार्गक्रमण करत गेली असती आणि आजच्या भारताच्या इतिहासालाही एक वेगळेच वळण लागले असते; हे सत्य कोणालाही नाकारता येणार नाही. यातूनच शिवाजीची संपूर्ण कारकीर्द आपणासमोर दीपस्तंभासारखी उभी राहते. तसेच त्याचे राष्ट्रीय नेतृत्व कसे होते आणि त्या नेतृत्वाने कोणती कर्तबगारी करून दाखवली हेही स्पष्ट होते.

सुदैवाने गेल्या काही वर्षांत शिवाजीवर मुबलक आणि वैविध्यपूर्ण ऐतिहासिक साहित्य-सामग्री उपलब्ध झाली आहे. त्यामुळे आपणास शिवाजीचे चरित्र व पराक्रम यांचे वास्तव दर्शन सहजपणे घडते. ज्यांनी शिवाजीशी संवाद साधला आणि त्याच्या (शिवाजी) सहवासात ज्यांनी काम केले, अशा शत्रू-मित्र गोटांतील लोकांचे अस्सल अहवाल व कागदपत्रे आज विविध मार्गांनी मूळ स्वरूपात आपल्याला उपलब्ध झाली आहेत. लोकमानसात रूढ झालेल्या दंतकथा यापासून मुक्त व अचूक माहितीने परिपूर्ण असे शिवाजीचे जीवनचरित्र आजमितीला आपल्यापुढे मांडले गेले आहे. यातूनच आपण त्याच्या विविध गुणवैशिष्ट्यांचा 'एक लोकनेता' म्हणून चिकित्सक मागोवा घेऊ शकतो.

सर्वांत महत्त्वाचे म्हणजे सच्च्या नेत्याने कोणते तरी उदात्त ध्येय उराशी बाळगले पाहिजे, की जे ध्येय सदासर्वकाळ संपत्तीचा मोह, प्रसिद्धीची हाव, विलास-ऐषाराम, सत्तेचा हव्यास अथवा पक्षपातीपणा यांच्या पलीकडचे असले पाहिजे. कोणतेही श्रेष्ठ नेतृत्व हे उदात्त व नि:स्वार्थ आदर्शवाद पत्करल्याशिवाय निर्माण होऊ शकत नाही. अशा नेतृत्वाची अत्युच्च आकांक्षा सर्वस्व अर्पण करून उच्च ध्येयाचा पाठपुरावा करते. ती एखादया गुरूच्या आदेशानुसार किंवा ईश्वरी मंत्रानुसार स्वत:चे जीवन समर्पित करणाऱ्या भक्ताच्या निश्चयाप्रमाणे कार्यरत राहते. तसेच ती पारशी (झोराष्ट्रीयन) मंदिरातील सतत तेवत असलेल्या 'पवित्र अग्नी' प्रमाणे स्वार्थ व प्रलोभन यांना भस्म करून अखंड तेवत असते.

एखादा नेता हा त्याच्या काळातील सर्वश्रेष्ठ वाक्पटू असू शकतो किंवा आत्यंतिक दारिद्र्यातून उदयास आलेला करोडपती असू शकतो किंवा वैराण प्रदेशात समृद्ध अशी उद्यमनगरी निर्माण करणारा कर्तबगार उद्योगपती असू शकतो किंवा कायदेमंडळाच्या कुटिल राजनीतीमध्ये आघाडी घेणारा असा कुशल राजनीतीज्ञ असू शकतो; परंतु तो जनतेचा सच्चा नेता असू शकत नाही. जोपर्यंत त्याच्या अंत:करणात सर्व लोकांचे कल्याण व्हावे, अशी नि:स्वार्थ भावना असत नाही तोपर्यंत तो राष्ट्रनिर्माता म्हणून उभा राहू शकत नाही.





अशा प्रकारचे उदात्त ध्येय शिवाजीने बालपणापासून मनात बाळगलेले होते. स्वप्रदेशात स्वकीय हिंदू प्रजेसाठी स्वतंत्र राज्य -हिंदवी स्वराज्य- स्थापन करण्यासाठी त्याने स्वत:चे आयुष्य वाहून घेतले. आधुनिक काळात शिवाजीचे राजकीय ध्येय म्हणून 'हिंदुपदपादशाही' ही लोकप्रिय घोषणा दिली जाते. तसे ध्येय शिवाजीने उराशी बाळगले होते, याला कोणताही ऐतिहासिक पुरावा सापडत नाही. परमुलखावर किंवा परकीय जनतेवर आपले साम्राज्यवादी प्रभुत्व प्रस्थापित करावे असे शिवाजीचे उद्दिष्ट कधीच नव्हते. आपल्या मातृभूमीला स्वातंत्र्य प्राप्त करून द्यावे ही प्रचंड ऊर्मी त्याच्या ठायी होती. १६४५ मध्ये म्हणजे वयाच्या १८ व्या* वर्षीच त्याला खात्री होतीच की आपण स्वराज्याच्या योजनेत यशस्वी होणारच. आदिलशहाने जेधे यांना दिलेल्या धमकीच्या विरोधात पाठवलेल्या अभयपत्रात शिवाजीने दादाजी नरस प्रभू यांस म्हटले आहे, की ''शेंद्रीलगत स्वयंभू आहे - त्याणी आम्हास यश दिल्हे व पुढे तो सर्व मनोरथ हिंदवी स्वराज्य करून पुरविणार आहे!''

आता शिवाजीच्या दुसऱ्या गुणवैशिष्ट्याबाबत सांगतो - कोणत्याही नेत्याजवळ स्वत:च्या कल्पना साकार करण्याची साधने असली पाहिजेत. या ठिकाणी शिवाजीच्या मानसिक जडण-घडणीचे दुसरे वैशिष्ट्य स्वाभाविकपणे पुढे येते. तो समर्थ नेता होता. खरा नेता मग तो राजा असो वा उपजत सेनानी असो वा कुशल राजनीतीज्ञ असो त्याला सुयोग्य साधनांची निवड व माणसांची अचूक पारख करता येणे आवश्यक आहे.

माणसाकडे पाहूनच त्याची पारख करण्यात तो चाणाक्ष होता. या सर्वोच्च गुणामुळे त्याने आपल्याभोवती अनेक कर्तबगार माणसे उभी केली. त्याच्या समकालीन अनेकांना ही सत्यस्थिती ठाऊक होती. राजा जयसिंगाने औरंगजेबाला लिहिलेल्या पत्रात म्हटले होते, की शिवाजीला कैद करून अथवा ठार मारून काहीच फायदा होणार नाही, कारण शिवाजीने आग्र्यास येण्यापूर्वीच आपल्या राज्याची उत्तम व्यवस्था लावून दिली आहे. त्याचे कारभारी त्याच्या अनुपस्थितीत व्यवस्थित कारभार करू शकतात. मुघल सैन्याशी लढा देण्याचे मराठ्यांचे कार्य शिवाजीला कैद केले काय अन् ठार मारले काय, तितक्याच जोमाने चालेल.

असा कोणता देश आहे किंवा कोण असा राजा आहे, की ज्याच्या एवढ्याशा अल्प राजवटीत एवढे ख्यातनाम मंत्री आणि सेनापती, मुत्सद्दी आणि न्यायाधीश त्याच्या राज्यात कार्यरत होते ? कोणाचा इतिहास नेताजी पालकर, प्रतापराव गुजर, हंबीरराव मोहिते, तानाजी मालुसरे, आनंदराव आणि येसाजी कंक यांच्यासारखे पराक्रमी योद्धे, मोरो त्र्यंबकसारखा हुशार पेशवा, प्रल्हाद निराजीसारखा मुत्सद्दी, अण्णाजी दत्तोसारखा कारभारी, रामचंद्रपंतासारखा अमात्य, बाळाजी आवजीसारखा चिटणीस, नीळप्रभु पारसनीस व दत्तो त्रिमलसारखे सचिव दाखवू शकतो ? त्या सर्वांचा नेता या नात्याने त्याने सुबुद्धपणे आपल्याभोवती निर्माण केलेल्या प्रभावळीत तो तेजस्वीपणे चमकत होता.

शिवाजीच्या नेतृत्वाचे तिसरे गुणवैशिष्ट्य म्हणजे त्याने राष्ट्रीय आदर्शासाठी देशातील

---

** सरकारांनी शिवजन्म साल १६२७ असे धरल्यामुळे त्यांनी असे विधान केले आहे. -संपादक*

सर्व गुणवान माणसांना एकत्र आणण्याचे कार्य केले. हे त्याच्या प्रभावशाली व्यक्तिमत्त्वामुळे शक्य झाले. ही शिवाजीची थोरवी समर्थ रामदासांनी संभाजीला लिहिलेल्या पत्रात उत्कटपणे जाणवते. आपल्या पित्याचे अनुकरण करा असा उपदेश करताना ते लिहितात-

राज्यामध्यें सकळ लोक। सलगी देऊन करावे सेवक ।
लोकांचे मनामध्यें धाक । उपजोंचि नये ।
बहुत लोक मिळवावे। एक विचारें भरावे ।
कष्टें करोनि घसरावें। म्लेंच्छावरी ॥

कोणताही राष्ट्रीय नेता जनतेच्या संपूर्ण पाठबळाशिवाय आपले कार्य पूर्णत्वास नेऊ शकत नाही. शिवाजीचे पहिले कार्य म्हणजे महाराष्ट्रातील सर्व थरांतील लोकांची एकजूट करून त्यांची एकसंध समाज म्हणून निर्मिती करणे हे होते. तसेच सर्वांना आपली नैतिक तत्त्वे काय आहेत आणि सर्वांना एकत्रित बांधणारे समान भौतिक हितसंबंध कोणते आहेत याची जाणीव करून देणे हे होते. यातून शिवाजीने लोकांमध्ये ध्येयाची आणि जीवनाची एकरूपता उत्पन्न केली. लोकांच्या कल्याणासाठी शिवाजीने निर्माण केलेली ऐक्याची भावना अशा प्रकारे कार्यरत झाली आणि लोकांमध्ये जातिभेद आणि पंथभेद जरी असले तरी त्यावर शिवाजीने निर्माण केलेल्या या एकत्व पावलेल्या राष्ट्रभावनेने मात केली. मराठ्यांना या एकत्वाने बांधणाऱ्या या तत्त्वास मी एक 'सामाजिक विचाराची जीवनशैली' (community of life and thought) असे म्हणतो. ...

परंतु तुम्ही आता मला असे विचाराल की देशातील वेगवेगळे वर्ग आणि स्थानिक गट यांचे एकीकरण करून एक राजकीय संघटना कशी तयार होऊ शकते ? याचे उत्तर असे की - जेव्हा राजा आणि त्याचे दंडाधिकारी सुज्ञपणे, न्यायाने व खंबीरपणे लोकांच्या कल्याणासाठी राज्य राबवतात तेव्हाच हे सत्यात उतरू शकते. कोणत्याही देशातील सर्वसामान्य वा उच्च वर्गाची अपेक्षा असते की स्वत:चा उदरनिर्वाह शांतपणे चालावा, शत्रूंपासून संरक्षण मिळावे, आपल्या श्रमांचा परिपूर्ण मोबदला मिळावा. थोडक्यात सर्वत्र कायदा व सुव्यवस्थेचे राज्य असावे. हे मूलभूत कर्तव्य शिवाजीने परिपूर्णतेने पार पाडले. त्यामुळे तो लोकांचा अत्यंत जिवलग बनणे अगदी स्वाभाविक होते. पन्नास वर्षांच्या अनागोंदी राजवटीनंतर त्याने जनतेला न्याय आणि सुरक्षितता प्राप्त करून दिली. १५९६ मध्ये अकबराने अहमदनगरवर केलेल्या आक्रमणामुळे आधीच तुकडे-तुकडे झालेल्या दख्खनी सुलतानांच्या राज्याची कायदा व सुव्यवस्था आणि कला व संस्कृती नामशेष झाली होती. दख्खनच्या विस्तीर्ण पठारावरील कृषिक्षेत्र व हस्तकला-उद्योगही मृतप्राय होऊ लागले होते. शिवाजीवर लिहिलेल्या माझ्या ग्रंथात मी लिहिले आहे की-

''पुणे प्रांतात शेकडो छोटे-मोठे वतनदार देशमुख होते. प्रत्येकजण वारसाहक्काने एकेक गावचा मालकच होता. ते अनेक वेळा शेजारच्या वतनदारांशी तंटाबखेडा करत,

रयतेची नागवणूक करत किंवा आजूबाजूच्या शेतकऱ्यांना लुटत. नागरीव्यवस्था व समाजव्यवस्थेच्या या विघटन अवस्थेत लोकांना न्याय मिळत नव्हता, ना कायदेशीर हक्क मिळत होते. कारण शांतता व सुव्यवस्था राबवणारी यंत्रणाच नष्ट झाली होती. बळी तो कान पिळी अशी अवस्था सर्वत्र होती. या परिस्थितीत एक प्रामाणिक न्यायाधीश आणि समर्थ दंडाधिकारी म्हणून शिवाजी नवक्षितिजावर अवतरला. घराण्या-घराण्यांमधील जमीनजुमल्याच्या वाटणीचे वाद, वतनाच्या हक्कलाजिमांचे वाद उद्भवल्यानंतर मुलखातील गोतसभेने केलेल्या न्यायनिवाड्यानंतर ज्याच्या नि:पक्षपाती व कायदेशीर निर्णयांवर अवलंबून राहता येईल असा फक्त शिवाजीच होता.

वतनविषयक खटले स्वत: शिवाजी न्याय देऊन सोडवत असे. त्याचप्रमाणे कायदेशीर वारस असलेल्यांची मालमत्ता व हक्क कोणी हिसकावून घेऊ लागला, तर अशा पराभूत अशिलांना दंड देण्यासाठी प्रबळ इच्छाशक्ती व लष्करी बळ त्याच्याजवळ असे.

अशा प्रकारे शिवाजीने राज्यव्यापी सामाजिक गरजेची सोडवणूक केली आणि त्यामुळेच त्याच्या यशस्वी उदयास त्याच्याभोवतीच्या लोकांचा नैतिक पाठिंबा हाच कारणीभूत ठरला. लोकांची मने जिंकून शिवाजीने स्वराज्याची कल्पना त्यांच्या मनात पेरली. साध्या खेडूत लोकांमध्ये ही गोष्ट त्याच्यासारखा प्रामाणिक व समर्थ प्रशासकच करू शकत होता. त्यानंतर त्याने लोकांच्या वैयक्तिक महत्त्वाकांक्षेला जागृत करून त्यांना आपल्या झेंड्याखाली विविध संधी उपलब्ध करून दिल्या. संधींचे एक अमर्याद क्षितिजच त्यांच्यासमोर उभे केले. अखेरीस त्यांच्यात शिवाजीने सामूहिक हिंमत, धैर्य व सामुदायिक अस्मिता प्रज्वलित केली आणि त्यांचे उदात्तीकरण करून त्यांना उच्चपदावर नेऊन पोहोचवले.

एखादा सामर्थ्यवान पुरुष प्रदीर्घ व संकटमयी निद्रेतून जागा व्हावा आणि शक्तिमान व्यक्ती म्हणून उभा रहावा त्याप्रमाणे मराठी जनता, शिवाजीने निर्माण केलेली स्वराज्याची सामूहिक प्रेरणा घेऊन उभी राहिली. शिवाजी यशस्वी झाला कारण तो राजा म्हणून लोकांचा नायक होता.''

शिवाजीचे ज्या पद्धतीचे संघटन व व्यवस्थापन होते ते आजच्या काळातही आदर्शभूत व महत्त्वपूर्ण आहे. त्यामध्ये राज्य हे लोकांचे पालक असते. त्यासाठी राज्याला सामर्थ्यशाली लष्कर व सक्षम आणि प्रामाणिक अधिकारी वर्गाची गरज असते, तरच राज्य आपले विहित कर्तव्य पार पाडू शकते हे प्रमुख सूत्र होते. ...

परंपरेने चालत आलेली गावपातळीवरील प्रशासन यंत्रणा शिवाजीने अत्यंत शहाणपणाने तशीच चालू ठेवली. मराठी जनता गेली काही हजार वर्षे याच स्थानिक शासनसंस्थेचा वापर करण्यात रुजली होती. वर्षानुवर्षे ग्रामाधिकारी किंवा गावपंच आपली कामे गोतसभेसारख्या खऱ्या लोकशाहीच्या ढाच्यातून पार पाडत होते. याच व्यवस्थेतून जनतेने राजकीय प्रशिक्षण व स्वावलंबन प्राप्त करून घेतले होते. आश्चर्याची गोष्ट म्हणजे मध्ययुगीन इंग्लंडमध्ये याच प्रकारची 'ग्रँड ज्युरी' ही न्यायपद्धत वापरात होती. ती मराठ्यांच्या वरील न्यायपद्धतीशी विलक्षण मिळतीजुळती होती.

शिवाजीच्या लष्करी धोरणाचा विचार केला तर एका वाक्यात त्याचे धोरण सांगता

येते- 'अखंड सावधानता.' 'शिस्त हाच लष्कराच्या कार्यक्षमतेचा पाया आहे.' या सूत्राचेही त्याने पूर्ण भान ठेवले होते. रामचंद्रपंत अमात्य याने त्याच्या 'आज्ञापत्र' या ग्रंथात शिवाजीच्या सैन्यातील हुजरात या एका विभागाचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे-

''स्वशौर्यपराक्रमाचे प्रगटीकरणाचें साधन व सैन्यादि देशदुर्गांचे संरक्षणाचे आदिकरण ते हुजरात आहे. जे जे राजे व सेनानायक मागें होऊन गेले व वर्तमान आहेत, त्यांणीं आधी हुजरात (खुद्द) राजाचे सैन्य सजोन त्या बळावर पुढे साधीत साधीत विशेष जमाव मिळवले; देश कोश संपादिले. हुजरातीचे अस्काऱ्यावर (बळावर) तितकियांसहि हुकुमांत वर्तवलें. ज्यांचे पदरीं हुजरात बळकट नाहीं, ते सत्तापराधीन; त्यांच्यानें कोणा एका कार्याची स्वतां अंगीज (पुढाकार) करवत नाही. त्यामुळें केवळ सेवकाधीन होऊन राहावें, ते म्हणतील ते उगेंच ऐकावें, न ऐकावें, तर कार्यभागी लोक व सरदार योजिले कार्यात मन:पूर्वक प्रवर्तत नाहींत. तेणेंकरून कार्यनाश होतो. असें जाहल्यानें राज्याभिवृद्धी काय होणें आहे? याकरितां जो स्वत: उद्योगी आणि शूर, त्याशी नित्य नूतन संपादीन ही हिंमत, त्यानें आधी हुजरात सजावी. लष्कर, हशम, आडव, बंदुकी, तिरंदाजी करोन असा पंचरूढ जमाव ठेवावा. हुजरातींत माणूस ठेवावें तें परम शूर, आस्काऱ्याचें, निवडक, निव्वळ हुकुमबारदार, ज्यांचें नांव ऐकल्यानें लष्करांत व मुलखांत सकळही पसंत करितील, समयी दहशत वागवीत; तऱ्हेवाईक, शेरखोर, (उन्मत) अमर्याद, बालभाष्य, व्यसनी, कुचोद्य, कुचाळ्या करणार व एका धन्यापासून हरामखोरी करून आला असेल, असे लोक हुजरातींत एकंदर ठेवूंच नयेत. काय म्हणून की हुजरातीचे भरंवशावर सकलविषयीं निश्चिंत असावें लागतें. समयी जिवावर होड (पेज) करावी लागते. ... लक्षणीक मनुष्यें एकसमयावच्छेदें मिळतात असें नाहीं. याकरिता देशांत, लष्करांत, गडांत, किल्ल्यांत फिरतेसमयी मनुष्यांची आस्था धरून, कारभारियांविरहित जेथें जें उत्तम प्रतीचें मनुष्य आढळेल तें समागमें घेऊन, माया लावून, परीक्षा करून मग हुजरातींत ठेवावें.''*

या ठिकाणी मला सर्वदूर प्रचलित असलेला एक गैरसमज दूर केला पाहिजे. तो म्हणजे राजकारणाचा वैयक्तिक नीतिमत्तेशी काही संबंध नसतो. ... आपण कधीही विसरता कामा नये, की राष्ट्र हे अनेक कुटुंबांचे मिळून बनलेले असते आणि कौटुंबिक संबंधांचे उल्लंघन झाले किंवा कौटुंबिक जीवनाची शुद्धता व त्याचे नैतिक सामर्थ्य गमावले गेले तर ते राष्ट्र फार काळ टिकत नाही. नैसर्गिक व विशुद्ध कौटुंबिक जीवनाचा नाश होण्यामुळे अनेक राष्ट्रांचा ऱ्हास झालेला आहे, असे इतिहास सांगतो. ज्याचे चारित्र्य बदनाम झाले आहे ती व्यक्ती कधीही खऱ्या अर्थाने सच्चा लोकनेता होऊ शकत नाही. ... कोणतेही नेतृत्व हे लक्षावधी स्त्री, पुरुषांना प्रेरणा व उत्तेजन देणारे आदर्शवत उदाहरण म्हणून उठून दिसले पाहिजे.

या संदर्भात शिवाजी एक आदर्श नमुना म्हणून दाखवता येतो. जो मुस्लिम इतिहासकार खाफीखान शिवाजी हा 'काफीर' आहे असे सांगतो तोच खाफीखान

---

** सरकारांच्या इंग्रजी मजकुराचे भाषांतर देण्याऐवजी येथे 'आज्ञापत्र' या ग्रंथातील मूळ उताराच उद्धृत केला आहे. - संपादक.*

शिवाजीचे निष्कलंक चारित्र्य आणि न्यायबुद्धी यांची प्रशंसा करतो. तो लिहितो. "शिवाजीने सक्त ताकीद दिली होती की जेव्हा त्याचे सैनिक शत्रूची लूटमार करतील तेव्हा मशिदींना, कुराण या धर्मग्रंथास किंवा कोणाच्याही स्त्रीस इजा पोहोचता कामा नये. जेव्हा मोहिमेत हिंदू अगर मुस्लिम स्त्रिया कैद होत तेव्हा त्या स्त्रियांचे नातलग येईपर्यंत खुद्द शिवाजी त्यांच्या सुरक्षिततेची काळजी घेत असे."...

जेव्हा जात, पात, पंथ, वंश यांचा विचार न करता उत्तम माणसे लोकसेवेसाठी निवडली जातात तेव्हाच लोककल्याण साधले जाते. सर्व आधुनिक लोकशाही देशांनी हे तत्त्व मान्य केले आहे. ज्या फ्रेंच राज्यक्रांतीने मानवी विवेकशक्तीवरील सरंजामी राजवटीने व धार्मिक सत्तेने लादलेली बंधने काढून टाकली आणि सरदारांच्या वंशपरंपरेने चालत आलेल्या सवलती व हक्क काढून घेतले त्या फ्रेंच राज्यक्रांतीने हे तत्त्व आपणास दिले आहे. क्रांतीच्या सूत्रधारांनी जाहीर केले, की भविष्यकाळात सर्व प्रकारच्या नोकऱ्या व व्यवसाय फक्त बौद्धिक क्षमतेवरच दिल्या जातील. अभिमानाची बाब म्हणजे फ्रेंच राज्यक्रांतीच्या १२५ वर्षे आधी शिवाजीने भारतात या तत्त्वाची अंमलबजावणी केली. त्याचे सर्व अधिकारी केवळ गुणवत्तेच्या आधारावर नेमलेले होते. अधिकाऱ्यांच्या वाडवडिलांचा सामाजिक दर्जा किंवा धर्म या आधारावर त्यांची नेमणूक केली जात नसे तर केवळ त्यांच्या क्षमता व गुणवत्ता पाहून त्यांची नेमणूक केली जाई. ...

सारांश शिवाजीने आपण राज्यातील सर्व प्रजाजनांचे नि:पक्ष पालक आहोत हे आपल्या कृतीने दाखवून दिले. त्याउलट स्वधर्माचा कैवार घेणारा औरंगजेब राज्यात बहुसंख्य असणाऱ्या हिंदूंच्या बाबतीत कठोर होता. आत्मसमर्पित निष्ठा आणि उत्स्फूर्त आज्ञापालन यांचे आवाहन शिवाजीने आपल्या मुलखातील जनतेला केले. या गुणांच्या जोरावरच शिवाजीच्या पश्चात त्याच्या पुत्रांनी व नातवंडांनी 'एकसंघ मराठा राष्ट्र' म्हणून शक्तिशाली मुघल साम्राज्याविरुद्ध सलग सत्तावीस वर्षे, अमर्याद साधनसंपत्तीचा ओघ खुद्द बादशहाकडून चालू असताना व यश नजरेच्या टप्प्यात दिसत नसतानाही, नेटाने लढा दिला.

तुमच्यापैकी कोणीही असा प्रश्न विचारेल की शिवाजी त्याच्या स्वत:च्या धर्माबाबत पक्षपाती नव्हता काय ? तो मुस्लिम-ख्रिश्चन तसेच हिंदू यांच्यावर राज्य करत असूनही हिंदू धर्माचा पुरस्कर्ता (Champion) नव्हता काय ?

तर या प्रश्नाचे ठाम उत्तर आहे, 'नाही'. त्याने सम्राट अकबराचे वैश्विक सहिष्णुता (सुल्ह-इ-कुल) हे श्रेष्ठ तत्त्व अनुसरले होते. त्याने मुस्लिम धर्माच्या अनुसरण्याला पूर्ण संरक्षण दिले. मुस्लिमांना आपल्या सेवेत घेतले, हिंदू सत्पुरुषांप्रमाणेच मुस्लिम सत्पुरुषांनाही इनाम गावे व देणग्या दिल्या. तो मोहिमेवर असताना त्याने सक्त आज्ञा दिल्या होत्या की मशिदींना, मौलवींना इजा पोचवू नये, 'कुराण' धर्मग्रंथाची प्रत सापडली तर तिचा अनादर होता कामा नये. तिचे पावित्र्य जपावे, ही गोष्ट कडवा धर्मांध असलेल्या मुस्लिम इतिहासकार खाफीखानानेही प्रांजळपणे कबूल केली आहे. ...

एक नेता म्हणून या थोर राजाचे व्यक्तिमत्त्व आणि धोरण यांविषयी निष्कर्ष

काढायचा झाल्यास रामदासांच्या शब्दांत 'बहुत जनांसी आधारू श्रीमंत योगी'-म्हणजे असंख्य लोकांचा आधार, ऐश्वर्यसंपन्न राजा असूनही संन्यस्त वृत्तीचा, असेच त्याचे व्यक्तिमत्त्व होते. शिवाजीराजा हा भरजरी पोशाखात, रत्नजडित सिंहासनावर विराजमान होत असला तरी तो खऱ्या अर्थाने वैराग्यशील ऋषी होता. प्राचीन हिंदू राजनीतीमध्ये वर्णन केलेल्या आदर्श राजपदास तो पोहचला होता. अशा प्रकारच्या राजाविषयी तेराशे वर्षांपूर्वी महाकवी कालिदासाने पुढीलप्रमाणे उद्गार काढले आहेत.

"स्व-सुख-निरभिलाषः खिद्यसे लोकहितो ।
प्रतिदिनम् अथवा ते वृत्तिरेवं-विधैव ॥"

शिवचरित्राकडे पाहिल्यावर असे वाटते, की शिवाजीप्रमाणेच राष्ट्राच्या सार्वकालिक नेत्याचे चारित्र्य आणि धोरण असले पाहिजे. तरच ईश्वरी जगतात त्याचे कार्य अमर स्वरूपात तळपत राहील.

❑❑❑

टीप : दि. १८ व १९ ऑगस्ट १९४९ रोजी दयानंद कॉलेज सोलापूर येथे सर जदुनाथ सरकार यांनी The Saindas Foundation च्या वतीने जी दोन व्याख्याने दिली होती ती पुस्तिकेच्या स्वरूपात प्रसिद्ध झाली होती. त्यावर आधारित हा लेख संक्षेप स्वरूपात सादर केला आहे. - संपादक.



# ६. शिवाजीराजांचे व्यक्तिमत्त्व





डॉ. बाळकृष्ण
अनुवाद : प्रा. कमलाकर दीक्षित

## १. युरोपियन वकिलांच्या शिवाजीराजांशी भेटी

बऱ्याच सुप्रसिद्ध युरोपियन वकिलांनी शिवाजीराजांची भेट घेतली होती मात्र त्यांना आपल्या कामगिरीतच अधिक रस होता. जरी त्यांना राजाशी समक्ष बोलण्याची सुवर्णसंधी प्राप्त झालेली होती तरी राजांच्या व्यक्तिमत्त्वाबाबत त्यांनी तपशीलवार असे काही लिहून ठेवलेले नाही. इंग्रजांचा राजदूत म्हणून मुंबईहून स्टीफन उस्टिक १६७४ मध्ये गेला होता. शिवाय थॉमस निकोलस (१६७३); ऑक्झेंडन (१६७४); सॅम्युअल ऑस्टिन, आर. जोन्स आणि एडवर्ड ऑस्टिन (१६७५); लेफ्ट. ॲडम्स आणि मॉलव्हेरर (१६७६) आणि जॉन चाइल्ड (१६७८) अशा अनेकांनी राजांची भेट घेतलेली होती. याशिवाय तेघनापट्टमच्या डच वखारीचा प्रमुख मोठा नजराणा घेऊन जुलै १६७७ मध्ये राजांना भेटायला गेला होता. याच महिन्यात फ्रेंचांचा जर्मेन नावाचा प्रतिनिधीही कोलेरून नदीच्या तीरावर राजांना भेटला होता. यांपैकी कोणाच्याही लिखाणातून राजांच्या व्यक्तिमत्त्वाबद्दल फारशी काही माहिती मिळत नाही, ही गोष्ट दुर्दैवाची होय.

## २. शिवाजीराजांचे व्यक्तिगत वर्णन

ज्यांनी राजांना पाहिले होते त्यांच्या हवाल्यावर एस्केलियट हा राजांचे वर्णन 'मध्यम उंची आणि प्रमाणबद्ध शरीर' असे करतो. "राजा कामात क्रियाशील, नजरेत तीक्ष्ण आणि वर्णात इतरांपेक्षा गोरा असून तो नेहमी स्मितहास्य करीत बोलतो" असेही तो म्हणतो.

६ जून १६७४ रोजी वयाच्या ४४ व्या वर्षी झालेल्या राज्याभिषेकाच्या वेळी राजांचे वजन १४० इंग्लिश पौंड किंवा जास्तीत जास्त १६० डच पौंड एवढे होते.

थेवनॉटच्या दृष्टीने राजे उंचीला कमी आणि पिवळट तपकिरी वर्णाचे होते, तो लिहितो, शिवाजीराजाचे डोळे अतिशय तेजस्वी आणि तीक्ष्ण असून त्यातून त्याची श्रेष्ठ बुद्धिमत्ता जाणवते. तो नेहमी दिवसातून एकदाच जेवण घेतो आणि त्याचे आरोग्य चांगले आहे."

फादर डी ऑर्किन्स म्हणतो, "शिवाजीराजा चैतन्यशील पण काहीसा अस्वस्थ वाटतो. मात्र कितीही अस्वस्थ वाटला तरी तो निर्णय क्षमता आणि पुरुषार्थ यांत मुळीच कमी नाही".

कॉस्मो दा गार्डा याने वरील वर्णनास पूर्ण पुष्टी दिलेली आहे. तो लिहितो, "तो कामात जलद आणि चालीत उत्साही होता. त्याचा चेहरा स्वच्छ आणि वर्ण गौर होता. विशेषत: त्याचे काळेभोर, मोठे मोठे डोळे इतके चैतन्यपूर्ण होते की त्यातून तेजस्वी किरण बाहेर पडत आहेत असे वाटे. यात त्याची चलाख, स्वच्छ आणि तीव्र

बुद्धिमत्ता भरच टाकीत असे."

## ३. शिवाजीराजांची चित्रे

शिवाजीराजांच्या उपलब्ध असलेल्या वेगवेगळ्या चित्रांवरून त्यांचा शरीरबांधा आणि व्यक्तिमत्त्व यांबद्दल आपण आपले काही अनुमान करू शकतो. राजा जयसिंगाच्या छावणीत शिवाजीराजे गेले असताना मनुची या प्रवाशाला त्यांच्याशी बोलण्याची संधी मिळालेली होती. या मनुचीसाठी मीर महंमद या चित्रकाराने १६८८ पूर्वी काढलेले राजांचे चित्र सर्वांत अधिक विश्वासार्ह मानावे लागते. जयपूर संग्रहातील चित्र समकालीन असावे आणि ते राजा जयसिंगाने काढवून घेतलेले असावे. मुंबईच्या प्रिन्स ऑफ वेल्स वस्तुसंग्रहालयातील चित्रात आणि या जयपूरच्या चित्रात राजांचा चेहरा आणि पोशाख या दोन बाबींत साम्य आहे; पण मुंबईच्या चित्रात चेहरा गडद दाखवलेला आहे ते यापूर्वीच्या निर्देशलेल्या पुराव्यावरूनच चुकीचे ठरते. या चित्रात राजे दरबारी पोशाखात आहेत, तर जयपूर-चित्रात ते घरगुती परिवेशात आहेत.

ब्रिटिश संग्रहातील राजांचे चित्र आणि त्यांची ऑर्मच्या 'फ्रॅगमेंटस' मध्ये दिलेली प्रतिकृती हे दोन्ही समकालीन आणि वास्तवाला धरून आहेत.

'बर्नियर्स ट्रॅव्हल्स' मधील चित्र ही व्हॅलेन्टिनच्या १७२४ मधील भारतीय चित्रसंग्रहातील चित्राची प्रतिकृती आहे. ही प्रतिकृती १७१२ मधील मोगल दरबारातून उपलब्ध झालेली असावी. या सर्व चित्रांतील राजांचे दर्शन असे : काळ्या दाढीमिश्या, बाजूंचे केस लांब, शुभ्र पार्श्वभूमीवरील फुलाफुलांचा चिटाचा चोळणा, डाव्या खांद्यावर सोनेरी भरतकाम केलेले जांभळे रेशमी उपवस्त्र, सुरेख कमरबंद, यावनी पायजमा आणि भरतकाम केलेले चढाव, सोनेरी शिरपेच त्यावरील हिरेजडित तुरा, काळे पीस आणि शुभ्र मोती राजांच्या शिरपेचाच्या विशिष्ट आकारावरून राजे सहज ओळखू येतात. राजांच्या डाव्या हातात लांब आणि सरळ अशी बहुधा भवानी तलवार आणि उजव्या हातात डाव्या बाजूला खोचलेली कट्यार, सहज जाणवणारे तीक्ष्ण डोळे, लांब गरुडनाक, कोरलेली दाढी आणि वरच्या ओठावरील बारीक मिश्या. स्थिर, गौर आणि दरारा वाटावा अशी चर्या. ...

## ४. कमालीचा साधेपणा

कमालीचा साधेपणा हा शिवाजीराजांचा एक महत्त्वपूर्ण गुण होता. आपल्या सैनिकांसमवेत त्यांच्याप्रमाणे राहून त्यांनी सगळ्या कसोटी प्रसंगांना आनंदाने तोंड दिले. त्यांची तत्त्वनिष्ठा मात्र टोकाची कडक होती. अधिकाऱ्यांच्या आणि सैनिकांच्या कुटुंबीयांना मोहिमेत सहभागी करून घ्यायला त्यांची सक्त मनाई होती. छावणीत नर्तकी, स्त्रिया, मद्यालये आणि इतर अमली पदार्थांना शिरकाव नव्हता. एखाद्या ठिकाणावर वायूवेगाने झडप घालायची असेल तर अनावश्यक सामग्रीचा अडथळा त्यांना नको असे. १६६४ च्या सुरतेच्या मोहिमेत राजे आपल्याला तंबूत नव्हे तर एका झाडाखाली बसलेले आढळतात. कर्नाटकावरील मोहिमेत त्यांच्या फौजेत दोनच तंबू होते; एक त्यांच्या स्वत:साठी आणि दुसरा त्यांच्या प्रधानांसाठी, असे सांगितले जाते.

भोजन आणि पोशाख या बाबतीत राजांचा कमालीचा साधेपणा आढळून येतो. ते दिवसातून एकदाच जेवण घेत. कोणत्याही देशातील राजेलोकांना प्रिय असलेली विलासी जीवनाची घातक सवय त्यांनी आपल्यापासून दूर राखली होती.

## ५. मद्यापासून दूरता

शिवाजीराजांचे जीवन मितव्ययी, कडक व्रतासारखे आणि सदैव सावध असे होते. अमली पदार्थांपासून एक व्रत म्हणून ते दूर राहिले. सिकंदर आणि सीझर यांसारखे रणधुरंधरही मद्याच्या अमलाखाली असत; किंबहुना नेपोलियनही मद्यपान करत असे. बाबरापासून शहाजहानपर्यंतच्या सर्व मोगल सम्राटांना मद्याचे आणि इतर अमली पदार्थांचे व्यसन होते. मात्र या संदर्भात प्राचीन आणि समकालीन राजांच्या पेक्षा कितीतरी उच्चतर पातळीवर असलेला हा शिवाजीराजा होता. ...

मॉंटगोमेरी मार्टिन याचे उद्गार या ठिकाणी उद्धृत करावेसे वाटतात. तो म्हणतो "शिवाजी राजाजवळ असे काही गुण होते की ते अज्ञ हिंदू समाजात कौतुकास्पदच म्हणावे लागतात. कोणत्याही अकस्मात येणाऱ्या आपत्तीला तोंड द्यायला तो सदैव तयार असे. कोणत्याही आपत्तीचा त्याला धाक असा वाटत नसे, आणि यश त्याच्या डोक्यात कधी जात नसे. तो अत्यंत मितव्ययी असून त्याची वागणूक सर्वप्रिय अशी असे. त्याच्या भावना तीव्र असत. आपल्या लोकांत तो मुक्तपणे वावरे आणि इस्लामी सत्तेचा मुकाबला करण्याची प्रेरणा त्यांना देई. औरंगजेब बादशहाच्या वक्रगामी चालींना उत्तर देताना तोही वक्रनीतीचा वापर करी. मात्र हे करीत असताना आपले वैयक्तिक धाडसही वापरायचे तो विसरत नसे. त्याने दक्षिणेतील मोहिमांत केलेल्या चढाया आपण डोळ्यांनी पाहिल्याचे लोक अभिमानाने सांगतात आणि त्याच्या जतन करून ठेवलेल्या प्रसिद्ध तलवारीकडे ते एखाद्या मूर्तीप्रमाणे पूज्य भावाने पाहातात."

## ६. स्त्रीवर्गाविषयी आदरभाव

शिवाजीराजांच्या फौजेत स्त्रियांना आणण्यास मज्जाव होता. अधिकारी, सेनापती, सैनिक आणि आम आदमी यांच्यासमोर त्यांनी स्त्रीविषयक नीतिमत्तेचा उच्च नमुना पेश केलेला होता. स्त्रियांना नेहमी दाक्षिण्यानेच वागवले जाई. युद्धप्रसंगी स्त्रियांचा जीव घ्यायला किंवा त्यांना कैद करून ठेवायला बंदी होती. जेव्हा जेव्हा राजांच्या फौजांच्या हाती स्त्रिया पडत तेव्हा तेव्हा त्यांना आदराची वागणूक मिळत असे आणि त्यांच्या नातलगांनी त्यांची सुटका करीपर्यंत त्यांना सन्मानाने वागवले जात असे.

मोगली फौजेतील एक महिला सेनाप्रमुख रायबागीन ही राजांच्या फौजेशी एखाद्या वाघिणीप्रमाणे झुंजली. शेवटी तिचा पराभव झाला आणि ती पकडली गेली. मात्र तिला तिच्या हुद्द्यानुसार योग्य ती सन्मानाची वागणूक देऊन सोडून देण्यात आले. त्याचप्रमाणे कर्नाटकच्या मोहिमेत बेलवडीची देसाईण शरण आल्यावर एका अधिकाऱ्याने तिला वाईट वागणूक दिली असता राजांनी त्याचे डोळे काढले आणि त्याला स्थानबद्ध करून ठेवले. अशा तऱ्हेने सर्व धर्मपंथांच्या स्त्रियांना देण्यात येणाऱ्या वागणुकीच्या संदर्भात राजांनी उच्च आदर्श घालून दिलेले होते. त्यांच्या समकालीन राजेलोकांपेक्षा

शिवाजीराजांची जीवनमूल्ये या विषयात फारच उच्च होती, हे स्पष्ट आहे. ...

### ७. दैवाचा स्वामी

हा महान विजेता दैवाचा गुलाम नसून त्याचा स्वामी होता. आपण काय करावे अगर करू नये याबद्दल त्यांनी कोणा फलज्योतिष्याचा कधी सल्ला घेतला होता, असा उल्लेख बखरीतूनसुद्धा सापडत नाही. उलटपक्षी आपल्या भावी योजना स्वत:जवळच ठेवण्याइतके ते सदैव जागरूक असत, हे युरोपियन लोकांच्या पुराव्यावरून शाबीत होते.

जोनाथन स्कॉटने म्हटले आहे : ''शिवाजीराजा आपल्या योजना चातुर्याने आखीत असे आणि चिकाटीने पूर्णत्वास नेत असे. तो अनेकांशी चर्चा करी पण जो पर्याय त्याच्या मनातील उद्दिष्टास पूरक ठरेल तोच निवडी. त्याच्या मनातील निश्चयाची माहिती कोणालाही होत नसे. तो निश्चय प्रत्यक्षात उतरला की मगच त्याची माहिती सर्वांना कळत असे.''

इतिहासकार स्कॉट वॉरिंग या वस्तुस्थितीला दुजोरा देताना म्हणतो : ''सैनिक म्हणून त्याची प्रज्ञा इतर आशियाई सेनानायकांपेक्षा श्रेष्ठ प्रतीची होती. त्याच्या नियोजनात एकाहून अधिक विजयांचा समावेश असे. त्याचे साध्य झालेले उद्दिष्ट समजूनही त्यातून किती लाभ होणार आहेत, हे लगेच स्पष्ट होत नसे. नंतरच्या मोहिमांत प्राप्त झालेल्या विजयामुळे हे लाभ लोकांना समजत. त्याच्या व्यक्तिगत कामगिरीचे स्वरूप चकित करण्याजोगे होते. अदम्य संयमाच्या साहाय्याने त्याने कोणतीही वाट पायाखाली घातली नाही असे झाले नाही. त्याच्या मागोमाग दौड करणाऱ्या सैनिकांना तो गंतव्य ठिकाणी अत्यंत जवळच्या पण अनोळखी रस्त्याने घेऊन जाई. तेथे पोचल्यावरच समोरचा शत्रू कोण हे सैनिकांना समजत असे. राजाच्या भावना त्याच्या काबूत असत. शब्दावरून किंवा कृतीवरून त्याच्या मनात काय चालले आहे याचा अंदाज त्याच्या अनुयायांना येत नसे. कोणतीही आणीबाणीची परिस्थिती त्याला गोंधळात टाकू शकत नसे. कोणतेही संकट त्याला विचलित करू शकत नसे.''

असे समर्थ मानवी मन दैवाचे गुलाम कधीच होत नसते. शिवाजीराजा दैवाचा जणू लाडका पुत्रच होता! साहजिकच दैवाने त्याच्यावर त्याने हाती घेतलेल्या कार्यात विजयांचा वर्षाव केला.

### ८. एक मुत्सद्दी

आपल्या वयाच्या अठराव्या वर्षी शिवाजीराजांनी आपल्या पित्याची आदिलशाहीच्या तुरुंगकोठडीतून मोगलांच्या मध्यस्थीने मुक्तता केली. हा त्यांच्या उत्कृष्ट मुत्सद्देगिरीचा पुरावा होय. राजांनी मोऱ्यांचा पाडाव करून जावळी जिंकली. आदिलशहाच्या मृत्यूनंतर औरंगजेबाच्या दक्षिणेतील गैरहजरीचा पूर्ण फायदा उठवून त्यांनी आदिलशाही विरुद्ध मोगलांशी सहकार्य करून त्यांचा स्नेह संपादन केला. याचा परिणाम अफजलखानाच्या स्वारीत झाला, पण राजांनी त्याच्याशी 'जशास तसे' या न्यायाने वागून त्याचे पारिपत्य केले. हा 'डोंगरातील उंदीर' आपल्या उत्कृष्ट प्रतिभेच्या साहाय्याने राक्षसासारख्या

शायस्तेखानावर मात करण्यात यशस्वी झाला. त्यांनी सुरतेची लूट केली. आग्र्याहून सुटका करून घेऊन कपटी औरंगजेबाची दाढी उपटली. अशा प्रकारे मोगलांच्या अजिंक्यपदाचा पर्दाफाश केला आणि त्यांच्या साम्राज्याला पोकळ सांगाड्याची कळा आणली.

ज्या विजापूरकरांनी कोकणात अतिक्रमण करून राजांच्या पाठीत खंजीर खुपसला त्या विजापूरकरांविरुद्ध त्यांनी बलाढ्य मोगल सरदार राजा जयसिंग याच्याशी करार करून त्यांचा सूड घेतला. पण तरीही विजापूरचे राज्य मोगलांच्या भक्ष्यस्थानी पडेल एवढे कमकुवत न करण्याची त्यांनी काळजी घेतली. त्यांनी आपल्या मखमली म्यानातील तलवारीची पोलादी मूठ विजापूरकरांना दाखवली आणि मोगल आक्रमकांविरुद्ध त्यांच्यासह एक आघाडीही बनवली. खरेतर शिवाजीराजांच्या मुत्सद्देगिरीचा हा कळस होता.

आग्र्याहून सुटल्यानंतर वेगवान हालचाली करून त्यांनी आपल्या राज्याची घडी बसवली आणि जयसिंगाला दिलेले सर्वच्या सर्व किल्ले जिंकून परत घेतले. आपल्या अप्रतिम मुत्सद्दीपणाच्या आधारे राजांनी जगातील सर्वांत सामर्थ्यशाली अशा साम्राज्याशी यशस्वी रीतीने संघर्ष केला. अशा साम्राज्याच्या सर्वश्रेष्ठ सेनानायकांकडून त्यांनी क्वचितच पराभव पत्करला.

१६७५ मध्ये राजांनी बहादूरखानाला तहाला तयार केले. मात्र मधल्या काही महिन्यांतच आदिलशहाने जिंकलेला कोकणचा प्रदेश परत मिळवल्यानंतर त्यांनी त्या तहातील अटी उधळून लावून बहादूरखानाची आणि सम्राटाची मानखंडना केली. थोड्याच अवधीत राजांनी पुन्हा मोगलांशी शांतता तह केला आणि लगेच कुतुबशहाशी कर्नाटक जिंकण्यासाठी मैत्रीचा करार केला. त्यामध्ये अस्तंगत झालेल्या विजयनगर साम्राज्याचा थेट रामेश्वरपर्यंतचा प्रदेश आपल्या राज्याला जोडणे आणि विजापूरच्या अधिसत्तेखालून आपल्या धाकट्या भावाला मुक्त करणे हे त्यांचे दोन उद्देश होते. ते साध्य करून त्यांनी कमालीचे राजनैतिक कर्तृत्व सिद्ध केले. त्यांच्या कारकिर्दीच्या अखेरच्या काळात विजापूर मोगलांच्या ताब्यात जाऊ नये म्हणून खुद्द आदिलशहाची ही राजधानीच जिंकून ती स्वराज्याला जोडण्याचा त्यांचा विचार होता. विजापूर आणि गोवळकोंडा येथील सुलतानशाह्या मोगलांच्या घशात जाऊ नयेत यासाठी राजांनी अद्वितीय मुत्सद्देगिरी दाखवली यात शंका नाही. या मुत्सद्देगिरीच्या आधारेच त्यांनी मोगलांविरुद्ध लढण्यासाठी या दोन सुलतानांकडून अर्थसाह्यही संपादन केले होते. याच वेळी चारही युरोपियन सत्तांशी त्यांनी स्नेहाचे संबंध राखले होते, ही गोष्टही विसरता येण्याजोगी नाही. आणि तरीही आपली जहाजे, व्यापार, बंदरे आणि लोक यांना या सत्तांपासून काही उपद्रव पोचू नये या संदर्भातही त्यांनी दक्षता बाळगली होती. पोर्तुगीज, इंग्रज, डच आणि फ्रेंच या सत्तांशी राजांनी शक्य तितके चांगले संबंध राखून त्यांच्यामध्ये सत्तासमतोल राहावा म्हणून त्यांनी प्रयत्न केल्याचे दिसून येते. उदा., मुंबई किंवा गोवा जिंकण्यासाठी त्यांनी डचांना मदत केली नाही.

### ९. एकमेवाद्वितीय विधायक राजनीतीज्ञ

आरंभापासूनच शिवाजीराजांचे संघटनकौशल्य नजरेत भरण्याजोगे होते असे दिसून

येते; कारण त्यांचा राज्यविस्तार आणि राज्यप्रशासन या बाबी एकमेकांशी समांतर अशा प्रकारची प्रगती करत राहिल्या. कर्नाटकातील मोहिमेच्या वेळी तिकडील जिंकलेल्या प्रदेशांचे प्रशासन संघटित करण्यासाठी राजे आपल्याबरोबर २०,००० ब्राम्हण कारकून घेऊन गेले होते. समकालीन युरोपियन लेखकांनी राजांनी दक्षिणेतील राज्यप्रशासन सुधारण्यात जे कौशल्य दाखवले त्याला दुजोरा दिलेला आहे. मुसलमानी राजवटीतील नोकरशाही निरक्षर, भाडोत्री आणि परदेशातून आयात केलेली असल्यामुळे जुलमी झालेली होती. राजांनी अशा सर्व निरक्षर आणि परकीय कर्मचाऱ्यांना सेवेतून कमी करून शिकलेल्या लोकांना अधिकारपदावर नेमले. लाचलुचपत आणि भ्रष्टाचार यांना आळा घालण्यासाठी त्यांनी परिणामकारक उपाययोजना केली. यामुळे प्रशासनव्यवस्था इतकी सुधारली की त्यांचे प्रजाजन संतुष्ट, सधन आणि स्वास्थ्यपूर्ण जीवनाचा उपभोग घेऊ लागले.

जो कोणता किल्ला किंवा प्रदेश राजांच्या कब्जात येत असे त्याचा कारभार लवकरच इतका सक्षम होई की तो जिंकून परत घेणे शत्रूला दुरापास्त ठरत असे. मोगलांनी किंवा आदिलशाहीने राजांकडून आपला प्रदेश परत मिळवल्याची उदाहरणे फारच थोडी आहेत. ही एकच वस्तुस्थिती राजांचे संघटनकौशल्य, दक्ष प्रशासन आणि रयतेची राजनिष्ठा या गोष्टी सिद्ध करण्यास पुरेशी आहे.

## १०. महान सेनानायक

जगातील आघाडीच्या सेनानायकांच्या रांगेत शिवाजीराजांचे स्थान अव्वल आहे. १६४५ ते १६८० या राजांच्या ३५ वर्षांच्या राजकीय कारकिर्दीत सामर्थ्यशाली मोगलांचा किंवा विजापूरकरांचा असा एकही हिंदू अथवा मुस्लिम सेनानी नव्हता की ज्याचा राजांनी अंतिमत: पराभव केला नव्हता. शहाजादे, इराणी व पठाण सरदार तसेच जसवंतसिंग राठोड सारखे रजपूत राजे या सर्वांनी राजांपुढे हात टेकले होते. वैयक्तिक शौर्य, सेनेचा संघटक व नायक म्हणून शिवाजीराजे अग्रगण्य ठरले होते. धैर्य, सावधानता आणि कल्पकता हे त्यांचे लष्करी गुण सर्वपरिचित आहेत. आपल्या विजयाचा जास्तीत जास्त फायदा उठवणे व शत्रू बेसावध असताना अचानक हल्ले चढवून त्यास चकित करणे, याबाबतीत तत्कालीन दुसऱ्या कोणा नेत्याला राजांची बरोबरी करता आली नाही. जिवावर उदार होऊन एखादे साहस करण्याच्या कृत्यापासून ते माघार घेत नसत. अफजलखानाशी द्वंद्वयुद्ध, शायस्तेखानावर छापा, सुरतेवरची स्वारी एवढेच नव्हे खुद्द औरंगजेबाच्या दरबारात त्यांनी केलेला प्रवेश या गोष्टी वरील विधानाची प्रचिती देतात.

सिकंदर आणि फ्रेडरिक यांना त्यांच्या पित्याकडून प्रशिक्षित अशा फौजेचा वारसा लाभला होता. मात्र असा वारसा शिवाजीराजांना लाभलेला नव्हता. त्यांना त्यांची फौज अल्पावधीत स्वत:च प्रशिक्षित करावी लागली. त्यांनी त्यांच्या फौजेत विद्यावंत, कारकून, शेतकरी, खेडूत, आदिवासी वगैरे सर्व प्रकारच्या लोकांचा समावेश केलेला होता. दक्षिणेतील शाह्यांचे मुस्लिम सरदार, मोगलांच्या फौजा आणि रणवीर रजपूत राजे या सर्वांना पाणी पाजणारी फौज त्यांनी निर्माण केली, ही मोठी अद्भुत गोष्ट होती.

शेकडो सेनाधुरंधरांना राजांनी प्रशिक्षित केल्यामुळे राजांच्या निधनानंतर उद्‌भवलेल्या कसोटीच्या काळात मराठ्यांचे स्वातंत्र्य या लोकांनी जगाच्या पाठीवरील सर्वांत बलाढ्य अशा साम्राज्यसत्तेशी संघर्ष करून शाबूत राखले. धार्मिक अभिमान, धैर्य, देशप्रेम, शिस्तबद्‌धता, आत्मविश्वास, आशावाद या गुणांचा राजांचा वारसा या प्रसंगात मराठा सत्तेला मोलाचा ठरला.

समकालीन इंग्रज इतिहासकार राजांची तुलना सिकंदर, हनिबाल आणि सीझर यांच्याशी करतात. पोर्तुगीजही याला दुजोरा देतात. हिंदू लोकांना ते राम, कृष्ण, भीम आणि बलराम यांच्या तोडीचे वाटतात!

सुप्रसिद्‌ध इतिहासकार ऑर्म हा राजांचे नेतृत्व, गुप्तचर यंत्रणा, जलद हालचाली, कसोटीच्या वेळी त्वरित निर्णय, विवेक, शौर्य वगैरे गुणांची प्रशंसा करतो. तो पुढे म्हणतो की शिवाजीराजाच्या प्रतिभाशक्तीवर आणि तलवार उपसून फौजेच्या आघाडीवर राहाण्याच्या त्याच्या गुणावर त्याचे सर्व सेनापती आणि सैनिक खूश असत. (हिस्टॉरिकल फ्रॅगमेंट्स.)

जनरल सलव्हानचे मतही लक्षात घेण्याजोगे आहे : तो म्हणतो, ''राजाच्या अंगी तत्कालीन अशांत स्थितीत यशस्वी होण्यासाठी लागणारे सर्व गुण होते. चर्चेच्या वेळी सावध पण धूर्त आणि कामगिरीच्या वेळी निर्भय व साहसी हे त्यांचे विशेष होते. त्यांची सहनशक्ती, ऊर्जा आणि निर्णयक्षमता अप्रतिम म्हणावी लागते. त्याच्या देशवासीयांनी काढलेल्या त्याच्या चित्रात शुभ्र घोड्यावरून दौड करत असता तो कच्चे तांदूळ तोंडात टाकीत जात असल्याचे दाखवले आहे. याचा अर्थ जेवण्यात घालविण्यासाठी त्याच्याजवळ वेळ नव्हता. देशी घोडदळाच्या मदतीने पराभूत केलेल्या प्रचंड मोगली घोडदळाचा पाठलाग करणारा हा हिंदू राजा देशवासीयांच्या कौतुकास पात्र होणे साहजिकच होते.'' (वॉरियर्स अँड स्टेटस्‌मेन ऑफ इंडिया.)

जे. स्कॉट यानेही शिवाजीराजांचे गुणवर्णन केलेले आहे : ''शिवाजीराजा हा अप्रतिम सैनिक होता. शासनकलेत तो निपुण होता. सद्‌गुणी आणि धर्मशील व्यक्तींचा तो मित्र होता. त्याचे नियोजन हुषारीचे आणि कार्यवाही चिकाटीची असे. तो सर्वांशी विचारविनिमय करी; मात्र निर्णय त्याच्या मनातील उद्‌देशाला सुसंगत असाच घेई. त्याच्या मनातील उद्‌देश त्याच्या कार्यवाहीनंतरच स्पष्ट होत असे.'' (हिस्टरी ऑफ द डेक्कन.)

## ११. शिवाजी आणि नेपोलियन

नेपोलियन हा खरोखरीच एक महान लष्करी प्रतिभावंत अद्‌वितीय सेनानायक आणि प्रशासक होता. तथापि आपल्या एका फौजेला इजिप्तमध्ये वाऱ्यावर सोडून तो परत फिरला होता आणि त्याहीपेक्षा मोठी फौज रशियन बर्फात सोडून तो स्वत:चा जीव बचावून फ्रान्समध्ये पळून आला होता. त्याच्या उरल्यासुरल्या फौजेचाही वॉटर्लू येथे खातमा झाला होता. शेवटी हा महान जगज्जेता आपल्या शत्रूच्या हाती सापडला होता. एका निर्जन बेटावरील कोठडीत त्याची रवानगी होऊन तेथेच त्याचा मृत्यू झाला. त्याचे साम्राज्य अदृश्य झाले; त्याचे कायदेकानू रद्द झाले आणि त्याच्या हयातीतच त्याच्या पुत्राचा

वारसाहक्क नष्ट करण्यात आला.

या पार्श्वभूमीवर नेपोलियनच्या विजयाचे आणि वैभवाचे तेज कमी झाल्याशिवाय राहात नाही. शिवाजीराजांच्या यशाला अशा नामुष्कीच्या पराभवाचा किंवा हृदयद्रावक शोकात्मिकेचा डाग लागलेला नाही. त्यांच्या निधनानंतरच्या कसोटी प्रसंगात त्यांचे राज्य सुरक्षित राहिले आणि त्याची एक शाखा २५० वर्षांनंतरसुद्धा कोल्हापुरात आजही सिंहासनावर मौजूद आहे.*

## १२. असामान्य कल्पकता

शिवाजीराजांच्या प्रज्ञेचा असामान्य कल्पकता हा प्रधान पैलू होता. आणीबाणीच्या प्रसंगात त्यांचे उत्कृष्ट अष्टपैलूत्व प्रकट होत असे. शत्रूचे कपट, फसवणूक, गुप्त कारस्थाने यांना राजांनी आयुष्यात कधीही दाद दिली नाही. उलटपक्षी, आपल्याच जाळ्यात शत्रूला पकडण्यात ते यशस्वी ठरले, संकटसमयी त्यांची प्रज्ञा बहरत असे आणि मग ते अशी काही क्लृप्ती योजत की ते तर सहीसलामत बाहेर पडतच, शिवाय शत्रूही पराभूत पावत असे.

शहाजीराजांची सुटका, मोऱ्यांचे उच्चाटन, अफजलखानाचा वध, स्वत:ची पन्हाळ्याहून सुटका, विशाळगडच्या आसमंतातील चकवा; सुरतेची लूट, आग्र्याहून सुटका, मोगल साम्राज्यातून परतीचा सहीसलामत प्रवास इत्यादी गोष्टी रोमांचकारकच आहेत. या सगळ्यांमधून राजांचे अद्‌वितीय अष्टावधान दिसून येते.

डग्लस म्हणतो. ''एखादे शिकारीचे सावज जसे सदैव जागरूक आणि सावधान असते तसा शिवाजीराजा सतत कोणत्याही आणीबाणीच्या प्रसंगाला तोंड द्यायला सदैव सज्ज असे. या संदर्भात जे राजाच्या लहानशा बोटांत होते ते औरंगजेबाच्या संपूर्ण देहात नव्हते. एक डोळा सदैव उघडा असल्याप्रमाणे त्याची झोप सावध असे. धाडसाच्या बाबतीत ऑर्मची साक्ष अर्थपूर्ण आहे.'' तो म्हणतो, ''एका हातात नागवी तलवार घेऊन घोडदौड करीत शिवाजीराजा शत्रूच्या प्रदेशावर चालून जात असल्याचा प्रसंग आपण आपल्या डोळ्यांनी पाहिल्याचे त्याचे सैनिक इतरांना अभिमानाने सांगत असत.''

## १३. निश्चयाचा महामेरू

शिवाजीराजांचे शब्दचित्र समर्थ रामदासांनी योग्य शब्दांत रेखाटलेले आहे. या तरुण राजाच्या गुणांचे हे चित्रण तत्कालीन लोकमताचे प्रातिनिधिकच आहे :

''निश्चयाचा महामेरु । बहुत जनांसी आधारु ।
अखंड स्थितीचा निर्धारु । श्रीमंत योगी ॥
परोपकाराचिया राशी । उदंड घडती जयासी ।
तयाचे गुणमहत्वासी । तुळणा कैंची ॥
नरपति हयपति गजपति । गडपति भूपति जळपति ।
पुरंदर आणि छत्रपति । शक्ति पृष्ठभागी ॥

---

* *डॉ. बाळकृष्ण यांनी जेव्हा हे लिखाण केले त्यावेळी कोल्हापूरचे संस्थान अस्तित्वात होते.-संपादक.*

यशवंत कीर्तिवंत । सामर्थ्यवंत वरदवंत ॥
पुण्यवंत नीतिवंत । जाणता राजा ॥'' ...

### १४. महाराष्ट्राचा सिंह

ज्याला त्याचे शत्रू 'डोंगरातील उंदीर' आणि 'अविवेकी खलपुरुष' म्हणत तो हा असा एक सत्पुरुष होता. ते खऱ्या अर्थाने 'पर्वत पुरुषही होते.' त्याचे चाहते त्यास 'महाराष्ट्राचा सिंह' असे अभिधान देतात. अर्थात शिवाजीराजांनी कोकरांचे सिंहात रूपांतर केले यात शंका नाही. महाराष्ट्रातील गरीब, पददलित, दैववादी बहुजनांना राजांनी आपल्या जादुई स्पर्शाने आणि प्रेरणादायी व्यक्तिमत्त्वाने अलौकिक कर्तबगारी दाखवण्यास प्रवृत्त व सक्षम केले आणि त्यांचे रूपांतर उत्तम सैनिक, धाडसी पाठीराखे, परिपूर्ण सेनापती, विधायक दृष्टीचे राजनैतिक अधिकारी यांच्यात करून शेकडो लढाया जिंकणाऱ्या मोगलांना तोंड देण्यास त्यांना समर्थ बनवले. या तथाकथित 'अशिक्षित, असंस्कृत आणि दरोडेखोर' म्हणून शत्रूकडून हेटाळणी केल्या गेलेल्या या व्यक्तीने हे आपल्या लोकांचे जादुई रूपांतर घडवून आणले होते! शिवाजीराजांचा गौरव एक किमयागार, एक अलौकिक पुरुष असा करण्यास प्रत्यवाय नाही. त्यांच्या कर्तबगारीमुळे भारतीय इतिहासाची पाने सदैव झळाळून उठतील यातही शंका नाही.

❑❑❑

('Shivaji the Great, Part IV' या ग्रंथामधून संक्षेपाने)


प्रतापगड

# ७. श्रीशिवछत्रपतींची कामगिरी

**त्र्यंबक शंकर शेजवलकर**

शिवाजीच्या राज्यस्थापनेचे मुख्य श्रेय त्याच्या स्वत:च्याच स्फूर्तीला, कल्पनेला व पराक्रमाला देणे योग्य आहे, असे वाटते. इतिहासात अनेक शतकांनी एखादा स्वयंभू जेता जगाच्या पाठीवर कोठेतरी, केव्हातरी एकदम उदय पावताना दिसतो, त्या जातीचा शिवाजी आहे. अशी व एवढी व्यक्ती हिंदुस्थानात मुसलमानी राज्यस्थापनेपासून कोणी झालेली नव्हती, ती शिवाजीच्या रूपाने प्रकट झाली. शिवाजीचे स्वतंत्र मन त्याच्या स्वतंत्र राज्याचे अधिष्ठान होते. ज्याप्रमाणे नेपोलियनचे विजिगीषु मन त्याच्या जेतेपणास कारणीभूत झाले, तोच प्रकार येथे समजावा. असा पुरुष महाराष्ट्रात जन्मावा याला ऐतिहासिक, सामाजिक व धार्मिक कारणे आहेत. पण तेवढ्यानेच इष्ट पुरुष निर्माण होतो असे म्हणवत नाही. तो एक सृष्टीतील अकल्पित चमत्कार आहे. असा चमत्कार घडल्यानंतर त्याची हवी तेवढी कारणे शोधून काढता किंवा जुळवता येतील. पण तो अमक्या ठिकाणी, अमक्या वेळी घडणार असे भविष्य कोणालाही वर्तवता येणार नाही. म्हणूनच सर यदुनाथांसारख्या टीकाकारालाही शिवाजीच्या अलौकिक प्रज्ञेची सरणी लावताना, तो एक खरोखरी स्वत:च्या कल्पनेवर व हिमतीवर अवलंबून राहणारा अद्वितीय शोधक होता; मध्ययुगीन भारतात एक नवीन रस्ता बांधून दाखवणारा कल्पक पुरुष होता; त्याच्यापुढे कोणी वाटाड्या किंवा आदर्श माणूस नव्हता, असे म्हणावे लागेल. एका सामान्य जागीरदाराच्या मुलाने मोगल बादशाहीला आव्हान देणे म्हणजे तो एक वेडेपणा मानला गेला असता व त्याचा शेवट निश्चित नाश ओढवून घेण्यातच होणार, असे या खंडप्राय देशातील सर्वच शहाणे मानत होते, पण शिवाजीने तो मार्ग स्वीकारला आणि त्यात तो यशस्वीही झाला.

स्वत:ला राजे म्हणवण्याची, स्वतंत्र राज्य चालवण्याची ऊर्मी सह्याद्रीच्या लगतच्या पट्ट्यात महाराष्ट्रात कायम राहिली होती. बागलाणचे राजे सोळाव्या शतकापर्यंत राज्य करत होते. शिवाजीच्या वेळीही कोकणात रामनगरकर, जव्हारकर, पेठकर, जावळी व शृंगारपूर येथील मोरे व सुर्वे, तसेच शिर्के, सावंत व गोमंतकातील देसाई हे सर्व, मांडलिक म्हणून का होईना, लहानमोठे प्रदेश वहिवाटीत होते. स्वत:च्या पायांवर उभे राहून सार्वभौमापासून व शेजारच्या पाळेगारांपासून आपले रक्षण कसे करावे हे ते थोड्या प्रमाणात तरी जाणत होते. शहाजीराजे कर्नाटकात स्वतंत्र राज्याशी भांडत होते, झगडत होते, नवी राज्ये जिंकत होते. बंगळूरला गौरीविलास नामक सभागृहात दरबार भरवत होते; तेथे जुन्या हिंदू राजाप्रमाणे विद्वान, कवी, खुशमस्करे व इतर गुरुजनांचा परामर्श घेत होते. त्यामुळे शिवाजीला स्वतंत्र राज्याची ऊर्मी येणे सहज होते. अशी ऊर्मी दुसऱ्याही तत्कालीन जागीरदारांच्या मनात कोठे कोठे सुप्तावस्थेत वास करत असेलच. एरवी मावळातील देशमुखांचे झगडे, हेवेदावे, बंडखोरी यांचा उलगडा करता येणार नाही. मात्र त्यांपैकी कोणातही शिवाजीची दूरदृष्टी, हिंमत, उच्च आकांक्षा, निश्चित

ध्येय व सर्वांहून जास्त अद्‌भुत पराक्रम वास करत नसत एवढेच.

पण या सर्व सभोवताली चाललेल्या झगड्यांचा, स्पर्धांचा, बंडखोरीचा अर्थ एकट्या शिवाजीलाच उत्तम समजला व त्याने काळाला व परिस्थितीला अनुलक्षून काय करायचे, ते कसे करायचे, त्याला मर्यादा कोणत्या, या सर्व गोष्टी जाणून घेतल्या व मनात साठवल्या. त्याने या गोष्टीची स्वत:ला सार्वभौम सत्तेच्या पडद्याआड सवय लावून घेतली. त्यात लहान लहान प्रयोगही करून पाहिले आणि दहा वर्षांच्या या गोष्टींतील अनुभवानंतर, बाप शाहजी दूर कर्नाटकात सुरक्षित आहे, आपल्या कृत्यामुळे पुन: पेचात येणार नाही, अशी काळजी घेऊन शिवाजीने आपल्या जीवितकार्याला प्रारंभ केला. असा धीर त्याला येण्याचे कारण त्याची सश्रद्ध वृत्ती होय असे मानसशास्त्रदृष्ट्या म्हणता येते. आपण आरंभलेले कार्य हे इष्टकार्य आहे, पुण्यकार्य आहे, आपल्या सर्व धर्मबांधवांच्या हिताचे आहे; हे केल्याखेरीज आपला तरणोपाय नाही; हिंदूजातीला स्वाभिमानाने जगायचे असेल तर आपण करत असलेले धाडस तिला करणे प्राप्त आहे; आपल्या कार्याला देवाब्राम्हणांचा पाठिंबा आहे; देवी भवानी मनोमन आपल्याला हेच करण्याचा आदेश देत आहे; ती आपल्याला सर्व संकटांतून पार पाडून सुरक्षित स्थळी पोहोचवण्यास आपल्या पाठीमागे सदैव उभी आहे, अशी शिवाजीची कधीही न चळणारी समजूत त्याच्या राज्यस्थापनेच्या कार्यात सदैव असलेली दिसते. एरवी सभासदाच्या त्रोटक बखरीत तो सात वेळा भवानीचा उल्लेख शिवचरित्रात आणता ना! आणि तोच सभासद रामदास, तुकाराम वगैरे साधूंचा नुसता नामोल्लेखही आपल्या लेखात आणत नाही ! याचा अर्थ आम्ही असा समजतो, की शिवाजीची देवभक्ती जितकी जाज्वल्य होती तितकी साधुवर्गावर त्याची श्रद्‌धा किंवा मदार नव्हती. नंतरच्या बखरीतून त्याचा समावेश निरनिराळ्या प्रसंगांनी वेगवेगळ्या लेखकांच्या वैयक्तिक स्थानिक माहितीनुसार, भक्तीनुसार व हितानुसार करण्यात आला. शिवाजीने त्या कालानुसार व तत्कालीन समाजधाटणीनुसार गुरू केले असतील किंवा पुजले असतील; पण त्याचा पिंड आत्मबुद्‌धीने देवभक्त झालेल्याचा होता; गुरूच्या मध्यस्थीने देवभक्ती त्याला स्फुरली नव्हती. ...

कार्लाइलने आपल्या 'वीर व वीरपूजा' यावरील व्याख्यानात स्वत:च्या पराक्रमाने नवीन राज्य स्थापणारास जगातील सर्वांत 'मोठा माणूस' ठरवले आहे. त्याच्यापुढे धर्मप्रवर्तक, साधुसंत, देवमाणूस, महाकवी, सुधारक व तत्त्वज्ञानी लेखक हे सर्व दुय्यम प्रतीचेच ठरतात. अशा पुरुषांचे कार्य सर्व माणसांना आदेश देण्याचे असून, इतर सर्व माणसांचे काम त्याच्या आज्ञा पाळणे हेच होय आणि त्या तशा पाळाव्या असे कोणाला सांगावे लागत नाही. सर्व माणसे स्वयंस्फूर्तीने, निष्ठेने त्याच्यावरून आपला जीव ओवाळून टाकतात व तसे करण्यात स्वत:चे हित आहे असेही ती मानतात व तसा अनुभवही त्यांना येतो. अशा तऱ्हेचा समर्थ पुरुष शोधून काढून त्याला सन्मानाने राजा

बनवणे, त्याची भक्ती करणे, सेवा करणे, म्हणजे एकंदरीत तो 'महापुरुष' आपल्या प्रज्ञेप्रमाणे सर्वांचा वाटाड्या होईल अशी व्यवस्था करणे हेच समाजातील प्रधान कार्य होय. हे काम उत्तम रीतीने केले तर मग सर्व जगाचा कारभार सुरळीत, व्यवस्थित चालला, ते रामराज्य झाले, असे म्हणायला हरकत नाही. असा समर्थ पुरुष स्वभावत:च शुद्ध हृदयाचा, न्यायी, उत्तम गुणसंपन्न ठरतो. अखिल मानवजातीला कोठेही कशाही रीतीने दुसऱ्या ठिकाणी शिकता येणार नाही अशी शहाणपणाची सुयोग्य गोष्ट, कृती तोच सांगू शकतो. आपण कोणतीही शंका मनात न आणता पूर्ण निष्ठेने त्याचे ऐकणे हेच मानवजातीच्या सुव्यवस्थेचे बाह्य गमक होय. यापुढे दुसऱ्या सर्वही राज्यव्यवस्था गौण म्हटल्या पाहिजेत. ...

विचित्र, अनाकलनीय रीतीने 'महापुरुष' वागला तरी अखेर त्याची दृष्टी समाजात व्यवस्था प्रस्थापित करण्याची असते, गोंधळ माजवण्याची नसते. शिवाजीसारखा पुरुष नसती उलथापालथ करणारा, उपद्व्यापी बंडखोर आहे; त्यामुळे शासनसंस्था डळमळीत होऊन अराजक माजत आहे, असे काही काळ लोकांना वाटणे अपरिहार्य असते पण अखेर यांच्यातूनच तो सुव्यवस्था प्रस्थापित करत असतो. त्याला अशा निर्मितीसाठी जुन्यातील काही मोडून टाकणे, फोडून काढणे, जाळून टाकणे भाग पडते. पण अखेर इष्ट ती चिरस्थायी घटना अस्तित्वात येते हेच त्याचे जीवितकार्य होय, असे कार्य इतिहासातून कधीच पुसून टाकता येणार नाही.

अशा कायमस्वरूपाचे कोणते कार्य शिवाजीकडून तडीस गेले बरे? देवगिरीच्या यादवांचे राज्य हळूहळू सगळ्या दक्षिणेवर कर्नाटकापर्यंत व तेलंगणापर्यंत पसरले होते हे खरे. पण ते सरंजामशाही राज्य होते. त्यास कोण लोक होते हे पाहिले तर मुख्यत: लहानमोठे मांडलिक राजे, देसाई, देशमुख व सरदार यांच्यात ते विभागलेले होते. त्यांत मराठी बोलणारे बहुतेक लोक होते, तसेच कानडी, तेलंगे व इतरभाषी लोकही थोडेबहुत होते. या सर्वांना जोडणारा दुवा फक्त राजा एवढाच होता. राज्यातील ठिकठिकाणचे लोकांत आपण यादव राज्यात राहत आहोत, आपण सर्व एक आहोत, किंवा महाराष्ट्रीय आहोत असा अहंभाव वास करत असलेला दिसत नाही. ज्ञानदेव आपल्या 'भावार्थदीपिके'च्या अखेरीस राजनिष्ठपणे रामचंद्र यादवाचे स्मरण करो; आपला ग्रंथ मराठी भाषेत रचो; पण त्याच्या लेखनात कोठे महाराष्ट्र राज्याबद्दल अस्मिता उमटलेली आढळत नाही.

ती गोष्ट मराठी बोलणारे लोक अनेक मुसलमानी राज्यांत विभागले जाऊनही शिवाजीने घडवून आणली. महाराष्ट्रातील एका मागासलेल्या कोपऱ्यातील खेडवळ लोकांतही 'महाराष्ट्र' राज्याबद्दल, ते तळहाताएवढे असतानाही, ईर्ष्या उत्पन्न झाली. या छोटेखानी, होऊ घातलेल्या राज्याकडे अखिल महाराष्ट्रातील कर्तबगार लोक आकर्षित झाले. त्यांना पारखून घेणारा व घण मारून, ठाकठीक करून आकार देणारा

पुरुष निर्माण झाला. ज्या प्रसंगांतून, दुर्लघ्य अडचणीतून, सपशेल बुडवून टाकणाऱ्या महापुरातून या राज्याला जावे लागले त्यातील कर्णधार हरहुन्नरी, निधड्या छातीचा, कोणत्याही प्रसंगात धीर न सोडणारा नसता, तर त्याची इतिश्री होण्यात या सर्व खटाटोपाचा शेवट होता. शिवाजीला इष्ट काय हे जसे कळत होते तसे शक्य काय, व्यवहार्य काय हे त्याहून कळत होते. स्वत:ला रक्षण करता येणार नाही एवढे राज्य वाढवण्याची त्याने चूक केली नाही. ते ज्या प्रदेशात रक्षिता येईल त्याच प्रदेशात त्याने वाढवले व हा प्रदेश सालेरीपासून जिंजीपर्यंत अतिअरुंद, चिंचोळ्या पट्टीत तुटक तुटक पसरलेला होता. फक्त शिवाजीचा विजयवारू कोणी अडवण्याचा प्रयत्न केल्यास त्यास तेथेच रोखण्याची तयारी असंख्य दुर्गम गड बांधून व त्यावर कार्यक्षम गडकरी व प्यादे नेमून शिवाजीने ठेवली होती. त्याच्या काळात सर्वच शत्रू अदूरदर्शी, भ्याड, अकार्यक्षम झाले होते असे नाही. प्रसंगी त्यांनी शिवाजीवर मातही केलेली आढळते. पण सर्व आघात सोसून सलामत राहण्याची किमया शिवाजीने साध्य केली होती, तशी माणसे तयार केली होती व स्वत:शी अनुरक्त राखली होती. आपल्या सामर्थ्याबद्दल शत्रूंच्या मनात दहशत व स्वजनांच्या मनात दृढ विश्वास निर्माण केला होता.

सामान्यत: शिवाजीच्या पद्धतीप्रमाणे सर्व व्यवस्थित चालते तर हे राज्य औरंगजेबालासुद्धा मोडता आले नसते, असे वाटते. पण शिवाजीची दूरदृष्टी एवढ्यावरच थांबली नसून, जर कोणाच्या चुकीमुळे, द्रोहामुळे, दुहीमुळे हे राज्य मोडले तर ते पुन: उभारू शकतील अशी माणसे त्याने तयार केली होती, ही सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हटली पाहिजे. अस्मितेचा, मराठी राज्याच्या अभिमानाचा रुजवून काढलेला माणसांचा ताटवा, हीच शिवाजीची अद्वितीय, चिरस्मरणीय व महाराष्ट्रीय लोकांस आजवर पुरलेली आणि उपयोगास येणारी कामगिरी होय. हीच इतिहासास पुसून टाकता आली नाही व यापुढे टाकणे असंभवनीय वाटते.

राजकीय पुढारी, स्वराज्यस्थापनेचे कंकण बांधलेला वीर शिवाजी होता व त्याने आपणांस महाराष्ट्राचा 'छत्रपती' म्हणवले, एवढी कामगिरी त्यास इतिहासात 'उत्तम पुरुष' ठरवण्यास पुरेशी आहे. पण शिवाजीने त्यापुढे जाऊन हिंदू समाजाचा सुकत आलेला वृक्ष पुनरुज्जीवित केला, ही त्याची त्याहून मोठी व अखिल भरतखंडास अभिमानास्पद कामगिरी घडली, असे इतिहासावरून ठरते. यवनी राजांच्या हिंदू प्रजेने, परराज्य होऊनही परधर्माचा प्रवेश आपल्या आचरणात, विचारसरणीत, ग्रंथांत वा शास्त्रात कोठे होऊ दिला नव्हता. पण अनेक शतके ज्या समाजाचे वर्तन कासवाप्रमाणे आपले हातपाय व डोके कवचाखाली लपवून सरासरी जिवंत राहणाराचे झाले होते, त्याला शिवाजीने मान ताठ करून व हातपाय हालवून निर्भयतेने बदललेली परिस्थिती लक्षात घेण्यास उद्युक्त केले. स्वसंरक्षणाचा खात्रीचा मार्ग शत्रूवर चढाई करण्यातच असतो, हे राजनैतिक व लष्करी तत्त्व अमलात आणून शिवाजीने सर्व हिंदू लोकांसमोर

ठेवले.

याचा सुपरिणाम शिवाजीच्या समकालीन लोकांतही भरतखंडाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत उमटलेला दिसला. शीख, सतनामी अशा धर्मपंथांची बंडे झाली; राजपूत, आहोम व कन्नड लोकांत स्वराज्यरक्षणाचे झगडे लागले; मोगली राज्यातील छत्रसालासारख्या सरदारात स्वातंत्र्यलालसा निर्माण झाली, हे शिवाजीच्या उठावणीचे बाह्य परिणाम म्हटले पाहिजेत. शिवाजीची मदत घेऊन विजयनगरचे हिंदू राज्य पुनरुज्जीवित करावे अशी कल्पना मादण्णाच्या मनात तरी उद्‌भवण्यास शिवाजीचे उदाहरणच कारण होय यात संशय कसला? ... आपले कर्तव्य केवळ मराठी भाषिकांपुरते नसून सर्व हिंदू लोकांइतके विस्तृत आहे याची कल्पना शिवाजीला होती व स्वशक्तीनुसार ती त्याने आचरणात दाखवली. यासाठी हिंदू समाजाचे वठलेले स्वरूप पालटून टाकून त्यात जुना समधातपणा आणण्याचा प्रयत्न त्याने स्वत:पासून केला. 'नंदांतं क्षत्रियकुलम्' किंवा 'कलौ आद्यन्तयो स्थिति:' असली संशयास्पद वचने कोणी काढली व त्यातील विचारसरणीचा प्रादुर्भाव हिंदुस्थानभर कसा झाला असेल, ते असो; पण समाजरक्षणाचे कार्य करण्यास, परधर्माच्या हल्ल्यांपासून हिंदूधर्म सुरक्षित ठेवण्यास क्षत्रियवर्गाची सदैव गरज आहे ही तत्त्वत: विसरण्यात आलेली गोष्ट शिवाजीने अमलात आणली; एवढेच नव्हे, तर ब्राम्हणांच्या भट्टीत तावून सुलाखून घेतली. हिंदूमात्राचा आत्मा प्रफुल्लित करण्यासाठी क्षत्रियाला राज्याभिषेक झाला पाहिजे हे समजून त्याने गागाभट्टासारख्या सर्वमान्य विद्वानाकडून स्वत:स राज्याभिषेक करवून घेतला व बहुत काळ बंद पडलेली रूढी पुन: चालू करून दिली. ही गोष्ट केवळ आत्मप्रौढीसाठी त्याने केली असे म्हणता येणार नाही. त्यासाठी एवढा खटाटोप व खर्च तो करता ना. तर हे हिंदू समाजाच्या विशिष्ट परिस्थितीत अत्यावश्यक आहे असे समजूनच त्याने एवढा उद्योग केला, नाहीतर तेवढ्याच खर्चात अनेक किल्ले किंवा लढाऊ तारवे त्यास बांधून काढता आली असती व तसाच मार्ग शिवाजीने जास्त पसंत केला असता. पण त्यापासून हिंदूमात्राची सहानुभूती राजारामकालीन संकटसमयी मराठ्यांस लाभली नसती. आपल्या अनुयायांत श्रद्धा निर्माण करणे हे त्याचे राज्यरक्षणासाठी आद्य कर्तव्य होते; व ती गोष्ट अन्य कोणत्याही उपायाने साध्य झाली नसती.

हिंदूधर्माला बाधणारी, हिंदूंच्या संख्याबलास ओहोटी लावणारी दुसरी गोष्ट बंद करण्याचा उपक्रम त्याने केला व तो जुलमाने बाटवलेल्या हिंदूस परत हिंदूधर्मात आणण्याचा होय. ... बजाजी निंबाळकराच्या मुलाला स्वत:ची मुलगी देऊन व अफगाणिस्तानात आठ वर्षे मुसलमान म्हणून राहिलेल्या नेताजी पालकरास शुद्ध करवून, स्वत:च्या पंक्तीस घेऊन शिवाजीने त्या काळात एकोणिसाव्या शतकातील सुधारणेचा पाया दोनशे वर्षे आधी घालून दाखवला. ही केवढी स्वबांधवकल्याणाची गोष्ट म्हटली पाहिजे! याबाबत त्यास ब्राम्हणांचे सहकार्य कसे लाभले, आपल्या कुळीचे

अभिमानी मराठे कसे तयार झाले, याचे आश्चर्य वाटते. अशी गोष्ट व्हायची तर ती समाजावर लादण्यात आली असे म्हणण्यापेक्षा शिवाजीसारख्या स्वधर्मनिष्ठ छत्रपतीचा तसे करण्याचा अधिकार मुकाट मान्य करण्यात आला असेच असले पाहिजे. म्हणजे शिवाजी स्वराज्य संस्थापकाप्रमाणेच हिंदू धर्म व्यवस्थापकसुद्धा ठरतो व त्याने एकखांबी तंबू उभारला नसून तो दोन खांबांच्या सम पातळीवर उभा केला होता, असे ठरते. ...

हिंदू समाज युरोपाशी तुलता तत्कालीन जगाच्या काही शतके मागे पडला होता. मुसलमान हे धर्मदृष्ट्या अनेक देशांत पसरलेले व युरोपियनांशी जास्त जवळचा संबंध अनेक शतके राखणारे होते, तरी त्यांच्याकडूनही तिकडील नवीन ज्ञानाचा ओघ इकडे आणण्याची कामगिरी होऊ शकली नव्हती. तेव्हा याबाबत शिवाजीला जबाबदार धरता येणार नाही. त्याचे जीवितकार्य पायाखाली तुडवल्या गेलेल्या व आत्मविश्वास गमावून बसलेल्या, मृतप्राय समाजाला शुद्धीवर आणणे, वर मान करून आपल्या हीनदिनतेस कारणीभूत झालेल्या परकीय राज्यकर्त्यांविरुद्ध दंड थोपटून ताठ उभे राहण्यास त्यास तयार करणे, एवढेच मर्यादित होते; व ते त्याने पन्नास वर्षांच्या थोड्या आयुष्यात सिद्ध करून दाखवले. त्यापुढे जाऊन त्याला आधुनिक जगाची वाट चालायला लावणे त्याच्याकडून होऊ शकले नाही. कारण तसे करण्यास त्याला वेळ व सामर्थ्य दोन्हीही नव्हते, पण जुनी कोंडी फोडून तीतून बाहेर पडण्याचे धाडस व कल्पना त्याच्यात होती हे वर स्पष्ट झाले आहे. त्याचे मन नव्याचा स्वीकार करण्याइतके उदार होते. मात्र भोवतालच्या हिंदू समाजाची प्रवृत्ती तिकडे अगदी नव्हती ही गोष्ट त्याच्यानंतर एक शतकाने हिंदूधर्माचे संचालक ब्राम्हण, राज्यकर्ते होऊनही, त्यांकडूनसुद्धा होऊ शकली नाही, यावरून स्पष्ट आहे. ...

भरतखंडात इतरांना न मिळालेला असा वारसा शिवाजीमुळे मराठ्यांना मिळालेला आहे. आपल्या पूर्वजांनी अजून न विसरल्या गेलेल्या काळात शेकडो लढाया मारलेल्या आहेत; मोठी सैन्ये घेऊन देशाच्या सीमेवर जाऊन आपले खंड परक्यांच्या हल्ल्यांपासून राखण्याचा अटीतटीचा सामना ते खेळले आहेत; स्वतंत्र राज्ये त्यांनी चालवली आहेत; महसूल व खर्च यांच्या कोट्यवधी रकमांचा व्यवहार आपण हाताळला आहे; साम्राज्याचे प्रश्न सोडवण्याचा स्वत: प्रयत्न केला आहे; हिंदू धर्म रक्षणासाठी त्यागही केला आहे, असे या खंडातील दुसऱ्या कोणत्या लोकांना म्हणता येण्यासारखे आहे? यांच्या आठवणीवरच आजच्या मराठ्यांचे आयुष्य रचलेले आहे. यामुळे इतर लोकांत सहसा न आढळणारा बौद्धिक हव्यास, ध्येयवृत्ती, दीर्घोद्योग, हाल सोसण्याची तयारी, मनात आणलेली गोष्ट प्रत्यक्ष कृतीत उतरवण्याची धडपड, त्यागाचा सराव, निर्लोभता, शीलवत्ता व या सर्वांहून अधिक प्रमाणात एक प्रकारचा साधेपणा व समत्व, हे गुण अखिल मराठ्यांत कायम घर करून राहिले आहेत. याबाबतीत त्यांच्याहून वरचढ असल्याची किंवा समानता मिरवण्याची बढाई हिंदुस्थानातील दुसऱ्या कोणत्याही जातीला

मारता येणार नाही, असे मराठ्यांच्या सर्व दोषांचे संशोधन व पारायण केल्यानंतर सर यदुनाथांनाही शिवचरित्रारंभी सांगावे लागले आहे! त्यांच्यात इंग्रजांचे गुण नाहीत याचीच यदुनाथांना खंत वाटते व ते बरोबरही आहे. पण आपल्या धर्मबांधवांत तरी आपण मागासलेले खास नाही, असलोच तर आघाडीसच आहो, असे आपल्याला अभिमानाने म्हणता येते, ही काय थोडी वडिलोपार्जित दौलत आपल्या वाट्यास आली आहे? आणि अशा दौलतीचा आरंभ ज्या महापुरुषाने इतिहासात करून दिला त्याचे उपकार व गुण आठवणे, हे आपले कर्तव्य नव्हे काय?

❑❑❑

('श्रीशिवछत्रपति : संकल्पित शिवचरित्राची प्रस्तावना, आराखडा व साधनें' यामधून संक्षेपाने)



# ८. शिवाजीमहाराजांची हिंदवी स्वराज्याची राज्यबंधारणा

**वा. सी. बेंद्रे**

शिवाजीमहाराजांनी वेळोवेळी काढलेल्या हुकमान्वये जी बंधारणा अमलात आली तिच्या वस्तुस्थितीचा विचार केल्यास ती राज्यबंधारणा 'हिंदवी स्वराज्या'च्या क्रांतिकालात कशी उपयुक्त व साहाय्यक ठरली हे समजून येते. या बंधारणेने स्थानिक प्रजाजनांस सर्व क्षेत्रांत स्वायत्तता व समानता मिळू शकली हे लक्षात येते.

खेडेगावाच्या वसाहतींना वाढीस लावण्यासाठी जे खेडुतास स्वयंपूर्ण अधिकार दिले त्यामुळे धान्यसाठा वाढला व प्रजेला रोजगार मिळाल्याने त्यांना आपला चरितार्थ समाधानाने करून घेता आला.

स्वदेशसंरक्षणात सैनिकांच्या गैरहजेरीमुळे होणारे नुकसान टाळण्याकरिता स्वार्थी देशमुख इनामदारांची सैन्यभरतीसाठी दिलेली वतने काढून घेऊन सैन्यभरती सरकारतर्फे होऊ लागली. त्यामुळे सैन्याची तयारी चांगली राहिली व आक्रमणांना पायबंद बसला.

स्वारीवरील मोर्चात बायकामुले नेण्याने जो विनाकारण संहार व पीछेहाटीला कारण होत होते ते टाळण्याकरिता सैन्याच्या हालचालींत सैनिकांना किंवा अधिकाऱ्यांना आपली बायकामुले नेण्यास बंदी घातली.

जेव्हा शत्रूने आपली प्रार्थना मंदिरे किंवा मशिदी सैन्याच्या हालचालींसाठी कोटासारख्या वापरल्या तेव्हाच त्यांना हात लावण्यास हुकूम होते. उलट हिंदूंची देवळे सैन्याच्या सोईसाठी कधीच वापरली जात नसताना किंवा जेथे सैन्याचा विरोध नव्हता तेथीलही केवळ द्रव्यलाभासाठी मोडण्यात, लुटण्यात मोठेपणा मानणारे पोर्तुगीज व इस्लामी सैनिक सेनापती होते.

शिवाजीमहाराजांनी आपल्या सर्व युद्धविषयक हालचाली आपल्याच नियंत्रणाखाली आणि विशेष म्हणजे बाहेर उद्दिष्टांची शत्रूला कल्पना न येऊ देता केल्या. त्याबरोबर वेळोवेळी माघार घेण्यात कमीपणा न मानता आपले सामर्थ्य कमी पडेल असे वाटल्यास मनुष्यबळाची हानी टाळण्याचे शक्य ते प्रयत्न केले.

राज्यव्यवहारयंत्रणेतही अशीच कौशल्यपूर्ण रचना करून ह्या व्यवहारांतही नेहमी आढळून येणारी गडबड थांबवली. सर्व अधिकाऱ्यांवर प्रत्यक्षाप्रत्यक्ष यंत्रणेच्याच साह्याने दबाव राखला. हिंदवी स्वराज्यासाठी निरनिराळे जाबते काढून रूढ केले. त्यामुळे मुलकी राज्यकारभारालाही चांगले वळण लावले. ...

शिवाजीमहाराजांचे 'हिंदवी स्वराज्य' केवळ महाराष्ट्रीयांकरिता नव्हते, त्यात हिंदू धर्माची जरी जोपासना करून स्थानिक हिंदूत धार्मिक व सामाजिक बाबतींत जी असमाधानता निर्माण झाली होती ती दूर करण्याचे प्रयत्न करून त्यांच्यात ऐक्यता राखण्याचा प्रयत्न केला जात होता, तरी परधर्मीय स्थानिक लोकांनाही तितकीच

सुरक्षितता व स्थानिक ऐक्यता राहील अशी व्यवस्था केली जात होती, ज्यांचा जो आचारधर्म असेल तो पाळण्यास त्यांस मुभा होती, परंतु राजनिष्ठा व देशनिष्ठा यांत थोडेही अंतर पडू न देण्याची खबरदारी घेतली जात होती. राजकारभारात किंवा इतर व्यवहारांत धार्मिक भेदाभेदाच्या वातावरणाला वाव नव्हता.

शिवाजीमहाराजांच्या लूटीबाबत आज्ञा कडक होत्या. त्यांनी आपल्या सैनिकांना सक्त ताकीद केली, की वाटेने जाताना कोणत्याही गावात जुलूमजबरदस्तीने अन्नधान्यही घ्यायचे नाही. जरूर असेल ते विकत घेतले पाहिजे. त्याकरिता सरकारने दिलेला पुरवठा नीट जोपासला पाहिजे. शत्रूच्या देशातसुद्धा ठरावीक ठिकाणीच लूट करायची आणि त्या लुटीतही गरीब किंवा सामान्य माणसाला त्रास न होईल अशी काळजी घ्यायची. त्याचप्रमाणे बायकामुलांना त्रास न होईल असे पहायचे. लढाईत सापडलेल्या बायकांना, त्यांच्या नातेवाइकांच्या ताब्यात द्यायचे. ओलीस ठेवलेल्या स्त्रियांची व्यवस्था उत्तमरीतीने ठेवायची व मागितलेली खंडणी त्यांच्या कुटुंबीयांनी दिली की त्यास मानमरातबाने जाऊ द्यायचे. त्यामुळे मोगली व इतर इस्लामी सरदारांत शिवाजीमहाराजांबद्दल बराच आदर वाढला होता.

या सर्व राज्यबंधारणेचा व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचा विचार केला तर ही शिवाजीमहाराजांची राजकारणी सूत्रबद्ध रचना तत्कालीन इतर राज्यांपेक्षा पुष्कळच महत्त्वाची व हिंदवी संस्कृतीच्या वरच्या दर्जास शोभेल अशीच होती. ती स्थानिक प्रजेला आपली देशनिष्ठा व राजनिष्ठा स्वाभिमानाने अधिकाधिक वाढीस लावण्यात प्रवृत्त करत होती. म्हणून संभाजीच्या कारकिर्दीत औरंगजेबासारख्या महान सामर्थ्यवान शत्रूला तिने दिङ्मूढ करून टाकले व राजारामनंतरच्या कालातील नेतृत्वहीन महाराष्ट्र आपल्या 'हिंदवी स्वराज्या'त स्वायत्तता व स्वातंत्र्य टिकवू शकला.

निरनिराळ्या भागवतधर्मीय व इतर पंथीयांना आपापल्या धर्माचा प्रसार करण्यास मोकळीक मिळाल्याने हिंदू समाजाच्या फार मोठ्या संख्येस याचा फायदा मिळाला व त्यांचा जो ईश्वरभक्तीचा जन्मसिद्ध हक्क जो हिरावून घेतला होता तो त्यास मिळाला.

सामाजिक बाबतीत शिवाजीमहाराजांनी जातीजातींत व धर्माधर्मांत भेदभाव मानू दिला नाही. उलट पुराणकालीन निर्बंध बाटले गेलेल्या लोकांवर न लादता त्यांना पुन्हा हिंदूधर्मात व पूर्वीच्या जातीजमातींत घेण्याची तरतूद सरकारतर्फे करण्याचे प्रयत्न केले.

हिंदू समाजाच्या दृष्टीने पाहिले तर पठाणांच्या धार्मिक जुलूमजबरदस्तीमुळे हिंदू समाज अगदी निकृष्टावस्थेस पोहोचला होता. शिवाजीमहाराजांनी उचल खाऊन 'हिंदवी स्वराज्या'ची घटना निकोप व शक्तिमान केली नसती तर पठाणी सरदारांनी आपली पकड अधिकच बसवली असती आणि थोड्याच वर्षांत या समाजाचे अस्तित्वच नाहीसे केले असते. ही अत्यंत महत्त्वाची व आवश्यक क्रांती झाल्याने भारतात हिंदू समाजाला जगता आले. त्यामुळे शेवटी इस्लामी सत्तांना नामोहरम होऊन राहावे लागले हाच सर्वांत मोठा सामाजिक विक्रम होय. हा विक्रम शतकानुशतके भारतीय जनतेच्या

स्मरणातून दूर जाणार नाही. ...

**सारांश :** सतराव्या शतकाचे प्रारंभी रूढ असलेल्या आचारधर्मात शिवाजीमहाराजांनी जी क्रांती केली त्यांतील काही महत्त्वाच्या घटना अशा :

१. सर्व धर्मांना समान वागणूक. धर्मनिरपेक्षता.
२. सर्वांना आपले चालू व कालांतराने लुप्त झालेले आचारधर्म आचरण्यास स्वातंत्र्य.
३. अध्ययन अध्यापनाचा जातीयतेशी संबंध तोडला. भागवतधर्माचा पुरस्कार.
४. नोकरी रोजगारांत सर्व धर्मीयांना व जातींना समानत्व, मात्र कर्तृत्व व निष्ठा आवश्यक.
५. बाटवण्यास विरोध व बाटलेल्यांस पुन्हा धर्मांत घेण्यास मान्यता.
६. स्त्रिया व मुले यांचे सर्व परिस्थितीत संरक्षण.
७. संतसाधूंचा आदर.
८. गुलामांच्या खरेदी-विक्रीला आळा.
९. स्वाऱ्यांच्या छावण्यांत स्त्रियांना बंदी.
१०. खेडेगावांना बरीच स्वायत्तता व समानता.
११. लष्कर सरकारच्या मालकीखाली.
१२. आरमार व समुद्रावरील हालचालींच्या धंदेरोजगारांतील धार्मिक समजुती दूर करून आरमार बळकट करणे व व्यापार वाढवणे.
१३. राज्याच्या व्यवहाराला शिस्तबद्ध वळण.
१४. राजपदास प्रजेची मान्यता.
१५. मुलखाच्या लुटालुटीत पाळायचे निर्बंध.
१६. कलाशास्त्रांचा उपयोग व उत्तेजन.

आणखीही बारीकसारीक गोष्टींमुळे सामाजिक व धार्मिक जीवनांत तंटेबखेडे होण्याची कारणे दूर केली. त्यामुळे महाराष्ट्रीयांत अपूर्व अशी संघटना घडून आली. राजनिष्ठेने कळस गाठला. इतका, की राजा किंवा नेतृत्वाविना या संघशक्तीने मोगली महासंकटाचा परिहार केला. या फलप्राप्तीचा विचार केला तर महाराष्ट्रात अवघ्या ३९-४० वर्षांत एवढे महत्त्वाचे राष्ट्रीय परिवर्तन घडवून आणणाऱ्या राजात ईश्वरी अंश अथवा गुणांची जागृती झाल्याची प्रत्यक्ष जाणीव झाली असल्यास नवल कसचे? दोन-तीनशे वर्षांनी स्थानिक जनतेला, स्वराज्याचा लाभ आणि तोही हिंदवी स्वराज्याचा लाभ मिळाल्याने तो मिळवून देणाऱ्याबद्दल विशेष आदर व आपुलकी वाटणे साहजिकच होते. त्यातूनही त्या काळी पारतंत्र्य व स्वातंत्र्य या दोहोंचाही प्रत्यक्ष अनुभव घेणारी प्रजा बरीच हयात असल्याने त्यांना या राजकीय व धार्मिक पारतंत्र्यातून मुक्तता झाल्याबद्दल विशेष अभिमान व प्रेम वाटणे साहजिक होते. त्यांनी शिवाजीमहाराजांना आपल्या खास अनुभवानंतर युगपुरुष म्हणून संबोधणे अगदी अंतःकरणातून उत्स्फूर्त

झालेले असणार. शिवाजीमहाराजांच्या चरित्रातील इतर घटनांचा विचार केला तरीही पुढील गीतावचनाचे स्मरण झाल्याशिवाय राहाणार नाही.

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम्॥



('श्री छत्रपती शिवाजीमहाराज यांचे विचिकित्सक चरित्र, खंड-२' मधून संक्षेपाने)



# ९. शिवरायासी आठवावे

**सेतुमाधवराव पगडी**

चैत्र शुद्ध पौर्णिमा शके १६०२ शनिवारी (तीन एप्रिल १६८० रोजी) भारताच्या इतिहासातील एका राष्ट्रपुरुषाने आपली जीवितयात्रा संपवली. शिवाजीमहाराजांचे आयुष्य हे स्वातंत्र्य रक्षणाच्या ध्येयाने प्रेरित होऊन अविश्रांत झगडणाऱ्या पण तरीही विचार आणि विवेकाची कास न सोडणाऱ्या मानवश्रेष्ठाचे चरित्र आहे. महाराजांची ध्येये, त्यांचे रणांगणातील कौशल्य, लष्करी डावपेच, वेळप्रसंगी माघार तर संधी पाहून आक्रमण, आपण स्थापित असलेले राज्य हे खऱ्या अर्थाने कल्याणकारी ठरावे, आपल्या जनतेचा सर्वांगीण विकास व्हावा, आपले सांस्कृतिक जीवन समृद्ध व्हावे आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे राष्ट्राची अस्मिता जागृत व्हावी यासाठी महाराजांनी केलेली प्रयत्नांची पराकाष्ठा, ही सर्व पाहता त्यांचे आयुष्य म्हणजे समकालीनांना एक चमत्कार तर वाटलाच, पण आजतागायत भारतातील पिढ्या त्यांच्या चरित्राने भारावून गेल्या आहेत.

शून्यातून ब्रम्हांड निर्माण करणारा हा राजा. परधर्मसहिष्णुतेचे संस्कार बालपणीच झालेले. १६३१ मध्ये महाराजांचे वडील शहाजीराजे हे मोगलांतर्फे नाशिकचे लष्करी अधिकारी होते. पण त्याच वर्षाच्या शेवटी त्यांनी उत्तरेकडील मोगलांच्या तावडीतून अहमदनगरची निजामशाही मुक्त करण्याचे ठरवले. चार वर्षांपर्यंत ते मोगल बादशहा शहाजहान याच्या सैन्याशी लढत होते. सर्व दक्षिणी शक्तींनी एक होऊन मोगलांचे संकट तारले पाहिजे असे आवाहन त्यांनी केले. विजापूरच्या आदिलशाहीला त्यांनी पाठवलेला पुढील संदेश पहा :

"निजामशाहीतील चौऱ्याऐंशी किल्ल्यांपैकी एक दौलताबादचा किल्ला गेला तर गेला (जून १६३३). जुन्नरसारखी तख्ताची जागा आपले हाती आहे. जर करता आपण मजमित्राचा अंगिकार करून माझे साह्य केल्यास व मजला मदत दिल्यास यत्नाची कमरबंद जिवाचे कमरेवर बांधून निजामशाही राजधानीचा झेंडा पुन्हा उभा करू."

विजापूरकडून प्रतिसाद मिळाला नाही. पुणे व कल्याण-भिवंडी प्रांत मोगलांकडून पदरात पाडून घेऊन विजापूरने निजामशाहीच्या सर्वनाशात मोगलांशी सहकार्य केले. शहाजीराजांना आपला लढा थांबवून विजापूरची नोकरी पत्करावी लागली (ऑक्टोबर १६३६). पण १६३२ पासून १६३६ पर्यंत शहाजीराजांचा मोगलांशी चाललेला संघर्ष अगदी अटीतटीचा होता. 'इत साहजु है उत साहिजहां' अशा अर्थाने दक्षिणेचे डोळे या संघर्षाकडे लागले होते. हा संघर्ष संपला त्या वेळी शिवाजीमहाराजांना सातवे वर्ष चालू होते. या पाच वर्षांच्या काळात त्यांना जुन्नर, नाशिक, माहुली इत्यादी ठिकाणी फिरावे लागले असेल. त्यांच्या आयुष्यातील पहिला संस्कार हा. पुढे १६७७ मध्ये त्यांनी गोवळकोंडे आणि नंतर विजापूर या दक्षिणी राज्यांशी धर्मनिरपेक्ष सख्य जोडून

मोगलांविरुद्ध आघाडी उघडली. लहानपणीचे संस्कार फळाला येतात ते असे.

**एकेक पाऊल पुढे आणि पुढची वाट :** महाराजांचे जीवन म्हणजे वाढत्या आकांक्षांची कहाणी. लहानपणी (बाराव्या वर्षी) ते आपल्या वडिलांकडे बेंगळूरला जाऊन आले. पुढे ते महाराष्ट्रातील आपल्या वडिलांच्या जहागिरीचे वहिवाटदार म्हणून काम पाहू लागले. जहागिरीत किल्ल्यांचा समावेश नसे. १६४३ मध्ये आदिलशहाची शहाजीवर इतराजी झाली आणि आदिलशाही सैन्याने पुण्याची जहागीर उद्ध्वस्त केली. या गोष्टीपासून महाराजांनी धडा घेतला. जहागिरीच्या (आणि नंतर राज्याच्या) संरक्षणासाठी दुर्ग, किल्ले पाहिजेत. सह्याद्रीच्या उत्तुंग शिखरांचा, डोंगरांच्या रांगांचा आणि दऱ्याखोऱ्यांचा त्यांनी आयुष्यभर दुर्गनिर्मितीसाठी उपयोग करून घेतला.

आज्ञापत्रात महाराजांची राजनीती वर्णिली आहे ती अशी, ''संपूर्ण राज्याचे सार ते दुर्ग. दुर्ग नसतां मोकळा देश परचक्र येतांच निराश्रय प्रजाभग्न होऊन देश उद्धस होतो... औरंगजेबासारखा महाशत्रु चालून येऊन... त्याचे यत्नास असाध्य काय होतें? परंतु राज्यांत किल्ले होते म्हणून अवशिष्ट तरी राज्य राहिलें. पुढे पूर्ववत करावयास अवकाश जाहला''.

महाराजांनी पुण्याच्या जवळपासच्या टेकड्या आणि डोंगर ताब्यात घेण्यास सुरवात केली. आपल्या बापाच्या जहागिरीचा त्यांनी संपूर्ण ताबा मिळवला. सिंहगड त्यांनी १६४७ मध्ये घेतला. पण अल्पशा झुंजीनंतर त्यांना शहाजीराजांच्या सुटकेच्या मोबदल्यात तो किल्ला विजापूरकरांना परत द्यावा लागला. राजगड, तोरणा, रोहिडा आणि शेवटी पुरंदर हे किल्ले त्यांच्या ताब्यात आले.

**विजापूर विघटनाकडे :** १६३५ च्या मोगल तहाने गोवळकोंड्याचे राज्य हे मोगलांचे संपूर्णपणे मांडलिक बनले होते. विजापूर हे खंडणी देण्यास बांधले गेले असले तरी बऱ्याच प्रमाणात स्वतंत्र होते. शहाजहानने आता यापुढे तुमच्या राज्यांना आमच्याकडून उपसर्ग पोहोचणार नाही, असे दक्षिणेतील राज्यांना आश्वासन दिले होते. मोगलांनी महाराष्ट्राचा पहिला प्रांत घेतला तो वऱ्हाड (१५९६), १६०१ मध्ये त्यांनी खानदेश आपल्या साम्राज्याला जोडला. १६३६ पर्यंत नाशिक, नगर, जुन्नर प्रांत, मराठवाड्याचा बराचसा भाग त्यांच्या ताब्यात आला. म्हणजे महाराजांच्या वयाच्या सातव्या वर्षापर्यंत महाराष्ट्र हा विजापूर व मोगल यांत वाटला गेला. त्यात मोगलांकडे आजच्या महाराष्ट्रातील सुमारे अठरा जिल्हे, तर विजापूरकडे आठ जिल्हे होते आणि महाराजांची पुण्याची जहागीर होती विजापूर राज्यात.

**आक्रमक मोगल :** स्वतंत्र किंवा अर्धस्वतंत्र राज्ये टिकू द्यायची नाहीत ही मोगलांची राजनीती. रजपूत राज्ये ही नावाला राज्ये. वस्तुतः मोगल त्यांना जहागिरीच समजत आणि राजांना आपल्या अधिकारी वर्गातील मनसबदार समजत. १६५३ मध्ये राजपुत्र औरंगजेब हा दक्षिणचा सुभेदार म्हणून आला. विजापूर व गोवळकोंडा या दोन्ही

राज्यांबद्दल त्याने आक्रमक धोरण स्वीकारले. त्याने गोवळकोंड्याचा मुख्य प्रधान मीर जुम्ला याला फोडून आपल्याकडे आणला आणि गोवळकोंड्यावर स्वारी करून त्या राज्यावर जबर दंड आणि अपमानास्पद अटी लादल्या.

**महाराजांचे सूक्ष्म निरीक्षण :** विजापूर राज्यात मोगलांनी घुसखोरी, दमदाटी, अधिकाऱ्यांना फोडून आपल्या नोकरीत घेणे, विजापूरच्या सरदारांना अंतर्गत बंडाळी करण्यास चिथावणे इत्यादी प्रकार सुरू केले होते. विजापूर व कोकण किनारपट्टी यांचा संपर्क तोडावा आणि कोकणात आपली सत्ता बसवावी हा महाराजांचा हेतू. महाराजांनी विजापूरचे सार्वभौमत्व नाकारले नाही. पण मोगल दडपणाखाली विघटनाकडे वाटचाल करत असलेले विजापूरचे सरदार हे हळूहळू आपापल्या प्रांतात कायम होऊ पाहात होते. कर्नाटकात पठाण, राजापूर-वेंगुर्ल्याकडे सिद्दी रणदूल्लाखान आणि रुस्तमजमान, कर्नूल भागात सिद्दी जौहर ही नावे पाहता मराठी मातीतून आलेले, पुण्याचे तीन पिढ्यांचे उमराव शिवाजीमहाराज यांना मावळात आणि कोकणात आपली प्रत्यक्ष सत्ता (डी फ्यक्टो सॉवरीन्टी) स्थापन करण्याचा आणि विजापूरकडे फक्त कायदेशीर सार्वभौमत्व (डी ज्यूरे सॉवरीन्टी) ठेवण्याचा अधिकार होता. जावळीची मोहीम, रायगडचा ताबा आणि प्रतापगडची निर्मिती हे राजकारण याच योजनेत अंतर्भूत होते. ही मोहीम करण्यास औरंगजेबानेही उत्तेजन दिले हे नुकतेच सापडलेल्या संकर्षण सकळकळे याच्या शिवकाव्यावरून सिद्ध झाले आहे.

**औरंगजेबाची स्वारी :** चार नोव्हेंबर १६५६ रोजी विजापूरचा मुहंमद आदिलशहा हा मरण पावला आणि त्याबरोबरच औरंगजेबाने विजापूरवर स्वारी केली. शिवाजीमहाराज विजापूरतर्फे लढले, पण विजापूरचे भवितव्य काय याची कल्पना असल्यामुळे महाराजांनी औरंगजेबाशीही बोलणी चालू केली होती. या युद्धात विजापूरचा पराजय झाला आणि ऑगस्ट १६५७ च्या तहाने मोगलांना कल्याणी, बेदर, पुणे, कल्याण, भिवंडी हे प्रांत मिळाले. विजापूरचे जहागीरदार शिवाजीमहाराज हे मोगल साम्राज्याचे प्रजाजन झाले.

शहाजहानच्या आजाराचा (सहा सप्टेंबर १६५७) आणि औरंगजेबाच्या अडचणींचा लाभ घेऊन महाराजांनी चोवीस ऑक्टोबर १६५७ रोजी गरुडझेप घेऊन कल्याण, भिवंडीवर ताबा मिळवला आणि मराठी आरमाराची स्थापना केली. नऊ जानेवारी १६५८ रोजी त्यांनी माहुलीचा किल्ला जिंकून घेतला. औरंगजेबाचा तडफडाट झाला, पण करतो काय त्याचे डोळे उत्तरेकडे लागलेले. दीड वर्षपर्यंत तो दिल्ली आग्र्याच्या भाऊबंदकीत गुंतला होता.

महाराजांची इच्छा की, पुणे आणि कल्याण-भिवंडी प्रांत यांवर प्रत्यक्ष ताबा आपला असावा. कायदेशीर आधिपत्य (डी ज्यूरे सॉवरीन्टी) मोगलांचे राहू देण्यास महाराजांची हरकत नव्हती.

**अफजलखान :** वास्तविक पाहता विजापूरचे खरे शत्रू मोगल. विजापूर गिळंकृत





करणे हा त्यांचा बेत होता. महाराजांचा नव्हता. पुणे, कल्याण प्रांतावरचा महाराजांचा ताबा हा त्यांचा आणि मोगलांचा प्रश्न होता. त्यात विजापूरला पडण्याचे काही कारण नव्हते. महाराजांशी मिळतेजुळते घेणे त्यांचा प्रश्न. हा राजकीय प्रश्न (पोलिटिकल प्रॉब्लेम) होता. लष्करी पद्धतीने तो सुटण्यासारखा नव्हता. पण जावळीची जहागीर मोऱ्यांना परत द्या आणि पुणे, कल्याण, भिवंडी मोगलांना परत करा अशी मागणी करत अफजलखान हा त्यांच्यावर चालून गेला. त्याने महाराजांना लिहिलेले पत्र व त्याला महाराजांनी दिलेले उत्तर ही संस्कृत भाषांतरातून कवींद्र परमानंदाच्या शिवभारतात शिल्लक राहिली आहेत आणि गेली तीनशे वर्षे सुरक्षित राहिली आहेत, हे आपले भाग्य आहे.

अफजलखानाच्या मागण्या मान्य करणे म्हणजे महाराजांची राजकीय आत्महत्याच होती. त्यांनी सामना देण्याचे ठरवले. महाराजांची तयारी पाहता 'अखंड सावधान' हे त्यांच्या जीवनाचे प्रमुख सूत्र होते असे वाटल्यावाचून राहात नाही. महाराजांचे धाडस अतुल, पण ते अविचारी धाडस नव्हते. स्वसंरक्षणाची जय्यत तयारी, सैन्याची योजना, अफजलखानाला स्वत:बद्दल अहंकार वाटावा अशा प्रकारची महाराजांची वरकरणी अजिजीची वागणूक. हे सर्व प्रसंगच अद्भुत आहेत. शके १५८१ मार्गशीर्ष शुद्ध सप्तमी गुरुवार विकारी संवत्सर, दहा नोव्हेंबर १६५९ रोजी अफजलखानाचा वध झाला आणि सारा दक्षिण भारत हादरला. महाराजांनी अवघ्या अठरा दिवसांत पन्हाळगडचा किल्ला घेतला. त्यांचे सैन्य दक्षिण कोकणात पसरले. खऱ्या अर्थाने मराठी राज्य जन्मास आले ते दहा नोव्हेंबर १६५९ रोजी.

**मोगल :** विजापूरचा सरदार सिद्दी जौहर याने पन्हाळगडला वेढा घातला. महाराज किल्ल्यावर, त्या वेळी (मार्च १६६०) औरंगजेबचा मामा आणि दक्षिणचा सुभेदार शायस्ताखान हा प्रचंड सैन्य घेऊन पुण्याच्या वाटेवर होता. पुणे, कल्याण, भिवंडी हे प्रांत मोगल साम्राज्यात समाविष्ट झाले होते. शिवाजीमहाराजांच्या हालचाली म्हणजे कायदा आणि सुव्यवस्था यांचे प्रश्न आहेत अशी मोगलांची भूमिका होती.

विजापूरकरांनी शिवाजीमहाराजांना मदत करू नये इतकी माफक अपेक्षा शायस्ताखानाने बाळगली. शिवाजीमहाराजांनी, आपण विजापूरच्या मोहिमेत सहकार्य करू नाहीतरी तुमचे खरे लक्ष्य विजापूर आहे. माझ्याकडे कोकण, पुणे व कोल्हापूर बालाघाट (सातारा, सांगली) राहू द्या. अशी बोलणी लावली. शायस्ताखानाने तिकडे दुर्लक्ष केले. ही मोठी चूक झाली असे मिर्झाराजा जयसिंग याने औरंगजेबाला लिहिलेल्या पत्रात कळवले आहे. जयसिंग म्हणतो, 'शिवाजी एक पिढीजाद भूपती (राजा) नव्हे. तो जमीनदार आहे (देशमुख). तो एका अधिकाऱ्याचा मुलगा आहे. त्याला पुढे करून आपण विजापूरचे प्रकरण निकालात काढले असते. आता ते दुखणे अवघड होऊन बसले आहे.'

**शायस्ताखानाची मोहीम :** नऊ मे १६६० रोजी शायस्ताखान हा पुण्यात दाखल झाला. मैदानातील मुलूख मोगलांनी हां हां म्हणता व्यापला. पुणे, सुपे, बारामती, इंदापूर, चाकण, कल्याण, भिवंडी, चौल, रेवदंडा ही स्थळे त्यांच्या हातात पडली. ती १६७० पर्यंत मोगलांच्या ताब्यात होती. पण किल्ल्यासमोर मोगलांचे काही चालेना. चाकणचा वेढा (पंधरा ऑगस्ट १६६०) मोगलांना महागात पडला. ते महाराजांच्या किल्ल्यांच्या वाटेस गेले नाहीत. मैदान मोगलांकडे आणि किल्ले मराठ्यांकडे, महाराजांनी एकीकडे पन्हाळगड विजापूरला देऊन टाकला, तर दुसरीकडे दक्षिण कोकणात आपला जम बसवला. मोगलांनी महाराजांची माणसे फोडण्यास सुरवात केली. मोगल पुणे सोडून हलेनात. यातूनच महाराजांचा शायस्ताखानाच्या गोटावरील धाडसी छापा उद्भवला.

**पाच एप्रिल १६६३ :** शायस्ताखानावरील छापा ही महाराजांच्या जीवनातील आणखी एक अद्भुत कथा. कथा धाडसाची, पण अविचारी धाडसाची नव्हे. मोगल छावणीची बित्तंबातमी काढूनच महाराज संपूर्ण तयारीनिशी गेले होते. म्हणूनच शायस्ताखानाचा दुय्यम सेनापती जोधपूरचा जसवंतसिंग याने शायस्ताखानाची फजिती व्हावी म्हणून महाराजांच्या हालचालींना मोकळीक दिली, अशा अफवा जसवंतसिंगाचा स्वीय कारकून इतिहासकार भीमसेन सक्सेना हा आपल्या आत्मचरित्रात नोंदून ठेवतो.

शायस्ताखानावरील छाप्याने सारे मोगल साम्राज्य स्तिमित झाले. महाराजांचे नाव भारतात सर्वतोमुखी झाले. शायस्ताखानाची नाचक्की होऊन त्याला बंगालच्या सुभेदारीवर जावे लागले. मोगलांच्या गोंधळाचा फायदा घेऊन महाराजांनी लगेच सुरतेवर हल्ला करून ते समृद्ध शहर लुटले (जानेवारी १६६४). त्या संदर्भात मोगलांना लिहिलेल्या पत्रात महाराजांनी म्हटले आहे, ''माझ्या देशाचे रक्षण करणे हे माझे कर्तव्य आहे.'' हे शब्द आजही समर्पक आणि यथार्थ नाही असे कोण म्हणेल!

शायस्ताखान निघून गेला, पण पुण्यातून मोगल सैन्य हलले नाही. दुय्यम सेनापती जसवंतसिंग याने सूत्रे हाती घेतली, पण त्याला सिंहगडासमोर माघार घ्यावी लागली. महाराजांनी १६६५ च्या सुरवातीला जहाजमार्गे जाऊन कानडा जिल्ह्यातील बसरूर बंदर लुटले. (पंधरा फेब्रुवारी १६६५.)

**मिर्झाराजा जयसिंग :** तोपर्यंत मिर्झाराजा जयसिंग हा पुण्याकडे चाल करून येत होता. तीन मार्च १६६५ रोजी तो पुण्यास पोहोचला. एक महिन्याच्या आत पुरंदरला मोगलांचा वेढा पडला. जयसिंगाने फिरती पथके पाठवून महाराजांच्या मुलखात मोठ्या प्रमाणात जाळपोळ चालवली. महाराजांनी मोगल मुलखात जाऊ नये म्हणून कल्याण, लोहगड, पुणे इत्यादी ठिकाणी भक्कम लष्करी तळ उभारले. जयसिंगाने विजापूरचे सरदार फोडले आणि आदिलशहाला जरब दाखवून महाराजांपासून वेगळे केले. मराठ्यांनी पुरंदर मोठ्या शौर्याने लढवला; पण मुरारबाजीचे हौतात्म्य पत्करूनही महाराजांना मोगलांसमोर शरणागती स्वीकारावी लागली.

**हलाहल : ११ जून १६६५ :** तेवीस किल्ले, चार लाख होनांचा मुलूख, कोकणासाठी व अद्याप न जिंकलेल्या कोल्हापूर बालाघाटासाठी दोन कोटी होनांची खंडणी (तेरा हप्त्यांत फेडायची) या अपमानास्पद अटी महाराजांना स्वीकाराव्या लागल्या. महाराजांच्या हातात बारा किल्ले आणि एक लाख होनांचा मुलूख (चार लाख रुपये) तेवढा राहिला. कोकणचा मध्य व दक्षिण भाग आणि घाटावर भोर व जावळीसारखे किरकोळ तालुके त्यांच्याकडे राहिले.

दुसरा कोणी असता तर या अपयशाने खचून गेला असता पण महाराजांनी शंकराप्रमाणे हे हलाहल पचवले. मोगलांच्या विजापूरच्या मोहिमेत ते सामील झाले. विजापूरच्या मोहिमेत जयसिंगाला अपयश आले तशी त्याला विजापूर आणि शिवाजी यांची युती झाल्यास मोगलांना महाग पडेल अशी काळजी वाटू लागली. जयसिंगाच्या चिथावणीनेच औरंगजेबाने शिवाजीमहाराजांना आग्र्याला बोलावले.

रोख रुपये देऊन मोगलांनी घेतलेले किल्ले आणि मुलूख परत मिळवावेत असा महाराजांचा हेतू होता. विजापूरचे राजकारण सिद्ध करण्यासाठी तरी मोगल आपल्याबरोबर तडजोडीने वागतील अशी महाराजांची अपेक्षा.

पण प्रत्यक्ष भेटीत औरंगजेबाने ज्या बेपर्वाईने महाराजांना वागवले त्याची तीव्र प्रतिक्रिया महाराजांनी व्यक्त केली.

**महाराजांची गर्जना :** ''मी कशा प्रकारचा मनुष्य आहे हे तुम्ही पाहिले, तुमच्या वडिलांनी पाहिले. मला मुद्दाम इतका वेळ उभे करण्यात आले. मी तुमची मन्सब टाकून देतो. मी उभे राहावे अशी तुमची इच्छा होती तर मला योग्यतेनुरूप उभे करावयाचे होते.

माझे मरण ओढवले आहे. एक तुम्ही तरी मला मारा नाही तर मी तरी स्वत:ला मारून घेईन. माझे डोके कापून न्यायचे असेल तर घेऊन जा. मी बादशहाच्या समोर जाणार नाही.

मी वस्त्रे घेणार नाही. बादशहाने मला मुद्दामच जसवंतसिंगाच्या खाली उभे केले. मी असा मनुष्य असूनही मला मुद्दाम उभे करण्यात आले. मला मारायचे असेल तर मारा, कैदेत टाकायचे तर टाका. मी वस्त्रे अंगावर घालणार नाही.''

मोगल दरबारात अशी गर्जना यापूर्वी भारतातून उठली नव्हती. या गर्जनेने मोगल साम्राज्यातील सारी जनता थरारून उठली.

''आगे तो सेवाजी की मरदानगी व हिमती ते खलक सराही थी (पूर्वी जनता शिवाजीची मर्दुमकी वहिमत यांची स्तुति करीत होती.) और अब ओठो पातशाहजीकी कुजुरी भी आई सखती करी करडा जबाब कहया, तीथे खल कसेवाजीकी मरदानगी ते बहुत सराहो छोजी (आणि आता तर शिवाजी बादशहाच्या दरबारात येऊन प्रत्यक्ष

तोंडावर कडक उत्तरे देतो हे पाहून जनता शिवाजीच्या मर्दुमकीची खूपच स्तुती करीत आहे).''

हे उद्गार समकालीन राजस्थानी पत्रातील आहेत. महाराजांची इच्छा, आवश्यक असल्यास रक्कम भरून किल्ले व मुलूख सोडवावे. औरंगजेबाची इच्छा महाराजांचे उरलेसुरले किल्ले घेऊन, त्यांना मन्सब देऊन महाराष्ट्राबाहेर निर्वासित करावे.

तीन महिने महाराजांच्या डोक्यावर मृत्यू वावरत होता पण काहीना काही कारण घडत गेले आणि महाराजांचे मरण टळत गेले. शेवटी पाश आवळले जातील याची खात्री पटल्यामुळे महाराज संभाजीराजांसह आग्र्यातून १७ ऑगस्ट १६६६ रोजी वेषांतर करून निसटले आणि खडतर प्रवास करून राजगडास पोहोचले. आग्र्याहून सुटका हे महाराजांच्या जीवनातील आणखी एक अद्भुत प्रकरण.

**पुढील तीन वर्षे :** वास्तविक पाहता मोगल आणि महाराज यांच्यात याच वेळी बेबनाव व्हायचा, पण महाराजांना तयारी करण्यास वेळ हवा होता. त्यांनी तीन वर्षे पड खाल्ली. स्वत:साठी राजा ही पदवी आणि संभाजीराजांसाठी मन्सब स्वीकारली. महाराजांच्या सैन्यातील काही पथके औरंगाबादेस मोगलांच्या तैनातीत ठेवण्यात आली.

हे संबंध तसेच चालू राहणे अशक्य होते. मोगलांची यंत्रणा, त्यांची धोरणे आणि त्यांची आक्रमक भूमिका ही महाराजांनी सूक्ष्मपणे पाहिली. महाराजांचे स्वराज्य केवढेसे आणि मोगल साम्राज्य किती मोठे. पण महाराजांचे किल्ले घेऊन त्यांना नष्टच करावे ही मोगलांची नीती.

हा लढा म्हणजे एकीकडे स्वातंत्र्याचा तर दुसरीकडे आक्रमणांचा असा होता आणि आक्रमण कोण करत होते-स्वत: मध्य आशियाचे तुर्क आहोत, आम्ही भारताचे राजे, भारतीय राजे नाहीत असे अभिमानाने सांगणारा-औरंगजेब, शेकडा पाऊणशेच्या वर इराण तुराणच्या नवागतांनी व्यापलेली मोगल नोकरशाही, भारतीय संस्कृती कस्पटासमान मानणारी, भारतीय नागरिकांच्या धर्माची अवहेलना करणारी ही वेडी राजसत्ता, हे मोगल राजवटीचे भयानक स्वरूप महाराजांच्या नजरेतून सुटले नाही. ती बव्हंशाने परक्याने व्यापलेली. अकबरापासून औरंगजेबाच्या मृत्यूपर्यंतची मुख्यमंत्री, मंत्री, सुभेदार, सेनापती यांची यादी प्रसिद्ध झाली आहे. त्यात भारतीय मुसलमानसुद्धा क्वचितच दिसतात. हिंदूंची गोष्टच सोडा. ही परिस्थिती बदलण्याचा प्रयत्न झालाच नाही.

मोगल नोकरशाहीचे भारतीकरणाचे जाणीवपूर्वक प्रयत्न झाले नाहीत असे मत थोर इतिहासकार डॉक्टर मुहंमद अतहर अली यांनी व्यक्त केले आहेत.

अशा सरदारांच्या व सैनिकांच्या निष्ठा भाडोत्री आहेत. ते लढताहेत पगार मिळतो म्हणून आणि आपली माणसे लढताहेत स्वराज्य रक्षणासाठी, स्वत:च्या भूमीच्या तुकड्यासाठी, आक्रमणासाठी नव्हे हे महाराजांनी हेरले.

मोगल सैन्याची सरंजामी पद्धत, संथ हालचाली, भोंगळ रचना, सरदारांतील

वांशिक, धार्मिक व वैयक्तिक हेवेदावे आणि आग्न्यात बसून मोहिमांच्या लहानसहान तपशिलांत हस्तक्षेप करण्याचा औरंगजेबाचा स्वभाव ही वैशिष्ट्ये कुणालाही दिसू शकली असती. उलट महाराजांचे खडे आणि वेळोवेळी पगार मिळणारे राष्ट्रीय सैन्य आणि आरमार, महाराजांच्या चपळ हालचाली, सैन्याबरोबरच राजकारणाचे डावपेच या गोष्टी मोगलांना भारी पडल्या.

महाराजांना आत्मविश्वास जबर, तो निश्चयाचा महामेरूच. आपण सत्य आणि न्याय यांसाठी लढत आहोत. परमेश्वर आपल्या पाठीशी आहे ही त्यांची नितांत खात्री.

**१६७० : रौद्र स्वरूप :** आणि म्हणून महाराजांनी जाणीवपूर्वक १६७० मध्ये मोगल साम्राज्याविरुद्ध टक्कर घेतली. त्यांचे युद्धविषयक हालचालींचे रौद्र स्वरूप स्तिमित करून सोडणारे आहे. पहिल्या सहा महिन्यांत (१६७०) त्यांनी मोगलांनी घेतलेले जवळजवळ सर्व किल्ले सोडवले आणि स्वराज्यातून त्यांना हाकलून लावले. मोगलांची दैना काय सांगावी. सिंहगड (उदयभानचा मृत्यू), पुरंदर (किल्लेदार रजिउद्दीन कैदेत,), माहुली (अलावर्दीखानाचा मृत्यू), कल्याण (उजबेकखानाचा मृत्यू आणि सोदीखानास प्राणांतिक जखमा) ही मोगलांच्या हानीची काही उदाहरणे.

**बागलाणात आक्रमण :** महाराजांच्या मोहिमा चौफेर चालू झाल्या. त्यांनी मोगल मुलखात सर्वत्र चढाई केली. आजचा मराठवाडा, वऱ्हाड आणि खानदेश या प्रांतांत मराठी सैन्याने प्रचंड प्रमाणात धामधूम उडवून दिली. औरंगाबादेस औरंगजेबाचा मुलगा मुअज्जम शहा आलम हा बिनलढाऊ प्रशासक. एक खानदेशाचा सुभेदार दाऊदखान कुरेशी तेवढा प्रतिकार करत होता, पण महाराजांनी त्याला भीक न घालता नाशिक जिल्ह्यातील अनेक किल्ले भराभर घेतले. सुरतेची दुसऱ्यांदा लूट केली आणि वणीदिंडोरीच्या (कांचनबारी) लढाईत स्वतः हजर राहून दाऊदखानाचा पराजय केला.

औरंगजेबाने महाराजांविरुद्ध काबूलचा सुभेदार महाबतखान यास पाठवले (जानेवारी १६७१). याच महिन्यात महाराजांनी नाशिक जिल्ह्यातील साल्हेरचा किल्ला घेऊन गुजरात, खानदेश हे प्रांत हादरवून सोडले. दाऊदखान हा महाबतखानाशी भांडून निघून गेला आणि महाबतखानाची निष्क्रिय म्हणून उचलबांगडी झाली. त्याच्यानंतर गुजरातचा सुभेदार बहादूरखान आला. मोगलांनी साल्हेरला वेढा घातला पण महाराजांनी मोगलांवर प्रचंड विजय मिळवला (१६७२).

नाशिकच्या मोगल मुलखातून मराठ्यांचे झालेले आक्रमण परतून लावण्यात मोगल फौजा गुंतल्यामुळे स्वराज्यावरील मोगलांच्या स्वाऱ्या लांबणीवर पडल्या. खुद्द नाशिक जिल्ह्यातून मराठ्यांना काढून लावण्यास मोगलांना एकोणीस वर्षे लागली. महाराजांच्या १६७०-७३ च्या मोहिमा आजही लष्करी तज्ज्ञांनी तपासून बोध घेण्यासारख्या आहेत. महाराजांचे युद्धकौशल्य आणि राजकीय डावपेच हे या मोहिमांतून प्रकर्षाने दिसून आले.

औरंगजेब पठाण टोळ्यांचे बंड मोडण्यात गुंतलेला. दक्षिणेत बहादूरखान निष्क्रिय, वातावरणात धोका नाही ही संधी साधून महाराजांनी राज्याभिषेक करून घेतला.

**स्वतंत्र राज्याची निर्मिती :** आसेतुहिमाचल राज्य करण्याची महत्त्वाकांक्षा धरलेल्या मोगल साम्राज्याला, या स्वतंत्र मराठी राज्याची निर्मिती म्हणजे एतद्देशीयांचे एक मोठे आव्हान होते. रजपूत, बुंदेले, शीख इत्यादिकांनी पुढे मराठ्यांचाच धडा गिरवला. ''सिंहासनारुढ होऊन छत्र धरून छत्रपती म्हणविले. केवळ नूतन सृष्टीच निर्माण केली. औरंगजेबासारखा महाशत्रू स्वप्रतापसागरी निमग्न केला. दिगंत विख्यात कीर्ति संपादिली! ते हे राज्य!''

असे भारावलेले वर्णन महाराजांचे मंत्री रामचंद्रपंत अमात्य करतात.

**मोगलांशी लढा चालू :** महाराजांचे राजकारण कौशल्य काय सांगावे! विजापूर राज्याचा शेवट जवळ आला आहे हे त्यांना दिसत होते. मोगलांच्या हातात ते समृद्ध राज्य म्हणजे फार मोठे साधन. त्यासाठी महाराजांनी विजापूरचा शक्य तितका भाग आपल्या ताब्यात आणून तेथे पुढील संभाव्य मोगल मराठा संघर्षात तळ उभारण्याची योजना आखली. उत्तरेकडून मोगल आणि दक्षिणेकडून आपण विजापूर राज्याचे लचके तोडू या अटींवर महाराजांनी बहादूरखानाला स्वराज्यापासून गाफील ठेवला आणि गोवळकोंड्यासमवेत दक्षिण्यांची आघाडी उघडून जिंजीचा प्रांत ताब्यात घेतला. महाराजांचा हा दक्षिण दिग्विजय पुढे मराठ्यांना राजाराम काळात उपयोगी पडला.

इकडे महाराजांशी स्नेह जोडून त्यांचा लाभ करून दिल्याबद्दल औरंगजेबाने बहादूरखानाची उचलबांगडी केली. दिलेरखानाने संभाजीराजांना आपल्याकडे ओढले, पण महाराजांनी युक्तीने त्यांना परत बोलावले. दिलेरखानाविरुद्ध ते विजापूरच्या मदतीला धावून गेले आणि मोगल राज्यात धुमाकूळ उडवून दिला. याचा परिणाम म्हणून औरंगजेबाने दिलेरखानालाही बडतर्फ केले.

याच सुमारास औरंगजेब रजपुतांच्या युद्धात ओढला गेला. देवालयांचा विध्वंस, जिजिया कराची हिंदूंवर लादणूक आणि जोधपूर खालसा करणे या त्याच्या मूर्ख धोरणाला कटु फळे येऊ लागली (१६७९).

शिवाजीमहाराजांचे शेवटचे राष्ट्रकार्य म्हणजे जिजिया कराच्या निषेधार्थ त्यांनी औरंगजेबाला लिहिलेले कडक पत्र होय. तुमच्या असहिष्णुतेने तुमचे राज्य नष्ट होत आहे आणि ते मी नष्ट करणार आहे असा निर्वाणीचा इशारा त्यांनी औरंगजेबाला दिला.

महाराजांचे राज्य खऱ्या अर्थाने कल्याणकारी राज्य होते. मोगल इतिहासकार भीमसेन त्यांचा उल्लेख सिपाही बेनजीर (अद्वितीय योद्धा) व सालेह (साधू पुरुष) असा करतो. खाफीखानाने त्यांच्या परधर्माबद्दल आदरभावाची मुक्तकंठाने प्रशंसा केली आहे. इंग्रजांच्या नजरेत तो शेवटी 'नोबल प्रिन्स', धीरोदात्त नृपती ठरला.

शिवाजीमहाराजांनी आम्हांला अन्यायाविरुद्ध झगडण्यास शिकवले, कधीही निराश न होण्याचे शिकवले, त्यांच्यामुळे भारतीय अस्मिता जागृत झाली आणि आमच्या पाठीचा कणा ताठ झाला.

शिवराजास आठवावें। जीवित्व तृणवत् मानावें।
इहलोकीं परलोकीं राहावें। कीर्तीरूपें॥

❒❒❒

('लोकराज्य-वर्ष ३५, अंक १८' मधून संक्षेपाने)



# १०. दिल्ली जिंकण्याची शिवाजीराजांची प्रतिज्ञा

डॉ. आप्पासाहेब पवार
अनुवाद : प्रा. कमलाकर दीक्षित

छत्रपती शिवाजीराजांच्या नेतृत्वाखाली मराठा राष्ट्राचा उदय बऱ्याच लोकांना विशेषत: या राजकीय उलथापालथीचे साक्षीदार असलेल्या परदेशी व्यक्तींना जरा अनपेक्षितच वाटला. उत्तरेकडील मोगल सत्ता आणि दक्षिणेतील सुलतानी सत्ता यांच्या दृष्टीने शिवाजीराजे हे एक 'बंडखोर'च होते. तसे पाहू जाता प्रत्येक नवीन राज्याचा संस्थापक हा प्रस्थापित सत्ताकेंद्रांच्या नजरेत निदान आरंभी तरी बंडखोरच ठरतो, परंतु जेव्हा बंड यशस्वी होते आणि नवीन सत्ता सुस्थापित होते, तेव्हा त्या बंडखोरावरचा गुन्हेगारीचा शिक्का पुसला जातो आणि तो बंडखोर राष्ट्राच्या दृष्टीने 'महानायक' ठरतो. जेव्हा असे नवीन राज्य लोकांच्या इच्छेप्रमाणे व्यापक पायावर उभे राहाते, तेव्हा तर या नवीन राजाला लोकनायकत्वच लाभते. मराठा राज्याच्या उदयाच्या वेळी असेच घडले.

अंगी उपजत नेतृत्व गुण असणाऱ्या राष्ट्रनिर्मात्या शिवाजीराजांच्या कर्तृत्वाची वीज देशाच्या राजकीय क्षितिजावर कडाडली आणि सर्वसमावेशक मराठा राज्याचा नजरेत भरण्याजोगा जो उदय आणि विकास झाला, तो खरोखरच चकित करणारा ठरला, यात शंका नाही. जे मराठा लोक मुसलमान सुलतानांची बारगीर, सरदार किंबहुना राजे म्हणून सेवा करत होते ते अचानक मागे वळले आणि आपले स्वत:चे राज्य स्थापन करण्याचा हर प्रयत्न करणाऱ्या शिवाजीराजांच्या फौजेत स्वेच्छेने सामील झाले. अनपेक्षित असा हा राजकीय बदल हे केवळ अपूर्व असे घटित होते. ज्यांना असे काही घडू शकेल याची कल्पनाही करता आली नाही ते या घटनेकडे संशयपूर्ण नजरेने बघू लागले; म्हणूनच मराठे आणि त्यांचा नेता यांना आरंभापासूनच नावे, दूषणे दिली जाऊ लागली.

याचे एक ठळक उदाहरण म्हणजे ग्रँट डफ याने व्यक्त केलेले त्याचे मत. त्याच्या दृष्टीने शिवाजी हा 'साहसी' असून त्याचे अनुयायी म्हणजे 'लुटारू' लोकांची एक टोळीच होती; त्यांनी निर्माण केलेली सत्ता म्हणजे सह्याद्रीच्या पर्वतरांगांमधील वाळलेल्या गवताला चूड लावल्यानंतर भडकलेला अग्नी होता. अशा त्यांच्या खोडसाळ कृत्यांमुळे केवळ सर्वनाशच हीच फलनिष्पत्ती होते, दुसरे काही नाही.

या लोकराजाबद्दल आणि त्याच्या अनुयायांबद्दल यापेक्षाही वाईट शब्द वापरण्यात आलेले आहेत. उदाहरणार्थ, लुटेरे, वाटमारे, पेंढारी, दरोडेखोर इत्यादी. अर्थात ज्या युरोपियन सत्तांच्या वखारी या देशात होत्या त्यांतील लोकांनी अशा प्रकारचे लिखाण केलेले आहे. ज्या लोकांना शिवाजीराजांच्या फौजांबरोबरील चकमकीत मोठे नुकसान

सोसावे लागले असेल ते असा संताप व्यक्त करणार हे समजून घेता येईल. मात्र एखादा दरोडेखोर कधीही राज्य स्थापन करू शकत नाही किंवा लुटारूंच्या नायकाला समारंभपूर्वक राज्याभिषेकही होत नाही.

मराठा इतिहासाच्या अभ्यासासाठी आता भरपूर सामग्री उपलब्ध झालेली असून जो कोणी अभ्यास करेल त्याला मराठा राज्यस्थापनेचे खरे उद्दिष्ट आणि पाया कोणता होता हे समजून घेणे सहज शक्य आहे.

या ठिकाणी मला फक्त या मराठा राजाचे अंतिम उद्दिष्ट काय होते या प्रश्नाची चर्चा करायची आहे. ते उद्दिष्ट म्हणजे 'हिंदुपदपातशाही' स्थापन करणे हे होते, हे वारंवार अनेकांकडून सूचित करण्यात आले आहे मात्र, या अनुमानासाठी सबळ असा पुरावा आढळून येत नाही. बखरी आणि तत्सम लेखनावर या प्रश्नाचा चिकित्सक अभ्यास करताना विसंबून राहाता येत नाही. त्यासाठी मौलिक आणि विश्वासार्ह पुरावे यांनाच अधिक पसंती दिली पाहिजे. साहजिकच शिवाजीराजांचे अंतिम राजकीय उद्दिष्ट काय होते, या प्रश्नाचा विचार करताना आता उपलब्ध झालेल्या मौलिक पुराव्यांचा आधार घेणे क्रमप्राप्त ठरते.

आपल्या राजकीय कार्याच्या सुरुवातीपासूनच शिवाजीराजांनी एक निश्चित असे ध्येय मनात बाळगले होते. इ.स. १६४५ साली वयाच्या १५ व्या वर्षी (नव्या जन्मतिथीप्रमाणे) आपल्या वडिलार्जित जहागिरीजवळचा एक किल्ला राजांनी काबीज केला. आदिलशाही शासनाने जेव्हा त्या प्रदेशातील आपल्या अधिकाऱ्याची (दादाजी नरसप्रभू) कानउघाडणी केली तेव्हा राजांनी त्याला (आपल्या विश्वासात घेऊन) सांगितले, की ''शहासी (आदिलशाही सुलतानाशी) बेमानगिरी तुम्ही व आम्ही करत नाही. श्रीरोहिरेश्वर तुमचे खोरियातील आदिकुलदेव तुमचा डोंगरमाथा शेंद्रीलगत (सह्याद्रीलगत) स्वयंभू आहे. त्यांनी आम्हास यश दिल्हे व पुढे तो सर्व मनोरथ 'हिंदवी स्वराज्य' करून पुरविणार आहे. ... हे राज्य व्हावे हे श्रीचे मनात फार आहे.'' *

मराठा राज्याच्या विस्ताराची आणि ६ जून १६७४ रोजी शिवाजीराजांना झालेल्या राज्याभिषेकाची हकिकत सर्वांना ठाऊकच आहे. या समारंभाची अर्थपूर्णता लक्षात येण्यासाठी शिवाजीराजांची 'राष्ट्रनिर्माता' ही भूमिका समजून घेणे गरजेचे आहे. केवळ आसपासचा प्रदेश जिंकून राज्य निर्माण करावे एवढ्यावरच हा राजा समाधानी असावा असे दिसत नाही. त्याचे ध्येय अधिक उच्चकोटीचे होते; म्हणूनच 'दक्षिण-दिग्विजय' या नावाने ओळखल्या जाणाऱ्या मोहिमा त्यांनी कर्नाटक भागात काढल्या. त्यांनी थेट कोरोमंडल किनाऱ्यापर्यंत धडक मारली आणि असे आश्चर्यकारक विजय मिळवले की

---

** राजवाडे : मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड. १५ पत्र क्र. २६८, दि. १७ एप्रिल १६४५.*

त्यांना सीझरचीच उपमा देणे परकीयांना क्रमप्राप्त ठरले. या घटनेसंबंधी मुंबईहून लिहिले गेलेले पत्र पुढे देत आहे - ''समर्थ विजेता होण्याच्या महत्त्वाकांक्षेने शिवाजी गेल्या पावसाळ्याच्या अखेरीस रायरी (रायगड) सोडून कर्नाटकावर चालून गेला. त्याच्या फौजेत २०,००० घोडदळ आणि ४०,००० पायदळ होते. सीझरच्या स्पेनमधील 'तो आला, त्याने पाहिले आणि त्याने जिंकले.' अशा विजयासारखा विजय त्याने मिळवला. या वेळी सोने, हिरे, पाचू, माणके वगैरेंच्या रूपात इतकी संपत्ती त्याने संपादन केली आहे की त्याच्यापुढील अनेक लढायांसाठी ती उपयोगी पडेल.''*

ही दक्षिणेकडील मोहीम हाती घेण्यामागील शिवाजीराजांचे उद्दिष्ट काय होते, याबद्दल काही मतमतांतरे आहेत. वरील पत्रात स्पष्ट झाले आहे, की राजा दक्षिणेत विजेता म्हणून गेला आणि त्याने विजेता म्हणूनच कामगिरी केली. जो प्रदेश त्याने जिंकला तेथील काही भागांत तरी आपली सत्ता दृढमूल करण्याचे अनेक उपाय त्याने अमलात आणले. या विजयामुळे जसे त्याचे बळ वाढले तसाच त्याचा आत्मविश्वासही दुणावला. दक्षिणेत जर आपल्याला विजय मिळतो तर तसाच विजय उत्तरेतसुद्धा का मिळू नये? मोगल पातशहाने शिवाजीराजांना पकडून एकदा कैदेत टाकले होते. याचे उत्तर म्हणून आपणही दिल्लीवर चाल करून जाऊन त्या पातशहाला दिल्लीतच कोंडून का ठेवू नये? आपण दिल्ली जिंकू शकणार नाही का? असे राजांना वाटणे स्वाभाविक होते.

अर्थात असे विचार राजांच्या मनात आले होते किंवा नाही हे ज्ञात नाही मात्र, मुंबईहून १६७८ मध्ये लिहिल्या गेलेल्या एका पत्रात असा मजकूर आढळतो : ''शिवाजी सध्या बंकापूरनजिक आलेला आहे. आल्या आल्या आपल्या पक्ष्यासारख्या भरारणाऱ्या सैनिकांच्या साहाय्याने त्याने हां हां म्हणता सारा मुलूख काबीज केला. राजा जयसिंगाच्या स्वाधीन केलेले २३ दुर्गम किल्ले ८ महिन्यांच्या आत त्याने परत जिंकून घेतले. विजापूर काबीज करून पुढे दिल्लीवर चाल करून औरंगजेबाला दिल्लीत कोंडून ठेवीपर्यंत आपले खड्ग म्यान करणार नाही, अशी या राजाने आपल्या देवाजवळ प्रतिज्ञा केली आहे.'' या पत्रातील बातमी स्वयंस्पष्ट आहे. भारताचा हा सिकंदर आणि सीझर संपूर्ण देश आपल्या नियंत्रणात आणू इच्छित होता. १६७८ मध्ये त्यांनी दक्षिणेतील सुलतानांना आपल्या कह्यात आणले होते. वरील पत्रात नमूद असलेल्या राजांच्या योजनेनुसार ते दिल्लीवर चालून जाणार होते.

कदाचित उपरोक्त इंग्रजी पत्रात नमूद केलेली शिवाजीराजांची महत्त्वाकांक्षी योजना ही ऐकीव माहितीवर आधारलेली असण्याची शक्यता आहे. तरीही तिला तथ्यहीन मानता येत नाही. राजांचा मोठेपणा त्यांच्या गहिऱ्या उद्देशात जसा दडलेला होता, तसाच त्या

---

* *डॉ. बाळकृष्ण : Shivaji the Great, खंड.२, विभाग-१, पृ.२५३*





उद्देशाच्या परिपूर्ण कार्यवाहीतही स्पष्ट होत राहिला होता.

उपजत नेतृत्वगुण लाभलेल्या राष्ट्रनिर्मात्या पुरुषाच्या अंगीच अशी मूलगामी प्रेरणा आढळते. उदाहरणार्थ, शिवाजीराजांची अफझलखान भेट, त्यांचा शायस्तेखानावरील हल्ला, १६६४ साली सुरतेच्या प्रवेशद्वारावर त्यांचे झालेले अचानक आगमन, त्यांची आग्रा भेट आणि तेथील कैदेतून सुटका, त्यांचा राज्याभिषेक आणि दक्षिण दिग्विजय या घटना या राजांच्या प्रतिभेच्या वेगवेगळ्या पैलूंवर प्रकाशझोत टाकतात. त्यांचा पुढील बेत काय आहे, याचा अंदाज त्यांच्या शत्रूंना येत नसे आणि त्यांची प्रत्येक कामगिरी त्यांची वैचारिक मौलिकता स्पष्ट करत असे. याचा एक पुरावा मुंबई येथील इंग्रज कंपनीच्या एका प्रतिनिधीने सुरतेतील आपल्या वरिष्ठांना पाठवलेल्या पत्रात मिळतो. तो लिहितो, 'तुमच्या सांगण्यानुसार आम्ही त्या (राजावर) नजर ठेवण्यासाठी गुप्तहेर नियुक्त करत आहोत. मात्र खरे सांगायचे तर या आमच्या गुप्तचर यंत्रणेवर किती विसंबून राहाता येईल हे आम्हाला सांगता येत नाही, कारण तो आपले बेत स्वत:जवळच ठेवतो आणि त्याची फौज कधीच एका ठराविक ठिकाणी असत नाही आणि तुम्हाला-आम्हाला कळण्यापूर्वीच ती अचानक आणि अनपेक्षित असे हल्ले मात्र करते.'

शिवाजीराजांचा दिल्लीवर चालून जाण्याचा बेत वेडेपणाचा ठरला असता, अशी ज्यांची समजूत असेल ते राजांच्या सामर्थ्याचे अवमूल्यन करत असतात असे म्हणावे लागते. आता हे खरे आहे, की आपल्यापेक्षा बलिष्ठ फौजेशी प्रत्यक्ष मुकाबला करण्याची या राजाची कुवत अद्याप सिद्ध झालेली नव्हती. मात्र, तशा प्रकारची लढाई करणे ही त्यांची प्राथमिकता नव्हती. मात्र या राजाने खरोखरच दिल्लीवर चाल केली असती, तर त्याने कोणती विशिष्ट तंत्रे वापरली असती हे मात्र सांगता येणार नाही.

शिवाजीराजांची शक्तिस्थळे ठरवताना त्यांचे समकालीन लोक काय म्हणतात, हे ध्यानात घेतले पाहिजे. जे समकालीन या राजाकडे शत्रुत्वाच्या भावनेतून बघत होते त्यांची मते या संदर्भात मोलाची ठरतात. पश्चिम सागरकिनाऱ्यावर पसरलेले इंग्रज हे असे एक समकालीन होत. राजापूरच्या त्यांच्या वखारीस मराठ्यांकडून काही हानी पोचली होती; त्याची नुकसान- भरपाई करून देण्याचे राजांनी दिलेले वचन पाळले गेले नव्हते. या प्रसंगापासून इंग्रज लोक राजांना उघड नसला तरी गुप्तशत्रू मानू लागले होते. अशा या इंग्रजांचे राजांच्या क्षमतेबद्दलचे मत अर्थातच विचारात घेण्याजोगे मानले पाहिजे.

इंग्रजांच्या एका सुरतेच्या पत्रात राजांचे वर्णन केले आहे. ते असे-''शिवाजी हा खोडसाळ लुटीसाठी इतका कुप्रसिद्ध आहे की आलेल्या अहवालानुसार तो जणू हवाई

शरीराचा (airey body) असून त्याला पंख आहेत. अन्यथा लोक सांगतात त्याप्रमाणे तो एकाच वेळी अनेक ठिकाणी कसा हजर असू शकतो? काही वेळा तो एका ठिकाणी असल्याचे दिसून येते तर एक - दोन दिवसातच फार दूरच्या स्थळी हजर असल्याचे समजते. नंतर असाच तो ५/६ ठिकाणी आढळून येतो आणि तेथे अमाप जाळपोळ व लुटालूट करतो; त्याच्या हर्क्युलससारख्या पराक्रमाचे वर्णन करणे महाकर्मकठीण आहे. तो सर्व लोकांच्या चर्चेचा विषय बनलेला आहे.''

राजांच्या निधनापूर्वी तीन वर्षे लिहिलेल्या एका पत्रात त्यांच्या विजयाबाबत भाकीत वर्तवले आहे. ते असे- ''एखादया चमत्काराप्रमाणे तो अजूनही विजयामागून विजय मिळवीतच चालला आहे. हिंदुस्थानातील आणि दक्षिणेतील प्रबळ राजांवर तर त्याने विजय मिळवलाच आहे आणि पुढेही असेच घडत राहील अशी आम्हाला भीती आहे.'' जर राजांचे विजय एखादया चमत्काराच्या प्रयोगासारखे तत्कालीन लोकांना भासत असतील तर राजे दिल्लीवर चालून गेले असते तर काय घडले असते?

विशेष म्हणजे मोगली दरबार हा राजांना अनोळखी नव्हता. कैदी म्हणून का होईना, ते तेथे तीन महिन्यांपेक्षा जास्त काळ राहिले होते. या काळात मोगलांच्या गुणदोषांची सर्व माहिती त्यांनी करून घेतलेली असणारच. मूळात राजांनी औरंगजेबाच्या भेटीचे निमंत्रण स्वीकारून आपला जीव धोक्यात का घातला हा अजूनही एक गहन प्रश्न आहे. एक धाडसी अंदाज असा करता येईल की पुढेमागे ज्या शत्रूशी दोन हात करावे लागतील त्या शत्रूची प्रत्यक्ष माहिती करून घ्यावी, हा त्यांचा हेतू असेल. या आग्रा भेटीचे कारण काहीही असो, तिचे यश संशयात आहे.

शिवाजीराजे १२ मे १६६६ रोजी आग्र्याला पोचले आणि १८ ऑगस्ट १६६६ रोजी त्यांनी तेथून सुटका करून घेतली. या काळात आग्रा येथून रवाना झालेली अनेक वार्तापत्रे शोधून काढून ती 'House of Shivaji' या ग्रंथात सर जदुनाथ सरकार यांनी प्रसिद्ध केलेली आहेत. ही पत्रे बारकाईने वाचल्यास असे सिद्ध होते, की राजे हे केवळ उपजत प्रतिभेच्या जोरावर आपली सुटका करून घेऊ शकले. आपल्या कट्टर शत्रूच्या राजधानीत आपल्याला अनुकूल असे वातावरण निर्माण करण्यात ते यशस्वी झाले होते. जो कोणी त्यांच्या संपर्कात आला तो त्यांचा हितचिंतक बनला होता. त्या वेळच्या एका पत्रात राजांचे वर्णन आले आहे. ते असे : ''त्यांचा वर्ण नवल करावे इतका गोरा आहे आणि ते कोण आहेत हे समजण्यापूर्वीच हा लोकराजा आहे हे पाहाणाऱ्यास सहजप्रेरणेने जाणवते.'' दुसरे एक पत्र म्हणते, ''शिवाजी हा फार हुशार आहे. योग्य वेळी एखादा असा चपखल शब्द तो उच्चारतो की इतर कोणाला त्यावर आणखी काही बोलावे असे वाटत नाही.''

आपल्या उद्देशाच्या संदर्भात शिवाजीराजांच्या आग्रा भेटीबाबत सर्वसामान्य लोकांच्या

प्रतिक्रिया काय होत्या हे समजून घेणे अधिकच महत्त्वाचे आहे. सुदैवाने एक पत्र असेही उपलब्ध आहे की त्यात लोकांच्या भावना नि:संदिग्ध शब्दांत वाचायला मिळतात. १२ मे १६६६ रोजी राजांनी रागाच्या भरात औरंगजेबाचा दरबार सोडल्यानंतर थोड्याच काळातील हे पत्र आहे. त्यात म्हटले आहे - "यापूर्वी लोक स्वाभिमान आणि धाडस या गुणांबद्दल शिवाजीची प्रशंसा करीत होतेच, आता मात्र बादशहाच्या दरबारात येऊन त्याने धीटपणाने कडक शब्दांत त्याला उलट जबाब दिला याबद्दल त्याच्या शौर्याची लोक अधिकच तारीफ करीत आहेत."

याचा अर्थ एवढाच की शिवाजीराजांनी लोकांची अंत:करणे जिंकली होती आणि खुद्द औरंगजेबाच्या झगमगाटी दरबारातही त्यांनी आपल्याबद्दल सहानुभूती निर्माण केलेली होती. राजांच्या शत्रूंच्या मते राजांना देहदंडाची शिक्षा द्यावी किंवा त्यांना काबूलला पाठवावे अथवा त्यांना एखाद्या अंधारकोठडीत टाकावे असे होते. राजे दरबारात आल्याआल्याच हे बेत आखण्यात आले होते. मात्र यांपैकी एकही बेत तडीला गेला नाही. जयसिंहाचा मुलगा रामसिंग याने रदबदली केल्यामुळे राजांचा प्राण वाचला हे खरे आहे ; पण हेही तितकेच खरे की उपलब्ध मार्गांचा आणि साधनसामग्रीचा चातुर्यपूर्ण उपयोग आणि विशेषत: लोहचुंबकासारखे आकर्षक व्यक्तिमत्त्व यामुळेच या प्राणघातक आपत्तीतून राजे सहीसलामत वाचले.

या सर्व चर्चेतून एक कल्पना मनात येऊ पाहते - ती म्हणजे जर हा मराठा राजा खरोखरच दिल्लीवर चालून गेला असता, तर त्या शत्रूप्रदेशातूनही त्याला चांगला भरीव पाठिंबा मिळाला असता आणि तथाकथित जादुई यशही त्याला मिळू शकले असते! मात्र दिल्ली काबीज करण्याचा शिवाजीराजांचा खरोखरच मनसुबा होता की नव्हता याचा निर्णय लागण्यापूर्वीच त्यांचे देहावसान झाले.

❑❑❑

('Studies in Maratha History, Vol.I' मधून )



# ११. शिवाजीमहाराजांच्या 'मऱ्हाष्ट' राज्याची अर्थनीती

डॉ. अ. रा. कुलकर्णी

मराठ्यांचा आद्य इतिहासकार कॅप्टन जेम्स कनिंगहॅम ग्रँट डफ आपल्या इतिहासाच्या प्रस्तावनेत म्हणतो, ''आम्ही भारताची सत्ता मराठ्यांच्यापासून घेतली (Our immediate predecessors in conquest, the Mahrattas). याचा अर्थ असा, की अठराव्या शतकात सत्तेसाठी लढा द्यावा लागला तो मोगलांशी नव्हे तर मराठ्यांशी, आणि त्यांना लढाईत जिंकूनच इंग्रजांना आपली वसाहतीची राजवट या खंडप्राय देशावर लादता आली. तेव्हा साहजिकच हे मराठे कोण याविषयी पाश्चिमात्त्यांच्या मनात कुतूहल निर्माण झाले आणि त्यांना समजावून घेण्यासाठी त्यांच्या इतिहाससंबंधी उदय-विस्तार आणि अस्त-लेखन होऊ लागले. ...

मराठ्यांचा उदय कसा झाला यासंबंधी ग्रँट डफ म्हणतो, ''महाराष्ट्रातील खवळलेले आणि लुटारू वृत्तीचे हिंदू लोक काही काळ दडपले गेले असले, तरी त्यांच्या ठिकाणी गुप्तपणे जिवंत असलेली आग त्यांच्यावर राज्य करणाऱ्या मुसलमान विजेत्यांच्या भांडणांनी हडबडून, सह्याद्रीच्या रानात वाळलेले गवत ज्याप्रमाणे पेटते त्याप्रमाणे ते (हिंदू) वाढत्या ज्वालानिशी भडकून उठले आणि दूरचे लोक या वणव्याचे आश्चर्य करू लागले.''

मराठ्यांची सत्ता लूट व साहसामुळे भरभराटीला आली. मराठे हे अत्यंत धूर्त आणि साहसी लोक असल्याने मोगली सत्तेची चिरफाड ते करू शकले. अशा तऱ्हेचे जे ग्रह मराठ्यांसंबंधी होते त्यात ग्रँट डफने आपल्या अभिप्रायाने एकप्रकारे भरच टाकली होती. थोडक्यात, मराठ्यांचा इतिहास म्हणजे लहान-मोठ्या लढायांचा, लूटमारीचा इतिहास, त्यामुळे त्यापासून बोध घेण्यासारखे काहीच नाही अशी प्रतिमा निर्माण करण्याचा प्रयत्न प्रामुख्याने इंग्रज इतिहासकारांनी केला आणि मराठ्यांच्या कार्याविषयी भारतीयांच्या मनात गैरसमज पसरविले. ...

अशा या मराठ्यांच्या इतिहासाचे - त्यांच्या सत्तेच्या उदयाचे खरे स्वरूप दाखवण्याचा उपक्रम सर्वप्रथम न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांनी आपल्या 'मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष' या अभिजात ग्रंथाच्याद्वारे केला. मराठ्यांच्या इतिहासाचे महत्त्व विशद करताना रानड्यांनी पाश्चिमात्य इतिहासकारांच्या पूर्वग्रहदूषित मतांचे खंडन करून, त्या इतिहासाचे नैतिक अधिष्ठान सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. ...

रानड्यांना ग्रँट डफचा हा 'वणवा' सिद्धान्त म्हणजे त्याचे अपरिपक्व मत वाटते. त्यांच्या मते मराठ्यांच्या उदयाची बीजे दक्षिणेच्या मुसलमानी सत्तेत नसून, ती महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासात रुजलेली आहेत. मराठी सत्तेचा उदय हा काही

योगायोगाने निर्माण झालेल्या समकालीन परिस्थितीमुळे अवचित घडलेला नसून त्याच्यामागे पूर्वीच्या काळात काही हिंदू लोकांनी केलेले प्रामाणिक प्रयत्न आहेत. त्यांना केवळ आपले राजकीय स्वातंत्र्य प्रस्थापित करायचे नव्हते, तर पूर्वी कधीच न घडलेली, समान राष्ट्रप्रेमाने प्रेरित झालेली अशी एक संघटना उभी करायची होती आणि या कार्यात मराठे यशस्वी झाले. याचे कारण त्या काळात सामाजिक, राजकीय आणि धार्मिक क्षेत्रात, समाजातील सर्व थरांतील लोकांचे एक प्रकारचे उत्थापन होत होते. ...

मराठ्यांच्या उदयाच्या कार्यात काही वेळा शहाजीच्या कामगिरीला दुय्यम स्थान दिले जाते. इतिहासाचार्य राजवाडे यांच्या मते मराठी सत्तेच्या उदयाची चिकित्सा करताना शहाजीराजे यांचे महत्त्व कमी लेखून चालणार नाही. आपल्या मताच्या पुष्ट्यर्थ अहमदनगरच्या निजामशाहीतील अस्थिर राजकीय परिस्थितीचे विश्लेषण करून त्यांनी असे मत मांडले आहे, की निजामशहाने आपल्या दरबारातील परदेशी (अफाकी) लोकांचे महत्त्व कमी करण्याच्या उद्देशाने दखनी लोकांना हाताशी धरून आपले स्थान बळकट करण्याच्या दृष्टीने दरबारात एक नवा पक्ष निर्माण करण्याचा मनसुबा रचला, हा नवा पक्ष म्हणजे 'मराठा पक्ष' आणि त्याचा नेता म्हणजे निजामशाहीतील प्रबल सरदार शहाजी भोसले. शहाजी हा एक फार चतुर, मुत्सद्दी आणि महत्त्वाकांक्षी पुरुष आहे, असे त्यांच्या समकालीन राज्यकर्त्यांचे मत होते. (जदुनाथ सरकार : House of Shivaji, आवृत्ती ३, पृ. ३६-४०). त्याने निजामशाही आणि आदिलशाही मुलखांतील २० लाख ७० हजार पगोडा (होन) उत्पन्नाचा प्रदेश मिळवून आणि पदरी सुमारे ३००० घोडदळ बाळगून दक्षिणेच्या राजकारणातील आपले वर्चस्व सिद्ध केले होते. निजामशाहीच्या शेवटच्या काळात तर बालनिजामशहाला हाताशी धरून राज्याचा सर्व कारभार तोच सांभाळत असे. निजामशाहीचा शेवट १६३६ साली झाला तेव्हा त्या राज्याचे वाटप मोगल आणि विजापूरच्या आदिलशाही या दोन विजेत्यांमध्ये करताना आपली जहागीर (पुणे, सुपे, इंदापूर इत्यादी) स्वतंत्र ठेवण्याची मुत्सद्देगिरी शहाजीने लढवली होती. शिवाजीचा चरित्रकार परमानंद प्रस्तुत संदर्भात म्हणतो, ''ततो निजामविषयं शाहः स्वविषयं विना । दिल्लीन्द्राय ददौ कंचित् येदिलाय च कंचन॥'' शिवभारत अध्याय-९, श्लोक २०. ...

परमानंदांच्या विधानावरून असा निष्कर्ष काढता येईल, की शहाज़ीने पुणे, सुपे, इंदापूर ही आपली जहागीर जेव्हा शिवाजीराजाला नेमून दिली तेव्हा ती प्रायः स्वतंत्र होती. तसेच शिवाजीच्या कार्यात मदतनीस म्हणून शहाजीने ज्या कान्होजी जेधे देशमुखाची नेमणूक केली होती. तो मावळातील देशमुखांना उद्देशून हिकमतीच्या गोष्टी सांगताना म्हणतो, ''हे मऱ्हाष्ट राज्य आहे. अवघियांनी राजश्री - स्वामी संनिध राहोन यकनिष्ठेने शेवा करावी.'' (जेधे करीना). अशा रीतीने स्वतंत्र मुलूख आणि कर्तबगार मदतनीस देऊन शिवाजीराजाच्या स्वराज्य स्थापनेची सर्व पूर्वतयारी शहाजीने करून दिली होती. ...

  

शहाजीने दिलेल्या या 'मोकासा' जहागिरीचे शिवाजीराजाने स्वराज्यात रूपांतर केले. "राज्य म्यां शिवाजीने चाळीस हजार होनाचा पुणे महाल होता, त्यावरि एक क्रोड होनांचें राज्य पैदा केले. हे गडकोट व लष्कर पागा ऐसे मेळविले." (सभासद)

शिवाजीच्या राज्यारोहण समारंभाने भारावून गेलेल्या आणि 'बहुत संतुष्ट' झालेल्या गागाभट्टांच्या मनात विचार आला, 'या युगी सर्व पृथ्वीवर म्लेंच्छ बादशहा, मऱ्हाटा पातशाह येवढा छत्रपति जाला. ही गोष्ट कांही सामान्य झाली नाहीं.' (सभासद)

शिवाजीराजाच्या राजनीतीचे 'मर्म' जाणणारा, त्याच्या प्रशासनव्यवस्थेत वाढलेला एक समकालीन रामचंद्रपंत अमात्य राजाच्या अतुलनीय कर्तबगारीचे मूल्यमापन करताना म्हणतो, "देशदुर्गादि सैन्याचे तट नवेच निर्माण करून येकरूप अव्याहत शासन चालविले, केवळ नूतन सृष्टीच निर्माण केली. दिगंत विख्यात कीर्ती संपादिली ते हे मराठी राज्य."(आज्ञापत्र)

शिवाजीमहाराजांच्या चरित्राचा सूक्ष्मरीत्या अभ्यास केल्यास असे दिसून येते, की जे काही छोटेसे मराठी स्वराज्य त्यांनी निर्माण केले होते त्याला संघटित करणे, स्थैर्य प्राप्त करून देणे, आर्थिकदृष्ट्या सबल करणे यांकडे त्यांनी विशेष लक्ष पुरवले होते. त्यामुळेच त्यांनी सनदी आणि लष्करी प्रशासन बळकट करणे या कार्यास प्राधान्य दिले होते. शिवाजीराजांच्या लष्करी पराक्रमाचे पोवाडे गाणारे लोक त्यांच्या या राष्ट्रबांधणीच्या कामाकडे दुर्लक्ष करतात. प्रदेशविस्तार करून साम्राज्य स्थापनेचे धोरण त्यांनी अंगीकारले नव्हते. मराठी मुलूख, मराठी भाषा आणि महाराष्ट्र धर्म यांच्या संरक्षणासाठी आणि संवर्धनासाठी त्यांनी मऱ्हाष्ट राज्याची स्थापना केली होती. कर्नाटकातील काही भाग आक्रमून त्यांनी 'चंदीचे' राज्य नावाचा एक उपविभाग निर्माण केला होता. त्यात साम्राज्य तृष्णेपेक्षा स्वराज्याच्या संरक्षणाचाच हेतू प्रामुख्याने होता.

वंग इतिहासकार जदुनाथ सरकार म्हणतात, "वैश्विक सहिष्णुता आणि समान न्याय, आणि आपल्या सर्व प्रजेचे संरक्षण ही शिवाजीराजांच्या राजकीय धोरणाची प्रमुख सूत्रे होती." आपले सन्मित्र रियासतकार सरदेसाई यांना लिहिलेल्या एका पत्रात ते म्हणतात, "शिवाजीराजाचे धार्मिक सहिष्णुतेचे धोरण म्हणजे त्या काळातील एक आश्चर्यच होते. सर्वांना समान हक्क आणि १७८९ च्या फ्रेंच राज्यक्रांतीने घोषित केलेल्या 'सर्वांना समान संधी' या तत्त्वाप्रमाणे सर्व क्षेत्रांत कसलाही भेदभाव न करणे या धोरणांचा अवलंब केल्यास भारताचे राष्ट्रीयत्व चिरकाल अबाधित राहील. आधुनिक राष्ट्राच्या स्थैर्याचे हे सर्वश्रेष्ठ तत्त्व शिवाजीराजाने तत्पूर्वी १५० वर्षांपूर्वी ओळखले होते." थोडक्यात, शिवाजीराजा म्हणजे दूरदर्शीपणा असलेले काळाच्या पुढे जाणारे हे एक महान व्यक्तिमत्त्व होते, असे जदुनाथ सरकारांना सूचित करायचे आहे. ...

मराठी सत्ता दीर्घकाळ का टिकू शकली नाही, याचे मुख्य कारण म्हणजे मराठी राजांनी आपल्या प्रदेशाच्या आर्थिक विकासाची मजबूत पायाभरणी केली नाही असे म्हटले जाते. शिवाजीराजांच्या कालखंडात तरी हे सर्वसाधारण विधान पूर्णपणे लागू करता येणार नाही. 'मराठी राष्ट्राची (Maratha Nation) निर्मिती ही शिवाजीराजांची

मोठी देशसेवा अथवा सर्वश्रेष्ठ कामगिरी होय', असे न्यायमूर्ती रानडे यांनी म्हटले आहे. पण असे म्हणत असताना शिवाजीराजांच्या आणखी एका थोर कार्याची दखल घेतली पाहिजे. हे नवनिर्मित राष्ट्र आर्थिकदृष्ट्या कसे सबल होईल यासाठी त्यांनी जे कार्य केले, त्याची इतिहासकारांनी योग्य ती दखल न घेतल्याने मराठ्यांच्या कार्यासंबंधी काही चुकीची विधाने केली जातात.

मराठी राज्याचा कणा म्हणजे शेतकरी. राज्याचा आर्थिक विकास हा शेती आणि शेतकरी यांच्या विकासाशी निगडित आहे हे शिवाजीराजाने ओळखले होते आणि त्यानुसार शेतकऱ्यांना त्यांच्या कार्यास पोषक अशा विविध प्रकारच्या सवलती देऊन 'ना कीर्दी' जमीन 'कीर्दी'- म्हणजे लागवडीखाली कशी येईल याबाबत काही निश्चित पावले उचलली होती. उदाहरणार्थ, शेतकऱ्यांना व्याजरहित कर्ज देणे, सारा भरण्याबाबत सवलत देणे, अधिकाऱ्यांनी शेतकऱ्यांना त्रास न देणे, आणि त्यांच्यापासून कसलीही अपेक्षा न करणे या संदर्भात महाराजांनी प्रभानवल्ली (जि. रत्नागिरी, तालुका संगमेश्वर) येथील सुभेदाराला इ. स. १६७६ साली उद्देशून लिहिलेले पत्र अत्यंत उद्बोधक आहे.

रामाजी अनंत सुभेदाराला महाराज फर्मावितात, ''चोरी न करावी, इमाने-इतबारे साहेब काम करावे, येसी तू क्रियाच केलीच आहेस. त्येणेप्रमाणे येक भाजीच्या देठास तेही मन न दाखविता रास (रास्त) व दुरूस (दुरुस्त) वर्तणे. या उपरि कमाविस कारभारास लावणी संचणी उगवणी जेसी जेसी जे जे वेलेस जे करू ये ते ते करीत जाणे. हर भातेने (तऱ्हेने) साहेबाचा वतु (उत्पन्न)(अधिक)- होये ते करीत जाणे. मुलकात बटाईचा तह (अधेलीचा करार) चालत आहे; परंतु रयेतीवर जाल (जुलूम) (न पडता) रयतेचा वाटा रयतीस पावे आणि राजभाग आपणास येई ते करणे. रयेतीवर काडीचे जाल व गैर केलिया साहेब तुजवर राजी नाहीत येसे बरे समजणे.'' प्रस्तुत पत्रात महाराजांनी इतर बऱ्याच सूचना केल्या आहेत. रयतेपासून सारा कसा वसूल करायचा - वस्तुरूपाने की पैशाच्या रूपाने - यासंबंधी जसा करार झाला असेल तसा तो करावा. रयत ताकदवान कशी होईल आणि अधिक जमीन लागवडीखाली कशी येईल यासाठी अधिकाऱ्याने ''कष्ट करून गावाचा गाव फिरावे'' शेतकऱ्याच्या गरजा समजावून घ्याव्यात आणि त्याला हवी ती मदत करावी आणि या कामासाठी ''जरी दोन लाख लारी (चांदीचे नाणे) पावेतो खर्च करिसील, आणि कुणबिया कुनब्याची खबर घेऊन त्याला तवानगी (ताकद) येती करून कीर्द (लागवड) करिसील, आणि पडजमीन लाऊन दस्त (महसूल) जाजती करून देसील, तरी साहेबा कबूल असतील.''

राज्याभिषेकानंतर लगेचच हा फतवा काढला आहे. शेतकऱ्यांचे हित साधण्याचा मन:पूर्वक प्रयत्न महाराजांनी केला होता हे या पत्रावरून स्पष्ट होते. शिवाजीराजे हे खऱ्या अर्थाने शेतकऱ्यांचे राजे होते. 'इडापिडा टळो आणि बळीचे राज्य येवो' अशी सतत प्रार्थना करणाऱ्या शेतकऱ्यांना दिलासा देणारे हे 'बळीचे राज्य' सतराव्या शतकात महाराष्ट्रात शिवाजीराजाच्या रूपाने निर्माण झाले होते.

शिवकालात व्यापार, उद्योगधंदे यांकडेही लक्ष पुरवले होते हे समकालीन

कागदपत्रे आणि विशेषत: 'आज्ञापत्र' या रामचंद्रपंत अमात्यांच्या प्रबंधावरून स्पष्टपणे दिसून येते. यादृष्टीने आज्ञापत्रातील 'साहुकार' हे प्रकरण विशेष महत्त्वाचे आहे. राज्याच्या आर्थिक स्थैर्यासाठी सावकारांचे महत्त्व कसे आहे, स्वकीय आणि परकीय सावकार यांमध्ये काय फरक आहे, हे महाराजांना स्पष्टपणे उमगले होते, आणि त्यानुसारच त्यांनी आपले आर्थिक धोरण आखले होते. आज्ञापत्रात म्हटले आहे, ''साहुकार म्हणजे राज्याची व राजश्रीची शोभा. साहुकाराच्या योगाने राज्य अबादान होतें. न मीळे त्या वस्तुजात राज्यांत येतात. तें राज्य श्रीमंत होतें. पडीले संकटप्रसंगी पाहीजे ते कर्जवाम मिळते. तेणेंकरून आलें संकट परिहारिजेतें. साहुकारांचें संरक्षणांमध्यें बहुत फायदा आहे. याकरितां साहुकाराचा बहुमान चालवावां कोणेंविषयी त्याजवर जलाल अथवा त्याचा अपमान होऊं न द्यावा.''

शिवाजीमहाराजांचे वरील धोरण हे युरोपात रूढ असलेल्या तत्कालीन वाणिज्य तत्त्वज्ञानाशी किती मिळतेजुळते होते याची कल्पना येते.

स्वकीय सावकार आणि परकीय सावकार यांतील फरक महाराजांनी स्पष्टपणे दाखवला आहे आणि या परकीय दर्यावर्दी सावकारापासून आपण सावध राहिले पाहिजे असा इशाराही दिला आहे. फिरंगी (पोर्तुगीज) इंग्रज, फरासीस (फ्रेंच), वलंदेज (डच), डिगमार (डेन्स) इत्यादी टोपीकर (पाश्चिमात्य) व्यापाऱ्यांनी दक्षिणेच्या पश्चिम आणि पूर्व किनाऱ्यावर आपल्या वखारी उघडल्या होत्या. या लोकांची सावकारी स्थानिक सावकारापासून वेगळ्या प्रकारची होती. या टोपीकरांचे स्वामी म्हणजे त्या, त्या देशाचे राजेच होते, आणि त्यांच्या हुकुमानेच ते या आपल्या देशात सावकारीसाठी येतात. आज्ञापत्रकार म्हणतो, ''हे लोक या प्रांती साहुकारीस येतात. राज्य करणारास स्थळलोभ नाही असें काय घडों पाहतें? तथापि टोपीकरांस या प्रांतीं प्रवेश करावा, राज्य वाढवावें, स्वमतें प्रतिष्ठावीं, हा पूर्णाभिमान. तदनुरूप स्थळोस्थळी कृतकार्यही झाले आहेत. त्यास ही हट्टी जात, हातास आलें मेल्यानेंही स्थळ सोडावयाचे नव्हेत. याची आमदरफ्ती (दळणवळण) आले गेले इतकीच असो द्यावी. त्यांस केवळ नेहमीं जागा देऊं नये. जंजिऱ्यासमीप तों या लोकांचे येणें जाणें सहसा होऊं देऊं नये. कदाचित वखारीस जागा देणे झाली तर खाडीचे मोबारी समुद्रतीरी न द्यावी. तसे ठिकाणी जागा दिल्याने जोपर्यंत आपले मर्यादेनें आहेत तो आहेत, नाही ते समयी आरमार, तोफा, दारूगोळी हेच त्यांचे बळ. आरमारी पाठीशी देऊन त्याचे बळे त्या बंदरी नूतन कील्लाच निर्माण करणार, तेव्हां इतकें स्थळ राज्यांतून गेलें.''

शिवाजीमहाराजांनी काळाची पावले ओळखली होती. काळाच्या पुढे जाणारा तो एक द्रष्टा महापुरुष होता. म्हणूनच इंग्रजांनी राजाचे वर्णन ''पूर्वेकडील देशांतील सर्वश्रेष्ठ मुत्सद्दी'' (the greatest diplomatist of the Eastern parts) असे आपल्या कागदपत्रात केले आहे.

हे झाले परकीय व्यापाऱ्यांबद्दलचे धोरण. पण शत्रूच्या मुलखातून आलेले व्यापारी सापडले तर त्यांच्याशी कसे वर्तन करावे यासंबंधीही राजाने सूचना दिल्या होत्या. असे

व्यापारी हाती लागले तर त्यांची ऐपत पाहून त्यांना दंड करावा आणि त्या दंडाची वसुली करताना तो सावकार आपल्या व्यवसायाला मुकेल असे काही करू नये. त्याला माफक दंड करावा आणि त्याने तो दिल्यावर त्याचा बहुमान करून त्याची स्वगृही रवानगी करावी. शत्रूच्या सेवकास शासन करतात तसे शासन सावकारास करू नये, असा दक्षतेचा इशारा अधिकाऱ्यांना दिला आहे. याचे कारण हा परप्रांतीय सावकार प्रसंगी आपणांस उपयोगीही पडेल, असे राजांना वाटत असावे. केवढी ही दूरदृष्टी!

शिवकालीन महाराष्ट्रात परकीय व्यापाऱ्यांचे अवाजवी लाडही केले जात नसत. उदाहरणार्थ, इंग्रजांच्या ईस्ट इंडिया कंपनीने शिवाजीराजाला एकदा अशी विनंती केली की त्यांच्या चलनाला मराठी मुलखात मुक्तपणे वापर करू देण्याची सवलत द्यावी. राजाने ही विनंती अमान्य केली आणि असे ठणकावून सांगितले, की 'मराठी राज्यात सर्व परकीय चलनांना समान वागणूक मिळेल; मराठी बाजारात आपले चलन रहावे म्हणून तुम्हाला योग्य ते प्रयत्न करावे लागतील, कसलीही खास सवलत मिळणार नाही.'

निसर्गाने महाराष्ट्राला ७२० किलोमीटर किनारपट्टी दिली होती. या देशातील चौल, दाभोळ, कल्याण, भिवंडी, वेंगुर्ला इत्यादी बंदरे सतराव्या शतकात चांगलीच भरभराटीस आली होती. काही बंदरे तर सुरत, गोवा यांच्याइतकी प्रसिद्ध होती.

आपल्या राज्यातील उद्योगधंदे भरभराटीस यावेत, त्यांना योग्य ते संरक्षण मिळावे, परकीयांचा हस्तक्षेप होऊ नये यासाठी शिवाजीराजाने काय उपाययोजना केली होती याचे एक उदाहरण म्हणून कोकणातील मीठ उत्पादनाच्या उद्योगाचा उल्लेख करता येईल. मीठ ही प्रत्येकाच्या जीवनास अत्यंत आवश्यक वस्तू असल्याने त्या धंद्याचा विकास म्हणजे एक प्रकारे राज्याचा आर्थिक विकासच होता.

कोकण विभाग म्हणजे मिठाच्या उत्पादनाचा प्रमुख विभाग होता आणि कोकण हा मराठी राज्याचा कणा होता. शिवाजीचे राज्य म्हणजे कोकणचे राज्य आणि शिवाजी म्हणजे कोकणचा राजा असे मानले जात होते. कोकणाचे वर्णन 'नवनिधी' म्हणजे नवनवी संपत्ती निर्मितीचे नैसर्गिक ठिकाण असे केले जात होते. असे हे कोकण म्हणजे मिठाचे आगर, तेथील लोकांचा हा एक जोडधंदा आणि लोकांच्या निर्वाहाचे मुख्य साधन होते. ठाणे, कुलाबा, रत्नागिरी या भागातील पेण, पनवेल, नागोठणे, रेवदंडा, ठाणे येथील मिठागरे एकेकाळी चांगलीच प्रसिद्ध होती. या मिठागरांतून तयार होणारे मीठ प्रामुख्याने देशावर आणि आशियातील मस्कत, मोचा, इराण, बसरा, एडन या प्रदेशांत जात असे उल्लेख इंग्रजांच्या कंपनीच्या पत्रव्यवहारात आढळतात. ...

कोकणच्या मिठाचे मोठे गिऱ्हाईक म्हणजे देशावरील व्यापारी. असे असले तरी देशावरील उदमी-व्यापारी कोकणातून मीठ खरेदी न करता थोड्याशा लांबच्या पल्ल्यावरील बारदेश या पोर्तुगिजांच्या हद्दीतील मिठागरांतून मीठ खरेदी करून ते देशावर विकत. यामुळे कोकणातील मिठाला उठाव नव्हता आणि तेथील मिठागरे ओस पडत चालली होती. शिवाजीराजाने या उद्योगावरील हे आर्थिक संकट ओळखून मिठाच्या व्यापाराला संरक्षण देण्याची योजना आखली. या योजनेनुसार बारदेशाहून जे

देशावरील व्यापारी कोकण मार्गाने मिठाची आयात करत त्यांच्यावर जबरदस्त रहदारीचा जकात कर लादला. त्याचा परिणाम असा झाला की बारदेसी मीठ व्यापाऱ्यांना परवडेनासे झाले आणि त्यांना नाइलाजाने कोकणातील मिठागरांतून मीठ खरेदी करणे क्रमप्राप्त झाले. आपल्या जकात अधिकाऱ्यांना राजाने कडक ताकीद दिली, की "संगमेश्वराहून बारदेशीचे मीठ महाग पडेल ऐसा जकातीचा तह देणे... ये गोष्टीचा एक जरा कसूर न करणे, ये गोष्टींत साहेबांचा फायदा आहे."

पोर्तुगिजांच्या देशातून येणाऱ्या मालावर जबर जकात बसविल्याने, तेथून येणाऱ्या मालाचा ओघ घटेल, आपल्या स्वराज्यातील मालाची मागणी वाढेल. मागणी वाढली म्हणजे उत्पादन वाढेल, जबर जकातीमुळे सरकारचे उत्पन्न वाढेल आणि त्यामुळे साहेबाचा म्हणजे सरकारचा बहुत फायदा होईल, असे महाराजांनी आपल्या अधिकाऱ्यांना बजावले होते. याच पत्रात पुढे म्हटले आहे, "मिठाचा मामला... लाख रूपये यावयाचा मामला आहे, तरी लिहिल्याप्रमाणे अंमल करणे."

या धोरणालाच पुढे एकोणिसाव्या शतकात फ्रेडिरिच लिस्ट या जर्मन अर्थशास्त्रज्ञाने संरक्षणाचे धोरण (Policy of Protection) असे सिद्धान्तरूपाने मांडले.

आपल्या राज्याचे उत्पन्न वाढेल कसे याचा शिवाजीराजे सतत विचार करत असावेत, असे त्यांच्या अर्थविषयक धोरणावरून स्पष्ट होते. शिवकाळात शेतसारा दोन पद्धतींनी वसूल केला जात असे. एक, नख्त म्हणजे रोख पैशाच्या रूपाने आणि दोन, गला म्हणजे धान्याच्या रूपाने. स्वराज्यात दोन प्रकारच्या महसूल पद्धती रूढ होत्या. ज्या भागात बटाईचा अंमल होता तेथे एकूण पिकाच्या निम्मा भाग - ज्याला अधेली म्हणत, महसूल म्हणून रयतेकडून घेतला जात असे. एकदा अधेली चुकता केली म्हणजे रयतेला सरकारचे काही देणे लागत नसे. दुसऱ्या प्रकारच्या महसूल पद्धतीत निव्वळ उत्पन्नाचे पाच भाग केले जात. त्यांपैकी शेतकऱ्याकडे तीन भाग ठेवून दोन भाग सरकारात महसूल म्हणून भरणा केला जाई. या पद्धतीचे वर्णन 'राजभाग पचादुई' असे केले आहे.

महसूल वसुलीच्या या दोन शिरस्त्यांची - पद्धतींची कसून अंमलबजावणी करावी अशी सर्व अधिकाऱ्यांना ताकीद दिली होती. याचे कारण धान्यरूपाने वसुली करण्याचे काम फार जिकिरीचे असल्याने अधिकारीवर्ग सामान्यत: त्या मार्गाचा अवलंब करण्याच्या बाबतीत टाळाटाळ करत. सरकारी हिश्श्याचे धान्य गोळा करून ते गुदामात रुजू करण्यापेक्षा, शेतावरच त्याची चालू बाजारभावाने किंमत ठरवून अथवा त्याची विक्री करून, पैशाच्या रूपाने महसूल दफ्तरी जमा करत. शिवाजीराजाला अधिकाऱ्यांची ही कारवाई पसंत नव्हती कारण 'पिकते तेथे विकत नाही' या न्यायाने वस्तूंचे भाव उत्पादनाच्या ठिकाणी कमीच असणार.

शेतसारा शिरस्त्याप्रमाणेच म्हणजे नख्त अथवा गला वसूल करावा यांवर शिवाजीराजांचा कटाक्ष होता. उदाहरणार्थ, कोकणातील वसुली नारळ आणि सुपारी या वस्तूंच्या रूपाने न करता त्या वेळच्या बाजारभावाने त्या मालाची किंमत करून ती

घेतली, तर सरकारच्या हाती काही फारसे पडणार नाही; परंतु त्याच वस्तू देशावर दुर्मिळ असल्याने तेथील बाजारपेठांतून त्यांना चांगला भाव मिळेल. 'मागणी-पुरवठा' आणि वस्तूंचे भाव यांचा परस्परांशी असलेला संबंध हा अर्थशास्त्राचा सिद्धान्त महाराजांनी प्रत्यक्षात कसा उतरवला होता हे जाणून घेण्यासारखे आहे. आपल्या अधिकाऱ्यांना प्रस्तुत संदर्भात दिलेल्या एका आदेशात ते म्हणतात, "येन जिनसाचे येन जिनसच उसूल घेऊन जमा करीत जाणे, आणि मग वेलचे वेलेस विकीत जाणे; की ज्या ज्या हुनरेन (कौशल्याने) माहाग विकेल आणि फायदा होये ते करीत जाणे. उसूल हंगामसीर घ्यावा आणि साठवण करून आणि विकरा (विक्री) येसा करावा की, कोण्हे वेलेस कोण जिनसच विकावा ते हंगामी तो जिनस विकावा. जिनस तरी पडोन जाया नव्हे आणि विकरा तरी महाग यैसे हुनरेने नारल, खोबरे, सुपारी, मिरे विकीत जाणे. महाग धारणे जरी दाहा बाजार यैन जिनस विकेल तर तो फायेदा जाहालियाचा मजरा (फायदा) तुझाच आहे."

१६७६ साली लिहिलेल्या या पत्रातील तपशील पाहिला म्हणजे महाराजांनी स्वराज्याचा आर्थिक पाया मजबूत करण्याच्या दृष्टीने किती दूरदर्शीपणाचे धोरण आखले होते याची कल्पना येते. ...

न्यायमूर्ती रानडे म्हणतात, की 'मराठी प्रदेशाला राष्ट्राचा दर्जा (Maratha Nation) ही शिवाजीराजांची थोर सेवा होय, पण याहून त्या महापुरुषाची थोर कामगिरी म्हणजे या नवनिर्मित 'मऱ्हाष्ट' राज्याला आर्थिक स्थैर्य प्राप्त करून दिले ही होय असेच म्हणावे लागेल.'

❑❑❑

('मध्ययुगीन महाराष्ट्र' मधून संक्षेपाने)



शिवाजीमहाराजांचे सोन्याचे नाणे (होन)



शिवाजीमहाराजांचे तांब्याचे नाणे (शिवराई)

# १२. धर्मनिरपेक्षता आणि शिवाजी

प्रा. नरहर कुरुंदकर

छत्रपती शिवाजीमहाराज हे महाराष्ट्राचे अधिदैवत असल्याप्रमाणे आहेत. लोकोत्तर पुरुषांविषयी समाजामध्ये आदरभावना असतेच. पण काहीजणांच्याबाबत हा आदर, हा एक लोकोत्तर स्वरूप धारण करतो. त्या आदराला भक्तीचे स्वरूप येते. मानवीपणाच्या साऱ्या मर्यादा ओलांडून आपल्या आदरणीय व्यक्तीचा विचार यानंतर लोक ईश्वरतुल्य विभूती म्हणूनच करू लागतात. छत्रपती शिवाजीमहाराजांचे स्थान महाराष्ट्रामध्ये जवळपास ईश्वरतुल्य असे झालेले आहे. माणूस म्हणून त्यांचा विचार करणे तत्त्वत: लोकांना मान्य असले तरी व्यवहारत: असा विचार सुरू होताच सर्वसामान्य जनतेच्या भावना दुखावल्या जातात असा अनुभव आहे. ...

महाराजांचे सारे चरित्रच अत्यंत अद्‌भुत घटनांनी भरलेले असल्यामुळे धर्मप्रधान असलेल्या सतराव्या शतकातील मनाला हा ईश्वरी अवतार आहे असे वाटले नसते तरच नवल मानावे लागले असते. हे ईश्वरी अवतारपणाचे कवच झुगारून देऊन शिवाजीमहाराजांच्याकडे शूद्रांचा नेता व माणूस म्हणून पाहण्याचा, म्हणजे आधुनिक दृष्टीने जनतेचा नेता म्हणून पाहण्याचा मान महात्मा फुले यांच्याकडे जातो. समाजाचे मन धार्मिक असले म्हणजे अलौकिक कृत्ये करणारा समाजनेता ईश्वरी अवतार म्हणून पाहिला जातोच; पण ईश्वर ही कल्पना सुटी नसून धर्माचा भाग आहे. म्हणून ज्या व्यक्तीकडे समाज ईश्वरी अवतार म्हणून पाहील, त्या व्यक्तीला समाज धर्माचा नेता म्हणूनही पाहील ही गोष्ट उघड आहे. ...

छत्रपती शिवाजीमहाराजांना हिंदूंचे धार्मिक नेते म्हणून पाहण्याच्या प्रवृत्तीचा उगम हा असा महाराजांना ईश्वरी अवतार समजण्यात आहे. धर्माधिष्ठित राजकारण करणाऱ्या मंडळींनी शिवाजीला धर्मनेता केलेले नसून त्याला ईश्वरी अवतार मानणाऱ्या मंडळींनी हे कार्य करून ठेवले आहे. कारण धर्मसंस्थापना हे ईश्वरी अवताराचे एक कार्यच असते. ...

**धर्मनिरपेक्षता : चार अर्थ :** धर्मनिरपेक्षता ही कल्पना आपण समजतो तशी निश्चित अर्थाची नाही. कारण जरी आपण धर्मनिरपेक्षता हा एकच शब्द वापरत असलो तरी त्या शब्दाच्या मागे असणारा आशय मात्र एक नाही. कमीत कमी चार वेगवेगळ्या अर्थांनी धर्मनिरपेक्षता हा शब्द वापरला जातो. शिवाजीमहाराज हे धर्मनिरपेक्ष नेते होते ही गोष्ट त्यांपैकी एकाच अर्थाने खरी आहे. उरलेल्या तीन अर्थांनी त्यांना धर्मनिरपेक्ष म्हणता येणार नाही. शिवाजीमहाराज कोणत्या अर्थाने धर्मनिरपेक्ष होते हा मुद्दा समजून घेण्यासाठी आपल्याला वेगवेगळ्या कल्पना समजून घेतल्या पाहिजेत. एकतर

धर्मनिरपेक्षता ही कल्पनाच आपण मनाशी समजून घेतली पाहिजे. दुसरी म्हणजे धार्मिक नेत्याचे स्वरूप आपल्या मनाशी समजून घेतले पाहिजे आणि तिसरे म्हणजे एखादी व्यक्ती आपल्या जीवनात धार्मिक असली तरी ती सामाजिक जीवनात धर्मनिरपेक्षतेची पुरस्कर्ती असू शकते हा मुद्दा आपण समजून घेतला पाहिजे. विशेषत: शेवटचा मुद्दा समजणे आणि समजला तरी मनाला पटणे अतिशय कठीण आहे.

**धर्मनिरपेक्ष राजकारण :** आधुनिक भारतात धर्मनिरपेक्ष नेत्याचे नमुनेदार उदाहरण म्हणून सर्वांच्या समोर पं. जवाहरलाल नेहरूंचे नाव येते. पंडित नेहरू हे आधुनिक भारताचे धर्मनिरपेक्ष नेते होते याविषयी माझ्या मनात शंका नाही. ते जसे धर्मनिरपेक्ष होते तसे वैयक्तिक जीवनातही धर्मश्रद्धारहित होते. ... यामुळे प्रथमदर्शनी जर वाटत असेल तर हे, की धर्मनिरपेक्ष राजकारणाचा नेता हा वैयक्तिक जीवनातही धर्मश्रद्धाविहीन असतो. पण अधिक बारकाईने विचार करता वस्तुस्थिती याहून निराळी दिसते. या देशातील धर्मनिरपेक्ष राजकारणाचे नेते एकटे पं. नेहरूच नव्हते. महात्मा गांधीही याच राजकारणाचे नेते. आधुनिक भारत हे जातिधर्मातीत राष्ट्र आहे. हे जातिधर्मातीत राष्ट्र गांधीजींना राष्ट्रपिता मानते. तेव्हा महात्मा गांधी हे या धर्मनिरपेक्ष राष्ट्राचे राष्ट्रपिता आहेत. यावरून जर कुणी गांधीजी वैयक्तिक जीवनात धर्मरहित होते असे अनुमान काढणार असेल तर हे अनुमान संपूर्णपणे चूक ठरणार आहे.

महात्मा गांधी आपल्या वैयक्तिक जीवनात संपूर्णपणे धार्मिक गृहस्थ होते. किंबहुना जे धार्मिक राजकारणाचे नेते होते त्यांच्याहीपेक्षा वैयक्तिक जीवनात गांधीजी जास्त धार्मिक होते. त्यांची ईश्वरावर श्रद्धा होती. पाप-पुण्य, पुनर्जन्मावर श्रद्धा होती. धर्म आणि प्रार्थनेवर श्रद्धा होती. किंबहुना आपण जे काही कार्य करतो आहोत ते ईश्वरी आदेशानुसार करतो आहोत अशीही त्यांची श्रद्धा होती. तरीही कुणी गांधीजींना भारतातील समाजजीवनाचे धार्मिक नेते मानणार नाही. ... धर्मनिरपेक्ष सामाजिक जीवन जगणारे त्या प्रवाहातील समाजकारण-राजकारण करणारे हे सगळे नेते सार्वजनिक जीवनात धर्मनिरपेक्ष तर खाजगी जीवनात संपूर्णपणे धार्मिक असे दिसतात. धर्मनिरपेक्ष राजकारणाचा नेता वृत्तीने धर्मरहित असलाच पाहिजे हा आग्रह खोटा आहे हे यावरून दिसून येईल.

शिवाजीमहाराज हे धर्मनिरपेक्ष राजकारणाचे नेते होते किंवा त्यांचे राजकारण धर्मनिरपेक्ष होते असे म्हटल्याबरोबर जी पहिली शंका येते ती ही, की महाराजांसारखा खाजगी जीवनात संपूर्णपणे धार्मिक असणारा नेता धर्मनिरपेक्ष नेता कसा होऊ शकेल? या शंकेला उत्तर म्हणूनच वर मनाने धार्मिक असणारे पण सामाजिक कार्याच्या दृष्टीने धर्मनिरपेक्ष असणारे नेते उल्लेखलेले आहेत. आपल्या वैयक्तिक जीवनात शिवाजीमहाराज धार्मिक होते यावर दुमत असण्याचे कारण नाही. ते शिवभक्त होते.

... त्यांच्या घराण्यात तुळजापूरच्या भवानीची भक्ती होती. त्या परंपरेला अनुसरून त्यांच्या घरी देवीचे नवरात्र बसत असणारच. सगळे परंपरागत कुलधर्म-कुलाचार शिवाजीमहाराज पार पाडत असावेत यात वाद नाही. शिवाय त्यांना वैदिक मंत्रांनी राज्याभिषेक झाला. हा अभिषेक त्यांनी जिद्दीने घडवून आणला यातही वाद नाही.

शिवाजीमहाराज हे धर्मनिरपेक्ष नेते होते असे म्हटल्याबरोबर लोकांना कुठेतरी मनात दुखावल्यासारखे होते आणि मग ते महाराजांच्या देव-देवळांना भेटी, त्यांच्या मनात असणारा साधुसंतांविषयीचा आदर, त्यांची मुंज, त्यांना झालेला वैदिक अभिषेक यांविषयी बोलू लागतात. इतक्या सगळ्या धार्मिकतेच्या खाणाखुणा उघड दिसत असताना, या महापुरुषाला धर्मनिरपेक्ष काय म्हणून म्हणायचे? केवळ आजच्या राजकारणाच्या सोई पाहण्यासाठी केलेली ही चतुराई आहे काय? आधीच समाजमन या पुरुषाला ईश्वरी अवतार मानते. शिवाय त्याचे खाजगी जीवन संपूर्णपणे धार्मिक होते. हिंदूधर्मावर महाराजांची कठोर निष्ठा होती. आपण हिंदू असल्याबद्दल त्यांना अभिमानही होता. मग त्यांना धर्मनिरपेक्ष राजकारणाचे नेते का मानावे?

**धर्म हा संस्कृतीचा गाभा :** हा मुद्दा समजून घ्यायचा असेल तर मग आपल्याला धार्मिक राजकारण आणि धर्मनिरपेक्षता या कल्पना समजून घ्याव्या लागतील. पण या कल्पना समजून घेण्यासाठी मुळात धर्म हीच कल्पना समजून घ्यावी लागेल. ... काहीजणांच्यासाठी धर्म ही आध्यात्मिक आणि नैतिक बाब असते. ज्यांना धर्म ही आध्यात्मिक आणि नैतिक बाब वाटते ती माणसे व्यक्तिगत जीवनात धार्मिक असूनही सामाजिक जीवनात धर्मनिरपेक्ष असू शकतात. उलट खरा धार्मिक माणूस अधिकच धर्मनिरपेक्ष असण्याचा संभव आहे. त्याच्या आध्यात्मिक जाणिवा त्याला सर्व मानवजातीइतक्या व्यापक करत असतात. कबीर हे अशा व्यापक आध्यात्माचे उत्तम उदाहरण आहे. कुराणमधील परमेश्वराला रब्बूल-मुसलमीन म्हणजे मुसलमानांचा ईश्वर असे म्हटलेले नाही. त्याला रब्बूल-आलमीन असेच म्हटलेले आहे. स्वामी विवेकानंदांसारखा माणूस ज्या वेळेला सर्व जगातले सर्वच धर्म खरे आहेत असे सांगतो त्या वेळेला तो हे आध्यात्म सांगत असतो. त्यांच्या दृष्टीने धर्म अध्यात्म असतो. त्यांची कहाणीच निराळी असते. शिवाजीमहाराज हे धर्मनिरपेक्ष राजकारणाचे नेते आहेत. स्वतः धार्मिक आहेत पण त्यांच्यासाठी धर्म ही अशी अध्यात्मिक वस्तू आहे.

**धर्मनिरपेक्षता : सेक्युल्यारिझमचा पर्याय :** धर्मनिरपेक्षता हा इंग्रजी शब्द सेक्युल्यारिझम याचा मराठी पर्याय; पण मुळात इंग्रजी शब्दाच्या मागेच वेगवेगळ्या कल्पना आहेत. ... मध्ययुगातील युरोपमध्ये धर्माचा आणि परमेश्वराचा प्रतिनिधी पोप होता. आपल्या स्वतःच्या कक्षेत पोप हा सर्वसमर्थ होता. धर्माने कोणत्या प्रश्नात लक्ष घालावे याबाबतची वहिवाट एकदा ठरल्यानंतर धर्माच्या कक्षेत स्वतः हस्तक्षेप न

करता धर्माला पूर्ण पाठिंबा द्यावा हे राजाचे कर्तव्य होते आणि राजाच्या कक्षेत ज्या बाबी येतील त्यांना धर्म पाठिंबा देत असे. एका अर्थी राजसत्ता आणि धर्मसत्ता यांनी परस्परांशी संगनमत करून जीवनाचे सगळे क्षेत्रच व्यापलेले होते असे म्हणायला हरकत नाही. सेक्युल्यारिझमची ही सर्वांत जुनी कल्पना आहे. या कल्पनेत धर्माच्यापेक्षा राजाची कक्षा निराळी मानली असली तरी जनतेच्या गुलामगिरीवर धर्म आणि राजा या दोघांचेही एकमत होते. जनतेच्या मनाला, शरीराला गुलाम करणारी ही व्यवस्थासुद्धा धर्मनिरपेक्ष राजवट म्हणूनच ओळखली जाते. ज्या वेळेला शिवाजीमहाराज हे जनतेचे नेते होते आणि ते धर्मनिरपेक्ष राजकारणाचे नेते होते असे आम्ही म्हणतो, त्या वेळेला ही कल्पना गृहीत नसते... महाराजांचे राजकारण धर्मनिरपेक्ष होते असे म्हणताना काय गृहीत धरायचे नाही याचा हा एक भाग आहे.

... रोमन कॅथलिक आणि प्रॉटेस्टंट यांचा जो दीर्घकाळ झगडा युरोपमध्ये चालू होता त्यातून सेक्युल्यारिझमची दुसरी कल्पना उदयाला येते. या कल्पनेप्रमाणे प्रत्येक धर्माने आपापल्या प्रजेच्या जीवनाचे नियंत्रण करावे. आपापल्या गटाच्या बाबतीत धर्म हे स्वायत्त असावेत. या दोन धर्मगटांनी परस्परांवर आक्रमण करू नये याची दक्षता घेणे आणि शांतता सांभाळणे, व्यवस्था पाहणे, परचक्रापासून संरक्षण करणे ही कामे राजसत्तेने पाहावी. दोन धर्मगटांच्यामध्ये राजसत्तेला समतोल ठेवायचा असल्यामुळे राजसत्ता धर्मनिरपेक्ष आणि तटस्थ असते. सेक्युल्यारिझमच्या जुन्या कल्पनेचाच नव्या परिस्थितीत हा एक अवतार आहे. जुन्या कल्पनेत राजा एका धर्माला पाठिंबा देण्यास वचनबद्ध होता. या नव्या कल्पनेत धर्माच्या अधिसत्तेपासून राजा मोकळा झाला. उलट धर्माधर्मांच्या भांडणात राजा मध्यस्थ राहणार असल्यामुळे धर्मगुरूपेक्षा राजा महत्त्वाचा झाला. राजाच्या दृष्टीने ही दुसरी कल्पना अधिक स्वातंत्र्य सांगणारी होती. पण सर्वसामान्य जनतेच्या दृष्टीने फारसा फरक नव्हता. माणसाच्या जीवनावर धर्माची अधिसत्ता आणि माणसासाठी धर्माची गुलामगिरी याही कल्पनेत कायमच होत्या. शिवाजीमहाराज यांचा विचार करताना धर्मनिरपेक्षतेची ही कल्पनासुद्धा स्वीकारार्ह नाही हे उघड आहे.

**इहलोकवादी विचार :** विसाव्या शतकात मार्क्सच्या प्रभावामुळे धर्मनिरपेक्षतेची अजून एक तिसरी कल्पना उदयाला येते. ... विज्ञानाच्या विकासामुळे अनेक धार्मिक कल्पना खोट्या ठरल्या. त्यामुळे धर्म हे अंधश्रद्धेचेच प्रामुख्याने गाठोडे आहे. मानवी जीवनातील नैतिकता आणि आध्यात्मिकता जतन करण्यासाठी धर्माच्या पांगळ्या आधाराची गरज नाही. धर्म ही माणसाच्या मनाला गुलाम करणारी अशी बाब आहे. म्हणून राजसत्तेने धर्माबाबत तटस्थ राहून चालणार नाही, तर राजसत्तेने प्रखरपणे धर्माच्या विरोधी बाजू घेतली पाहिजे. धर्मामुळे निर्माण झालेली समाजाची मानसिक

गुलामगिरी नष्ट करण्याची जबाबदारी, धर्मावर बंधने घालण्याची जबाबदारी एकूण म्हणजे सर्व प्रकारचे धर्मखंडन हे शासनाचे दायित्व आहे. या ठिकाणी शासनसंस्था संपूर्णपणे धर्मविरोधी असल्यामुळे ती खऱ्या अर्थाने इहलोकवादी होती आणि सगळा विचारच इहलोकवादी होता. समाजवाद्यांची धर्मनिरपेक्षतेची कल्पना अपरिहार्यपणे अशी नास्तिकाशी जोडलेली आहे.

पण ही विसाव्या शतकातील कल्पना झाली. सतराव्या शतकात शिवाजीमहाराज या भूमिकेचे पुरस्कर्ते नव्हते. ते स्वतः वैयक्तिक जीवनात अत्यंत धार्मिक होते आणि सर्वच धर्मांविषयी त्यांच्या मनात आदर होता हे उघड आहे. तेव्हा ही तिसरी कल्पनाही शिवाजीमहाराजांच्याबाबत लागू पडत नाही. शिवाजीमहाराजांना धर्मनिरपेक्ष नेते म्हणताना ही तिसरी कल्पना काहीजणांच्या डोक्यांत असते म्हणून ते विरोध करतात.

**धर्म : माणसाच्या समंजसपणाची खूण :** पण सेक्युल्यारिझमची अजून एक चौथी महत्त्वाची कल्पना आहे. आधुनिक भारतात महात्मा गांधींनी या कल्पनेभोवती सारे भारतीय राजकारण उभे केले. भारतीय संविधान या चौथ्या कल्पनेवर आधारलेले आहे. आपले माजी राष्ट्रपती डॉ. राधाकृष्णन हे संविधान सभेचेही सभासद होते. त्यांनी या धर्मनिरपेक्षतेचे मोठे मार्मिक वर्णन केलेले आहे. त्यांच्या आधीचे राष्ट्रपती राजेंद्रप्रसाद, नंतरचे राष्ट्रपती डॉ. झाकीर हुसेन या दोघांचीही कल्पना राधाकृष्णन यांच्यासारखीच होती. राधाकृष्णन यांनी असे म्हटले आहे, की आम्ही धर्म हा माणसाच्या समंजसपणाची व स्वातंत्र्याची खूण मानतो. धर्म ही एक अशी आध्यात्मिक जाणीव आहे, की तिच्यामुळे माणूस स्वतःच्या पशुत्वापासून मुक्त आणि स्वतंत्र होतो आणि त्याबरोबरच सर्वांचे स्वातंत्र्य तो आपल्या स्वातंत्र्याइतके महत्त्वाचे मानू लागतो. म्हणून सर्व धर्मांच्याविषयी समान आदर व व्यक्तीच्या स्वातंत्र्यावर श्रद्धा ही आमच्या धर्मनिरपेक्षतेची महत्त्वाची गमके आहेत.

धर्मनिरपेक्षतेची ही कल्पना अनेक दृष्टींनी महत्त्वाची आहे. ही कल्पना व्यक्तीच्या स्वातंत्र्यावर आधारलेली आहे. आणि म्हणून धार्मिक चालीरीतींनी निर्माण केलेल्या व्यक्तीच्या गुलामगिरीला नाकारणारी अशी ही कल्पना आहे. तरीही माणसांना या कल्पनेत धर्मश्रद्धेचे स्वातंत्र्य आहे. सर्वांना समान न्याय व प्रतिष्ठेचे आश्वासन आहे. धर्म ही परलोक कल्याणाची बाब आहे. तो व्यक्तीच्या खाजगी जीवनाचा भाग आहे, हे या ठिकाणी गृहीत आहे. या कल्पनेत धर्माला नीतिमूल्ये म्हणून मान्यता असते. सर्व धर्मांच्याविषयी आदर हे या कल्पनेचे वैशिष्ट्य असते. शिवाजीमहाराज व्यक्तिगत जीवनात धार्मिक असूनही धर्मनिरपेक्ष नेते आहेत असे म्हणताना ही भारतीय संविधानाने पुरस्कारलेली चौथी कल्पना डोळ्यांसमोर असते. हा सम्राट अशोक आणि विक्रमादित्याचा आधुनिक भारताशी सांधा आहे. अकबर आणि शिवाजी हेही या

प्रवाहात येतात. या प्रवाहात शिवाजीमहाराज हे निर्णायक महत्त्वाचे स्थान आहे. ...

पण या ठिकाणी निर्णायक महत्त्व शिवाजीमहाराजांचे आहे, ही गोष्ट आपण समजून घेतली पाहिजे. ज्या राजकीय परिस्थितीच्या विरुद्ध त्यांचा उठाव होता, त्या राजकीय परिस्थितीत राजकीय, सामाजिक आणि आर्थिक गुलामगिरी होतीच पण मध्ययुगातील धार्मिक जीवनात सर्वच प्रश्नांना धार्मिक संदर्भ येत असे आणि म्हणून धार्मिक अत्याचार, आक्रमण आणि अन्याय यांचीही फार मोठी परंपरा शिवाजीमहाराजांच्या समोर होती. ... या संदर्भात शिवाजीमहाराजांचा उदय होतो. त्यामुळे त्यांच्या ठिकाणी प्रतिक्रिया म्हणून सूडाची भावना जर दिसली असती तर तिचे समर्थन करता येणे सहज होते.

पण शिवाजीमहाराजांच्या जीवनात सूडाच्या कल्पनेला जागा नाही. मुसलमान साधुसंत त्यांनी आदरणीय व वंदनीय मानले. हिंदू साधुसंतांचाही ते आदरच करत. त्यांनी देवळांचे संरक्षण केले पण मशिदींचेही संरक्षण केले. पीर, दर्गे आणि मशिदी यांना चालू असणारी जुनी इनामे त्यांनी चालू ठेवली. नवी इनामेही करून दिली. कोणत्याच धार्मिक आक्रमणाला त्यांच्यासमोर जागा नव्हती. शत्रूंच्या स्त्रिया ही हक्काची संपत्ती मानण्याचा तो काळ होता पण महाराजांनी अत्यंत कठोरपणे स्त्रियांची अब्रू जतन करण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या शत्रूंनीही हे त्यांचे कार्य मान्य केले आहे. त्यांच्या मनात सम्राट अकबराविषयी नेहमीच आदर राहिला. अकबराचे उदाहरण डोळ्यांसमोर ठेवण्याचा सल्ला त्यांनी औरंगजेबाला दिला आहे. रणांगणावर नेहमीच दोन सैन्यांची लढाई होई. त्यात सैनिक मारला गेला की त्याचे सामान धुळीत पडत असे. समोर मुसलमान सैनिक होते. त्यामुळे कुराण हा धर्मग्रंथ नेहमीच रणांगणात धुळीत पडत असे. या धर्मग्रंथाचा अनादर होऊ नये म्हणून तो आदरपूर्वक उचलणे, पेटीत ठेवणे व पुढच्या मुक्कामावर त्या धर्माच्या अनुयायांच्या हवाली काळजीपूर्वक ग्रंथ सोपवणे यांविषयी ते दक्ष असत. महाराजांनी शत्रूची स्त्रीही संरक्षिली, कुराण ग्रंथाचा नेहमीच आदर बाळगला. हे मुस्लिम वृत्तान्तकारांनीही लिहून ठेवलेले आहे.

**शिवाजीचे साकार होणारे चित्र :** या सर्व वर्णनातून क्रमाने एक चित्र साकार होते. वतनदारांच्या जुलमातून जनतेचे रक्षण करणारा शिवाजी, सर्वांचा धर्म, अब्रू आणि प्रतिष्ठा संरक्षण करणारा शिवाजी, परधर्माला आदरपूर्वक वागवणारा शिवाजी, आपल्या प्रजेच्या निष्ठा चारित्र्याच्या जोरावर संपादन करणारा शिवाजी असे हे एक जनतेच्या नेत्याचे चित्र आहे. या चित्राचा आकार मध्ययुगाप्रमाणे राजेशाहीचा आहे. त्याचा आशय आपल्या काळाच्या कक्षा छेदून बाहेर पडणारा, लोकशाहीचा, धर्मनिरपेक्षतेचा व लोककल्याणाचा आहे. शिवाजीने वैदिकमंत्राने राज्याभिषेक करून घेतला एवढेच आपण पाहतो. देवळे बांधणे, दानधर्म करणे, यज्ञ करणे, स्मृतींचा कायदा लागू करणे

या असल्या परंपरावादात त्याने कधीही रस घेतला नाही हे आपण विसरून जातो.

हे सगळे शिवाजीमहाराजांचे व्यक्तिमत्त्व समजून घेताना सूड, बदला असल्या प्रकारच्या कल्पना मागे सोडून देऊन आपल्याला पुढे जावे लागते. सूड आणि द्वेष या आधारांवर कोणत्याच राष्ट्रातील समाजाचे नेते उभे नसतात. जनतेच्या नेत्याचा आधार, जनतेच्या कल्याणाविषयीची आस्था आणि जनतेविषयीचे प्रेम हा असतो. तेव्हा महाराजांचा विचार करताना या प्रेम, औदार्य व न्याय अशा उदात्त नीतिमूल्यांचा आधार घ्यावा लागतो हे उघड आहे. म्हणून एका जमातीच्या द्वेषावर हे नेतृत्व उभे राहणे शक्य नव्हते. कोणत्याही धर्माचा अगर जातीचा द्वेष महाराजांजवळ नव्हता हे जर आपल्याला समजले नाही तर मुसलमान सिद्दीच्या विरुद्ध महाराजांचे आरमार लढले, त्यांतील बहुतेक मोठे नेते मुस्लिम दर्यावर्दी होते या घटनेचे रहस्यही आपल्याला कळणार नाही. आग्र्याला जाताना जे निवडक सोबती शिवाजीने आपल्याबरोबर घेतलेले आहेत, त्यात मदारी मेहेतर हा एक मुसलमान आहे. महाराजांभोवती असणारा गोतावळा कुलीन वतनदारांचा कधीच नव्हता, तो नेहमीच बहुजन समाजातील अठरा-पगड जातींच्या जनसामान्यांचा होता.

**आदर्श हिंदू गृहस्थ :** या घटनांचा उलगडा कसा करायचा हा अनेकांच्या समोर वाद आहे. त्याचे उत्तर मुळात हिंदू समाजाच्या परंपराच अतिशय उदार आणि सर्वसमावेशक आहेत. शिवाजीमहाराज हे आदर्श हिंदू गृहस्थ होते म्हणून ते असे वागले असे देण्याचा मोह होणे स्वाभाविक आहे. शिवाजीमहाराज आदर्श हिंदू गृहस्थ होते यात वादच नाही. पण या ठिकाणी हिंदू शब्द अंधश्रद्धा आणि जातिभेद यांनी भरलेल्या कचऱ्याचा बोधक नसून तो कोणत्याही धर्मात असणाऱ्या उदात्त नीतिमूल्यांचा बोधक आहे. जो नियम शिवाजीमहाराजांना आपण लावतो तोच महात्मा गांधींना लावायला धार्मिक राजकारणाचा विरोध आहे. गांधींचेही राजकारण उदार आणि उदात्त नैतिक मूल्यांवर आधारलेले होते. पण त्यांचे जीवनही एका आदर्श हिंदूचे आहे असे धार्मिक राजकारणावर श्रद्धा ठेवणाऱ्यांना कधीच वाटणार नाही. एकच औदार्य, एकच उदात्तता दोन्ही ठिकाणी दिसत असताना एकाला आदर्श हिंदू आणि दुसऱ्याला हिंदूंचा शत्रू असे समजण्यात येऊ लागले म्हणजे मग प्रश्न थोडा गुंतागुतीचा होतो. ...

शिवाजीमहाराजांनी आपल्या राज्यातील अहिंदू-प्रजा सहन केली, तिचे अस्तित्व क्षम्य मानले इतकाच जर इतिहास असता तर मग सर्वसामान्य हिंदूंच्या परंपरेप्रमाणे ते वागले इतके सांगून या विषयाचा निरोप घेता येणे शक्य होते. महाराज उदासीन नव्हते. मुस्लिम प्रजेचेही हक्क सुरक्षित राहावेत, त्यांचा पैतृक धर्म त्यांना स्वाभिमानपूर्वक प्रतिष्ठेने पाळता यावा याबाबत दक्ष आणि जागरूक होते. सर्व धर्मांविषयीचा आदरभाव त्यांच्या ठिकाणी क्रियाशील होता. ती परधर्माची उपेक्षा नाही. स्वतःच्या धर्मावर प्रेम

करता करता जर सर्वच धर्मांच्याविषयी नितान्त आदरभावांपर्यंत महाराजांचे मन पोहचले असेल, तर सतराव्या शतकातील धर्मश्रद्ध वातावरणात महाराजांच्या रूपाने धर्माचे नाव घेऊन परंपरेची गुलामी उभी नव्हती, तर धर्माच्या नावाने नैतिक माणसाचे स्वातंत्र्य साकार होत होते असे आम्ही म्हणतो.

शिवाजीमहाराजांना आम्ही मध्ययुगातील हिंदूंचे धार्मिक नेते न मानता, धर्मनिरपेक्ष राजकारणाचे जनतेचे नेते मानतो. त्याचा अर्थ आता स्पष्ट व्हायला हरकत नाही.

❑❑❑

('शिवराजमुद्रा' मधून संक्षेपाने)



रायगड

# १३. शिवाजीमहाराजांची संरक्षण संघटना

लेफ्टनंट कर्नल म. ग. अभ्यंकर

१६४५ ते १६८० या पस्तीस वर्षांच्या ऐतिहासिक कालखंडाकडे दृष्टी टाकल्यास प्रामुख्याने नजरेत भरणारी गोष्ट म्हणजे छत्रपती शिवाजीमहाराजांनी स्वराज्याच्या वाढीसाठी केलेल्या अखंड मोहिमा. प्रत्येक मोहिमेनंतर रणक्षेत्र व्यापक होत गेले. निरनिराळ्या शत्रूंची प्रतिकारक्षमता, बदलत्या रणक्षेत्रांचे वैचित्र्य आणि त्यासाठी जरूर वाटलेले यंत्रणेतील फरक छत्रपतींनी वेळच्या वेळीच जाणले आणि त्याप्रमाणे संरक्षण यंत्रणेत योग्य ते फेरफार केले. यामुळेच मराठी सैन्याला रणभूमीवर शत्रूसमोर शरणागती पत्करण्याची पाळी कधीच आली नाही. या संदर्भात नवीन पिढीस इतिहास शिकवणाऱ्या शिक्षकांना एक सूचना मला करावीशी वाटते, की या विषयाचे स्वरूप केवळ 'लष्करी' या शब्दात मर्यादित न ठेवता त्याऐवजी 'संरक्षण' हा व्यापक शब्दप्रयोग आग्रहाने उपयोगात आणावा. देशाचे 'संरक्षण' हे स्थलसेना, नौसेना आणि वायुसेना अशा तिन्ही सेनादलांकडून एकत्रितरीत्या होत असते. शिवाजीमहाराजांच्या वेळी वायुसेना नव्हती तरी स्थलसेना (Army) आणि नौसेना (Navy) यांचे महत्त्व महाराजांनीच बरोबर ओळखले होते. म्हणूनच एक अजिक्य अशी संरक्षण यंत्रणा ते निर्माण करू शकले.

**संरक्षण संघटनेची प्रमुख तत्त्वे :** कोणत्याही देशाची संरक्षण संघटना ही त्या देशाची भौगोलिक परिस्थिती आणि त्या देशाविरुद्ध असलेल्या शत्रूंची प्रतिकारक्षमता या दोहोंवर अवलंबून असते. या दोन प्रमुख घटकांचा शिवकालीन परिस्थितीच्या संदर्भात आपणांस सविस्तर विचार करावा लागेल.

**भौगोलिक परिस्थिती :** शिवाजीमहाराजांच्या पस्तीस वर्षांच्या झंझावाती मोहिमांचे प्रामुख्याने तीन भाग पडतात.

(१) सन १६४५ ते १६६० : बचावात्मक मोहिमा (Defensive campaigns)

(२) सन १६६१ ते १६७२ : बचावात्मक-आक्रमक मोहिमा (Defensive-offensive campaigns)

(३) सन १६७२ ते १६८० : आक्रमक मोहिमा (Offensive operations)

सन १६४५ ते १६६० या काळातील बहुतेक सर्व मोहिमांचे रणक्षेत्र (Field of operations) हे महाराष्ट्राच्या चतु:सीमांतच मर्यादित होते. सह्याद्रीची पर्वतराजी, त्यातून वाहणारे शेकडो नदीनाले आणि घाटाखालचा कोकणपट्टीचा किनारा. याच ठिकाणी बहुसंख्य संग्राम झाले. बिकट आणि जंगलमय डोंगरी मुलखात आदर्श ठरणारी सेना म्हणजे पायदळ (Infantry). त्यामुळे या काळात महाराजांचा मुख्य भर पायदळ सेना उभारण्यावरच होता. भौगोलिक परिस्थितीची अचूक माहिती असणारे लोकच या पायदळ सेनेत उपयोगाचे असल्यामुळे महाराष्ट्रातील मावळे, घाटमाथ्यावरील शेतकरी व कोकणातील हेटकरी याच लोकांचा पायदळात प्रमुख भरणा होता. सुरुवाती सुरुवातीस १०००-२००० सैनिकांची भरती करून सन १६६० च्या सुमारास जवळजवळ

५००० ते ७००० पायदळ सेना महाराजांच्या पदरी जमा झाली आणि मिळतील तेथे घोडेस्वारांची भरती त्यांनी केली. घोडेस्वार हा पायी जाणाऱ्या सैनिकापेक्षा द्रुतगतीने जात असल्यामुळे घोडदळाची गतिमानता (Mobility) युद्धात विशेष महत्त्वाची असते. सन १६६०च्या सुमारास महाराजांच्या पदरी ५ ते ७ हजार पायदळ व ३ ते ५ हजार घोडदळ इतका फौजफाटा जमा झाला असावा. म्हणजे आधुनिक संघटनेप्रमाणे संपूर्ण दोन ब्रिगेड्सची सेना महाराज निर्माण करू शकले.

सन १६५९ मध्ये झालेल्या अफजलखानाच्या वधानंतर महाराजांनी महाराष्ट्रातील आपला मुलूख संपूर्णपणे संरक्षित केला. संरक्षणाचा बचावतळ (Base of operation) संरक्षित करून त्यांनी आपली नजर महाराष्ट्राबाहेर वळवली. पश्चिम किनाऱ्यावर असलेल्या पाश्चात्त्य वखारवाल्यांकडे महाराजांचे विशेष लक्ष होते. कल्याण, भिवंडी, मुंबई, राजापूर, मालवण, वेंगुर्ले व नंतर पोर्तुगिजांचे अमलाखालील 'गोवे' या सर्व ठिकाणी बचावात्मक आक्रमणास सुरुवात झाली. सन १६६१ मधील कारतलबखानाविरुद्ध केलेली उंबरखिंडीची लढाई म्हणजे बचावात्मक आक्रमणाचा एक उत्कृष्ट नमुना होय. तसेच दक्षिणेकडे आदिलशाहीच्या कर्नाटकामधील मुलखात स्वाऱ्या सुरू झाल्या. सन १६६४-६५ मध्ये सुरतेवर हल्ला झाला. रणक्षेत्राच्या मर्यादा झपाट्याने विस्तारू लागल्या. साहजिकच याकरता दोन गोष्टींची जरुरी होती. पहिली म्हणजे किनारपट्टीवर अंमल ठेवण्यासाठी नौदलाची नितांत जरुरी उत्पन्न झाली. त्याचप्रमाणे गतिमानता वाढवण्यासाठी पायदळापेक्षा घोडदळाची जास्त आवश्यकता भासू लागली. गतिमानता (Mobility) असेल तरच शत्रुपक्षावर अचानक कारवाई (Surprise Attack) करता येते आणि अचानक कारवाई हेच कोणत्याही युद्धात विजयाचे अंतिम सूत्रवाक्य ठरते. ही सर्व तत्त्वे लक्षात घेऊन महाराजांनी घोडदळास अधिक प्राधान्य दिले. पाश्चात्त्य वखारवाल्यांशी वारंवार संबंध येऊ लागल्यामुळे त्यांच्याकडे असणाऱ्या पल्लेदार लोखंडी आणि पितळी तोफांचे महाराजांना ज्ञान झाले व गडकोट जिंकून घेण्यास तोफखान्याची संहारशक्ती (Fire power) किती महत्त्वाची असते हे त्यांनी प्रत्यक्षात अनुभवले. त्यामुळे सन १६७०-७२ मध्ये शिवाजीमहाराजांच्या सेनेत १० ते १२ हजार पायदळ, १२ ते १५ हजार घोडदळ व १०० ते १५० सहा पौंडी आणि बारा पौंडी तोफा इतका फौजफाटा जमा झाला. या सर्व विभागांत मराठेतर अशा महाराष्ट्राबाहेरील लोकांची भरती होती. यांत पठाण वगैरे मुसलमानांचाही समावेश होता. सन १६६५ च्या बसरूरवरील हल्ल्यात मराठी नौदलाच्या ८५ जहाजांनी भाग घेतला अशी नोंद आहे. मराठी नौदलाचा सेनापती दौलतखान नावाचा मुसलमानच होता. याचा अर्थ असा, की सन १६७०-७२ च्या सुमारास आधुनिक संघटनेच्या हिशेबाने महाराजांचे संरक्षणदळ जवळजवळ १ $\frac{१}{२}$ डिव्हिजन (१ डिव्हिजन = २०,०००)पायदळ, घोडदळ व तोफखाना आणि नौदलाचा विभाग (Fleet) यांनी सज्ज झाले होते.

सन १६७०-७२ ते १६८० या काळात शिवाजीमहाराजांच्या मोहिमा आक्रमक

स्वरूपाच्या होत्या. दक्षिण भारतात कृष्णा, तुंगभद्रा ओलांडून महाराजांनी कोचीन त्रिवेंद्रमपासून ते मद्रास पाँडेचरीपर्यंत मजल मारली. रणक्षेत्र कल्पनेबाहेर विस्तारले गेले. एका एका महिन्यात २०० ते ३०० मैलांची चढाई होऊ लागली. गतिमानता वाढल्यामुळे घोडदळाची अधिकाधिक जरूरी भासू लागली. हिटलरच्या तंत्राप्रमाणे घोडदळाने चढाई करून मुलूख काबीज करावा आणि पायदळाने मागून येऊन स्थिरस्थावर करावे हे तंत्र उपयोगात आणले जाऊ लागले. मद्रासच्या इंग्रजी रेकॉर्डमध्ये सन १६७४-७६ मध्ये शिवाजीमहाराज ४०,००० पायदळ आणि २०,००० घोडेस्वार इतका फौजफाटा जवळ बाळगून होते असा उल्लेख आहे. नौदलातील जहाजांची संख्याही १५० ते २०० पर्यंत पोचली. सन १६७९ मध्ये झालेल्या खांदेरीच्या नाविक लढाईत मराठी आरमाराने प्रत्यक्ष इंग्लिश आरमारावरही मात केली. छत्रपतींच्या मृत्यूसमयी मराठी गतिमान सेनेची (Mobile field force) संख्या आधुनिक संघटनांप्रमाणे एक कोअर (Corps) पर्यंत (६०,०००) पोचली होती हे स्पष्ट आहे.

शिवकालीन किल्ले : भौगालिक परिस्थिती आणि संरक्षण संघटना यांच्या संदर्भात शिवाजीमहाराजांनी संघटित केलेली किल्ल्यांची यंत्रणा अवश्य विचारात घ्यावी लागेल. कोणताही किल्ला, मग तो शनिवारवाड्याप्रमाणे भुईकोट असो अथवा सिंहगड-पुरंदरप्रमाणे गिरिदुर्ग असो अथवा विजयदुर्ग-सिंधुदुर्गाप्रमाणे सागरी किल्ला असो, त्याचे लष्करीदृष्ट्या एक वर्चस्वबिंदू (Dominating point) म्हणून विशेष महत्त्व असते. आधुनिक युद्धातदेखील अशा तऱ्हेचे शक्तिबिंदू (Strong point) निर्माण करण्याची पद्धत आहे. किल्ल्याचा वापर तीन प्रकारे होतो. पहिला म्हणजे, आजूबाजूच्या ५०-१०० मैलांवर जागता पहारा ठेवण्यासाठी एक संरक्षित तळ (Protected firm base) म्हणून. दुसरा म्हणजे, अशा तऱ्हेच्या संरक्षित तळात लष्करी शिबंदी, अन्नधान्य, पाणी व दारूगोळा यांचे साठे आणि युद्धोपयोगी इतर साहित्य साठवण्याचे एक भांडारवजा युद्धागार (Field Depot) म्हणून आणि तिसरा वापर म्हणजे, पुरवठावाहिनी (Line of communication) अखंडित ठेवण्यासाठी संपर्कबिंदू (Contact point) म्हणून. रणक्षेत्राचा व्याप जसजसा वाढत जातो तसतशी पुरवठावाहिनी लांबत जाते. अशा प्रदीर्घ पुरवठावाहिनीवर किल्ल्यांसारखा संपर्कबिंदू नसेल तर शत्रूने अचानक केलेल्या छाप्यांमुळे पुरवठावाहिनी खंडित होऊन आघाडीवर लढणाऱ्या सैन्याची रसद तुटण्याचा धोका असतो. या सर्व गोष्टी लक्षात घेऊन शिवाजीमहाराजांनी स्वराज्य स्थापनेच्या प्रारंभापासूनच अस्तित्वात असलेल्या किल्ल्यांवर स्वत:चा अधिकार प्रस्थापित करणे, जुन्या किल्ल्यांची डागडुजी करून त्यांना सुरक्षित बनवणे आणि मोक्याच्या जागी नवीन किल्ले बांधणे असा तिहेरी कार्यक्रम जोराने हाती घेतला. प्रत्येक किल्ल्यावर २००० ते ३००० पायदळ, १००० ते २००० घोडदळ (दोन्ही मिळून अंदाजे एक ब्रिगेडची संख्या), तोफखाना, भरपूर पाणी आणि वर्षभर पुरेल एवढा अन्नधान्य, दारूगोळा आणि जनावरांची वैरण यांचा साठा असे. प्रत्येक गडावर किल्लेदार किंवा हवालदार म्हणून मराठा अधिकारी, त्याच्या मदतीस जमाखर्च ठेवण्यास एक ब्राम्हण सबनीस, कारखान्यांचे

काम पाहणारा कायस्थ प्रभू, कारखानीस अशा महाराष्ट्रातील तीन प्रमुख जमातींतील अधिकारी असत. तिन्ही जमातींतील लोकांनी एकोप्याने राहून गडाचे संरक्षण करावे आणि एकमेकांवर नियंत्रण (Check and counter check) राहिल्यामुळे शत्रूशी फंदफितुरी करण्यास वाव मिळू नये अशी महाराजांची दूरदर्शी धारणा होती.

किल्ल्यांचा वापर ही बचावात्मक युद्धाची एक आवश्यक गरज आहे ही गोष्ट शिवाजीमहाराजांना ज्ञात होती. तरीपण या बचावात्मक तळाचा उपयोग केवळ एक निश्चल बचावक्षेत्र (Static defended locality) म्हणून केला जावा अशी त्यांची कल्पना नव्हती. उलट शत्रूविरुद्ध आक्रमक कारवाई करण्यासाठी किल्ल्यांचा एक आक्रमक स्थान (Springboard for attack) म्हणूनच त्यांनी वापर केला. शत्रूला घेरून किल्ल्यांच्या मारकक्षेत्रात आणावे. (Shepherding the enemy into the ground of killing) हेच त्यांचे हुकमी तंत्र होते. अफजलखानाच्या वधानंतर त्याच्या प्रचंड फौजेवर मराठी सेना तुटून पडली ते प्रतापगडच्या किल्ल्यावरूनच.

शत्रूची ताकद आणि प्रतिकारक्षमता : पूर्वी सांगितल्याप्रमाणे भौगोलिक परिस्थितीबरोबरच आपले शत्रू कोण, त्यांची धोरणे काय, त्यांची ताकद किती व त्यांच्या प्रतिकारक्षमतेचे स्वरूप या सर्व गोष्टी आपल्या संरक्षण संघटनेवर फार मोठा प्रभाव घडवतात. ... शत्रूचे दूरगामी धोरण व पवित्रे (Postures) यांना दूरगामी शत्रूविषयक ज्ञान (Strategic Intelligence) असे म्हणतात. याउलट प्रत्येक लढाईच्या पूर्वी शत्रू कोणत्या मार्गाने येत आहे, त्याच्याजवळ किती फौज आहे, त्यामध्ये पायदळ किती व घोडदळ किती, अशा शत्रूसंबंधातील बारीकसारीक तपशिलाचे ज्ञान म्हणजे युद्धविषयक ज्ञान होय. (Basic Intelligence or Tactical Intelligence.)

स्वराज्य स्थापनेच्या प्रारंभापासून ते अखेरपर्यंत महाराजांना अनेक शत्रू होते. दक्षिणेत आदिलशाही व कुतुबशाही ही मुसलमान राज्ये, उत्तरेत स्वत: मोगल सम्राट औरंगजेब व पश्चिम किनाऱ्यावर वखारी थाटून मुसलमानी सत्तांशी हातमिळवणी करणारे इंग्रज, डच, फ्रेंच, पोर्तुगीज व सिद्दी या सर्वांनी स्वराज्य स्थापनेच्या मार्गात अनेक अडसर निर्माण केले. या प्रत्येकाचे धोरण काय, त्यांचे आपल्याविरुद्ध काय मनसुबे चालू आहेत, त्यांचे एकमेकांशी लागेबांधे कसे आहेत, पाश्चात्त्य वखारवाल्यांकडून त्यांना नवीन तऱ्हेच्या बंदुका, तोफा व हातबॉंब कधी व कसे मिळत आहेत याची बित्तंबातमी काढण्याकरता व दूरगामी शत्रूविषयक ज्ञान संपादण्यासाठी छत्रपतींनी प्रत्येक विदेशी सत्तेच्या दरबारी अत्यंत हुशार, चाणाक्ष आणि स्वामिभक्त अशा निष्णात वकिलांची नेमणूक केली होती. या वकिलांकडून महाराजांना परक्या दरबारात काय काय सल्लामसलती चालू आहेत, याचा रोजच्या रोज तपशील मिळत असे. शत्रूच्या धोरणाचे व पवित्र्यांचे साद्यंत ज्ञान झाल्यामुळे शत्रूचा मनसुबा कसा उधळून लावावा याची सविस्तर योजना महाराज बिनचूक आखत व त्यात त्यांना हमखास यश मिळे. गनिमीकाव्याचा हाच खरा अर्थ होय. गनीम म्हणजे शत्रू. त्याचा जो कावा किंवा डाव

तो उधळवून लावण्यासाठी टाकलेला प्रतिडाव म्हणजे गनिमी कावा. आधुनिक शत्रूविषयक तंत्रात यालाच Planning against the enemy's plans असे म्हणतात. तत्कालिन युद्धविषयक ज्ञान मिळवण्यासाठी हिरोजी फर्जंद आणि बहिर्जी नाईक यांच्या नेतृत्वाखाली महाराजांनी गुप्तहेरांची कुशल संघटना तयार केली होती. या संघटनेतून मिळालेल्या माहितीने शत्रूवर अचानक कारवाई (Surprise attack) करून झडप घालणे किंवा आभास निर्माण करून शत्रूला फसवणे (Deception) आणि त्याची दिशाभूल करणे (To miplify and confuse the enemy) या गोष्टी मराठी सैन्यास सहजासहजी करता येत.

शायस्तेखानावर शिवाजीमहाराजांनी घातलेला धाडसी छापा हे अचानक कारवाईच्या सूत्रबद्ध योजनेचे एक उत्कृष्ट उदाहरण म्हणून सांगता येईल. छापा म्हणजे Raid आणि Ambush हे युद्धाचे एक विशेष तंत्र आहे. वेग आणि गतिमानता यांना या तंत्रात फार महत्त्वाचे स्थान असते. प्रारंभापासून अखेरपर्यंत शायस्तेखानावरील छापा हा अत्यंत कुशलतापूर्वक योजलेला होता. छाप्याची वेळ मध्यरात्रीची, ही रात्रसुद्धा रमजानचा उपवास सोडण्याची, तोही मुघल सम्राटाच्या जन्मोत्सवाचा दिवस, पहाटे उठून खाना बनवणाऱ्या बावर्चीखान्यातील खानसामांच्या भांड्यांचा आवाज, जन्मोत्सवानिमित्त नगारखान्यात होणाऱ्या वाद्यांचे आवाज व या दोहोंमध्ये आपल्या सर्व कारवाईचा आवाज मिसळवून टाकण्याचा यशस्वी प्रयत्न, छाप्यासाठी जाणाऱ्या धाडसी सैनिकांचा पुणे शहरात संध्याकाळीच गुप्त प्रवेश, प्रत्यक्ष छापा घालण्यासाठी स्वत: महाराज आणि अगदी निवडक लोकांनी बरोबर जाणे, प्रत्यक्ष हल्ला केल्यावर सर्व कारवाई झपाझप उरकणे, परत जाण्यासाठी नेहमीचा मार्ग न घेणे, पाठलाग होणार हे जाणून पाठलाग भलत्याच दिशेने व्हावा म्हणून विरुद्ध दिशेस मशाली लावून लोकांना भुलवत ठेवणे, या व अशा अनेक गोष्टींचा विचार केला तर असे दिसते, की शिवाजीमहाराजांचे युद्धतंत्र हे दुसऱ्या महायुद्धात जर्मन व ब्रिटिश सेनांनी जे छापे (Raids) एकमेकांवर घातले तितकेच प्रगत होते.

**गनिमी कावा (Guerilla) :** शिवाजीमहाराजांचे संरक्षण धोरण व संरक्षण संघटना यांच्या संदर्भात आणखी एका मुद्द्याचा अवश्य उल्लेख करावा लागेल. तो मुद्दा म्हणजे गनिमी कावा युद्धाचा. सर्वसाधारणपणे शिवाजीमहाराज म्हटले की गनिमी कावा युद्धाचे प्रवर्तक व धुरीण असे समजले जाते. हा समज चुकीचा नाही, परंतु त्याचबरोबर हेही लक्षात ठेवणे आवश्यक आहे की, गनिमी कावा युद्धाच्या तंत्राचा महाराजांनी आपल्या झंझावाती युद्धमोहिमांत अगदी सुरुवातीच्या काळातच उपयोग केला. हे समजण्यास गनिमी कावा युद्धाची पद्धत म्हणजे काय हे स्पष्ट करणे आवश्यक ठरते. गनिमी कावा युद्धाची प्रेरणा ही देशभक्ती, अन्याय व जुलूम यांचा प्रतिकार आणि जनतेच्या आशाआकांक्षा साकार करण्याची आत्यंतिक महत्त्वाकांक्षा या तीन महान जीवनमूल्यांतूनच निर्माण होते. परिस्थितीप्रमाणे जुलूम-जबरदस्ती ही एखाद्या

परकीय राज्यसत्तेची असू शकेल किंवा आपल्याच देशातील स्वकीय राज्यसत्तेची असू शकेल. मलेशियात ब्रिटिश राज्यसत्तेविरुद्ध मलेशियन देशभक्तांनी केलेले गनिमी कावा युद्ध किंवा व्हिएतनाममध्ये अमेरिकन सत्तेविरुद्ध लोकांनी केलेले गनिमी कावा युद्ध हे पहिल्या प्रकारात येईल. या उलट चीनमध्ये चीयांग काय शेक यांच्याविरुद्ध माओ त्से तुंग व त्यांचे साम्यवादी अनुयायी यांनी पुकारलेले गनिमी कावा युद्ध हे दुसऱ्या प्रकारात येईल. ही झाली गनिमी कावा युद्धाची राजकीय पार्श्वभूमी. या दृष्टिकोनातून न्याहाळल्यास, सुमारे ८०० वर्षे भारतात असलेल्या मुसलमानी राज्यसत्तेकडून बहुसंख्याक हिंदू जमातींविरुद्ध जे राजकीय, सामाजिक, धार्मिक व आर्थिक आक्रमण झाले त्याविरुद्ध एक प्रभावी आणि प्रेरणायुक्त आंदोलन शिवाजीमहाराजांनी उभारले. ही त्यांच्या प्रारंभीच्या पंधरा वर्षांत त्यांनी जी युद्धपद्धती अवलंबली त्याची राजकीय पार्श्वभूमी होय.

आता लष्करी पार्श्वभूमीतून पाहिल्यास 'गनिमी कावा युद्ध म्हणजे संघटित आणि बलाढ्य अशा राजकीय सत्तेविरुद्ध असंघटित आणि विखुरलेल्या विरोधकांनी छोट्या छोट्या टोळ्यांकरवी केलेला एक अनियमित (Irregular) संघर्ष' अशी व्याख्या जगातील मान्यवर अशा शब्दकोशातून आढळते. या व्याख्येच्या संदर्भात आपणांस असे दिसेल, की सन १६४५ ते १६६० पर्यंत मुघली किंवा आदिलशाही सत्ता या दोन्ही बलाढ्य आणि संघटित राजकीय सत्ता होत्या. त्यामुळे नुकत्याच उभारलेल्या पायदळ आणि घोडदळाच्या छोट्या छोट्या तुकड्यांच्या मदतीने या दोन्ही सत्तांना खिळखिळे करण्यासाठी शिवाजीमहाराजांनी आपली शक्ती राखून बचावात्मक पवित्रा स्वीकारला आणि शक्य त्या प्रसंगी विशेष प्राणहानी न होऊ देता मुघली व आदिलशाही सैन्यावर छापे घालून छोट्याशा स्वराज्याचे रक्षण केले व त्याची ताकद वाढवली.

सन १६६० नंतर मात्र थेट सन १६८० पर्यंत अखंड वीस वर्षे शिवाजीमहाराजांनी आक्रमक व पल्लेदार (Offensive and Long Range) मोहिमा सुरू केल्या. मद्रासच्या इंग्रजी वखारवाल्यांनी असे लिहून ठेवले आहे, (सन १६७४) की 'शिवाजी हा आता डाकू लोकांप्रमाणे छुपे हल्ले न करता ४०,००० ते ६०,००० पायदळ आणि घोडदळासह आक्रमक लढाया करत आहे. मैदानी प्रदेशात तो धडक हल्ले (Frontal Assaults) करू शकतो आणि त्याच्या शक्तीला प्रतिआव्हान देण्याचे सामर्थ्य एकाही सत्तेकडे नाही.' याच अर्थाने आम्ही सुरुवातीस असे म्हटले, की शिवाजीमहाराजांना केवळ गनिमी कावा युद्धाचे पराक्रमी नेते म्हणणे म्हणजे त्यांच्या कर्तृत्वाचे अवमूलन करण्यासारखे आहे. प्रारंभीच्या पर्वात जरी त्यांनी गनिमी कावा पद्धतीचा अवलंब केला असला, तरी नंतर त्यांनी अलेक्झांडर, सीझर किंवा नेपोलियन यांच्याप्रमाणे आक्रमक विजय संपादन केले म्हणून त्यांना जगज्जेता नाही तरी भारतजेता म्हणणेच अधिक संयुक्तिक होईल.

गनिमी कावा युद्धाची राजकीय व लष्करी पार्श्वभूमी पाहिल्यावर गनिमी कावा

युद्धाचे तंत्र अभ्यासणे आवश्यक आहे. सर्वसामान्य व्याख्येप्रमाणे गनिमी काव्याचे सैन्य हे असंघटित असते व त्यांच्यामध्ये छोट्याछोट्या टोळ्या जास्त असल्यामुळे अवाढव्य नियंत्रण यंत्रणा (Super-structure of command & control) किंवा प्रदीर्घ अशी पुरवठा यंत्रणा (Wide-spread logistic system) असू शकत नाही. त्यामुळे साहजिकच सुसंघटित आणि संख्येने अधिक अशा सुसज्ज सेनादलांविरुद्ध धडक हल्ले करणे गनिमी काव्याच्या टोळ्यांना अशक्य असते. म्हणूनच शत्रूची रसद तोडण्यासाठी त्याच्या पुरवठावाहिनीवर अचानक हल्ला करणे, शत्रूच्या संपर्कहीन अशा ठाण्यांवर किंवा खजिन्यांवर छापा मारणे (उदाहरणार्थ-कल्याणच्या खजिन्याची लूट) किंवा शत्रूच्या मुख्य सेनापतीवर हल्ला करणे. (उदाहरणार्थ-शायस्तेखानावरील हल्ला) किंवा शत्रूला बेसावध अवस्थेत गाठून त्याला नष्ट करणे (उदाहरणार्थ-अफजलखानाचा वध) हे आणि अशाच प्रकारचे छोटे व मर्यादित संघर्ष गनिमी काव्याच्या टोळ्यांना करावे लागतात. शिवाजीमहाराजांनाही असे प्रयत्न सन १६४५ ते १६६० पर्यंत करावे लागले. त्यानंतर मात्र उंबरखिंडीची कारतलबखानाविरुद्ध लढाई, दाऊदखानाविरुद्ध कांचनबारीची लढाई, बहादुरखानाविरुद्ध औरंगाबादची लढाई, बहलोलखानाविरुद्ध उमराणीची लढाई आणि इंग्रज नाविक दलाविरुद्ध खांदेरीची नाविक लढाई या सर्व आक्रमक आणि योजनाबद्ध लढाया होय. त्यांत गनिमी कावा या युद्ध पद्धतीचा लवलेशही नसून चौफेर नेतृत्वाची आणि योजक अशा रणझुंझार युद्धनेत्याची मर्दुमकी होती. याच कारणास्तव शिवाजीमहाराज हे केवळ गनिमी कावा युद्धाचे महान प्रवर्तक आणि नेते तर होतेच, परंतु त्यांचे कार्य आणि कर्तृत्व त्याहीपेक्षा मोठे म्हणजे एका आक्रमक आणि विजेत्या युद्धनेत्याचे होते.

**शिवाजीमहाराजांची लष्करी संघटना :** शिवाजीमहाराजांच्या संरक्षण पद्धतीची मूलभूत तत्त्वे आणि पार्श्वभूमी यांचा सविस्तर अभ्यास केल्यावर आता आपणांस त्यांच्या लष्करी संघटनेच्या तपशिलाकडे वळता येईल. महाराजांच्या लष्कराची विभागणी खालीलप्रमाणे करता येईल :

**(१) पायदळ (२) घोडदळ (३) तोफखाना.**

**(१) पायदळ :** पायदळात सर्वांत कनिष्ठ गट हा १० सैनिकांचा असून त्यावर एक नाईक असे. सध्याच्या भारतीय सैन्यातदेखील सेक्शन (Section) हा १० सैनिकांचा गट असून सेक्शन कमांडरला नाईक हाच हुद्दा असतो. प्रत्येक पाच नाईकांवर एक हवालदार असे. तीन हवालदारांवर एक जुमलेदार असे. आताच्या पद्धतीतदेखील तीन हवालदारांवर एक जमादार किंवा नायक सुभेदार असतो. म्हणजे ५० सैनिकांवर पाच नाईक व एक हवालदार यांचे नियंत्रण असे व १५० सैनिकांवर एक जमादार असे. हल्लीच्या पद्धतीत अंदाजे १५० सैनिकांची एक कंपनी (Company) होते. १० जुमलेदारांवर एक हजारी असे. याचा अर्थ सरासरी १००० सैनिकांवर एका हजारीची हुकमत असे. सध्याही बटालियन किंवा पलटण या गटात १००० सैनिक असतात.

म्हणजे हजारी हा आताच्या लेफ्टनंट कर्नलच्या बरोबरीचा अधिकारी होता. साधारणत: पाच हजाऱ्यांवर एक पंचहजारी अधिकारी असे. अशा रीतीने पंचहजारी हा आताच्या ब्रिगेडियर या हुद्द्याचा अधिकारी होता. ४ किंवा ५ पंचहजारींवर एक सेनापती हा अधिकारी होता. सध्याही अंदाजे २०,००० सैनिकांच्या एका विभागाला डिव्हिजन ही संज्ञा असून सेनापतीची श्रेणी ही सध्याच्या मेजर जनरलच्या श्रेणीबरोबर होती.

**(२) घोडदळ :** शिवाजीमहाराजांच्या घोडदळात दोन प्रकार असत. पहिला म्हणजे शिलेदार व दुसरा बारगीर. शिलेदार हा स्वत:चा घोडा व हत्यारे वापरी. या उलट, बारगिराला सरकारी घोडा मिळे. प्रत्येक २५ घोडेस्वारांवर एक हवालदार, प्रत्येक ५ हवालदारांवर एक जुमलेदार, दहा जुमलेदारांवर एक हजारी व ५ हजारींवर एक पंचहजारी आणि ५ पंचहजाऱ्यांवर एक सरनौबत हा अधिकारी होता.

शिवाजीमहाराजांचे दोन प्रख्यात आणि नामवंत सेनानी म्हणजे तानाजी मालुसरे व नेताजी पालकर. मालुसरे हे पायदळाचे सेनापती असून पालकर हे घोडदळाचे सरनौबत होते. या दोघांनी स्वराज्य स्थापनेपासून ते सन १६७० पर्यंत म्हणजे जवळजवळ २५ वर्षे पाठोपाठ अनेक लढायांत सेनेचे नेतृत्व केले. सिंहगडची लढाई ही मालुसऱ्यांची शेवटची लढाई. या दोघांची तुलना नेपोलियनच्या मार्शल सौल्ट आणि मार्शल ने या रणझुंझार सेनानींबरोबर करायला हवी. शिवाजीमहाराजांच्या बरोबरच या दोन सेनानींच्या कार्याचा अधिक तपशीलवार अभ्यास होणे अगत्याचे आहे.

**शाही संरक्षक दल (The Royal Guards) :** रोमन सम्राट ऑगस्टस याच्या काळापासून प्रत्येक सम्राट आपल्या सर्वसाधारण सैन्याखेरीज स्वत:च्या संरक्षणासाठी म्हणून स्वामिभक्त आणि कुशल अशा निवडक सैनिकांचे एक खास पथक राजवाड्याच्या आसपास ठेवी. नेपोलियनचेदेखील असेच इंपीरिअल गार्ड्स हे शाहीसंरक्षक दल होते. इंग्लंडचे राजेदेखील हौसहोल्ड कॅव्हलरी आणि रेजिमेंट ऑफ गार्ड्स अशी खास पथके बाळगून असत. शिवाजीमहाराजांनी स्वसंरक्षणासाठी निवडक पायदळ घोडदळाचे २००० संख्या असलेले संरक्षक पथक तयार केले होते. पुढे पेशव्यांच्या काळातील गारदी (गार्ड्स शब्दाचा अपभ्रंश) आणि हुजूरपागा ही दोन्ही इंग्लंडमधील Guards आणि Household Cavalry प्रमाणेच संरक्षक पथके होती.

**(३) तोफखाना :** शिवाजीमहाराजांच्या गतिमान संरक्षक दलात (Mobile Field Force) सध्याप्रमाणे तोफखाना हे स्वतंत्र दल म्हणून असल्याचा पुरावा नाही. तरीपण इंग्रज, पोर्तुगीज व फ्रेंच या वखारवाल्यांशी त्यांचा जो पत्रव्यवहार झाला त्या प्रत्येकात लोखंडी व पितळी तोफा आपणांस हव्या आणि त्यासाठी दारूगोळाही हवा, अशी त्यांची सतत मागणी असे. सतराव्या शतकात युरोपियन सेनांमधूनही चार पौंडी, सहा पौंडी व आठ पौंडी तोफा वापरत होत्या. चार पौंडी याचा अर्थ चार पौंडांचा गोळा फेकणारी तोफ. नौदलाच्या लढाऊ जहाजांतूनही याच तोफांचा उपयोग डेकवरून करण्यात येई. इंग्रजांच्या व पोर्तुगिजांच्या पत्रांमधून शिवाजीराजे सहा पौंडी व आठ पौंडी तोफांची

मागणी करत असल्याचा उल्लेख आहे. या तोफांचा उपयोग मुख्यत: किल्ल्यांमध्ये बचावासाठी व नौदलातील गलबतांवर नाविक लढाईमध्येच करत असावे. या सर्व तोफा मझल लोडर (Muzzle Loader) असत. याचा अर्थ त्यातील दारूगोळा हा तोफेच्या पुढील तोंडाने ठासून भरत. ...

इतर युद्धसामग्री : युद्धनीती आणि युद्धव्यवहार (Strategy & Tactics) या दोन्ही गोष्टी शस्त्रास्त्रांच्या आधुनिकीकरणाने आमूलाग्र बदलतात, या सूत्राची शिवाजीमहाराजांना तीव्र जाणीव होती. पन्हाळ्याच्या वेढ्याच्या वेळी सिद्दी जौहरच्या फौजेने हातबाँबचा (Hand Grenade) वापर केला ही वस्तुस्थिती महाराजांच्या लक्षात येताच सिद्दीला हे हातबाँब पोर्तुगिजांकडून मिळाल्याचे त्यांना कळले. त्यांनी ताबडतोब गोव्याच्या गव्हर्नरला पत्र लिहून अशा तऱ्हेचे हातबाँब पोर्तुगिजांनी आपणालाही पुरवावेत अशी मागणी केली व मागणी मान्य न झाल्यास गोव्यावर स्वारी करण्याचा मनसुबा प्रकट केला. त्याचप्रमाणे दक्षिण भारताच्या स्वारीवर असताना जिंजीसारखे अभेद्य किल्ले जिंकण्यास तटबंदी (Fortifications) उडवून देणे हा आवश्यक उपाय होता हे त्यांनी जाणले. ताबडतोब त्यांनी मद्रासच्या इंग्रज कौन्सिलच्या प्रेसिडेंटला पत्र लिहून तटबंदीभेदक दारूगोळ्याची (Explosives for Demolition) मागणी केली व ती वापरण्यासाठी कुशल कामगार पाठवावेत अशीही विनंती केली. अद्ययावत लष्करी शस्त्रसामग्री आपल्या देशात होत नसेल तर पुढारलेल्या आणि प्रगत अशा परकीय देशांतून ती आणणे ही एक राष्ट्रीय गरज आहे याची जाणीव शिवाजीमहाराजांना ३०० वर्षांपूर्वीच झाली होती. नंतरच्या काळात महादजी शिंदे आणि शीख राज्य संस्थापक रणजितसिंग यांनी तोफखान्यास आणि सुधारित शस्त्रसामग्रीस योग्य ते महत्त्व देऊन निष्णात अशा फ्रेंच लष्करी अधिकाऱ्यांना आपल्या पदरी ठेवले. म्हणूनच इंग्रज सत्तेशी त्यांना प्रदीर्घ लढा देता आला.

लष्करी प्रशासन (**Military Administration**) : सभासदाच्या बखरीतील माहितीप्रमाणे शिवाजीमहाराजांच्या पदरी एकंदर २ लाख ५ हजार सेना होती. ही संख्या आधुनिक सेनादलाच्या तुलनेने पुष्कळच मोठी होती असे वाटते. सन १८५८ पासून १९३९ पर्यंत भारतातील ब्रिटिश सेनादलाची संख्या २ लक्ष २० हजार असे. त्यामध्ये १ लाख ६० हजार भारतीय सैनिक (Indian Troops) आणि ६० हजार गोरे सैनिक (British Troops) असत. ...

शिवाजीमहाराजांच्या २ लाख ५ हजार सेनेमध्ये १ लाख पायदळ व १ लाख ५ हजार घोडदळ असे होते. घोडदळामध्ये शिलेदारांची संख्या ६० हजार असून बारगिरांची संख्या ४५ हजार होती. अर्थात पूर्वी निर्देश केल्याप्रमाणे दोन्ही दलांतील पुष्कळसा भाग प्रत्येक किल्ल्यावर खडे सैन्य (Garrison) म्हणून असे व बाकीचा भाग गतिमान युद्धदळ (Mobile Field Force) म्हणून प्रत्यक्ष स्वारीवर गुंतलेला राही. अशा दळाची संख्या सध्याच्या घटनेप्रमाणे कोअर (Corps) स्वरूपाची असे. मोहिमेतील

गरजेप्रमाणे ४० हजार घोडदळ व २० हजार पायदळ अशी उपस्थिती ठेवत.

शिवाजीमहाराजांची सेना ही खडी राष्ट्रीय सेना (Standing National Army) असून प्रत्येक व्यक्तीस - सेनापतीपासून तो साध्या सैनिकापर्यंत - सर्वांना सरकारी कोशागारातून रोख पगार मिळे. सैन्यातील नोकरीसाठी कोणाही व्यक्तीस जागीर, मोकासा किंवा वतन दिले जाऊ नये असा महाराजांचा कडक निर्बंध होता. सेनापती, सरनौबत, मुजुमदार, कारकून, वाकनीस, पोतनीस, चिटणीस इत्यादी सर्व अधिकाऱ्यांना वेळच्या वेळी त्यांच्या श्रेणीप्रमाणे कोशागारातून वेतन मिळत असे. मुघल फौजेत सैनिकी अधिकाऱ्यांना मनसब व जागीर देण्याची पद्धत होती आणि तिचे दुष्परिणाम महाराजांच्या डोळ्यांसमोर असल्यामुळे मनसबदारी पद्धतीस त्यांचा कसून विरोध होता. फक्त एका बाबतीत या सर्वसाधारण नियमास अपवाद होता. तो म्हणजे लढाईत कामास आलेल्या व्यक्तीच्या कुटुंबीयांचा सरकारी सेवेत असताना लढाईत प्राणार्पण करणाऱ्या सैनिकांच्या व अधिकाऱ्यांच्या कुटुंबीयांना उदरनिर्वाहाचे साधन म्हणून व कामी आलेल्या कुटुंबातील मुलांना पुन्हा लष्करी सेवेत जाण्याचे प्रोत्साहन म्हणून काही इनाम देण्याचा महाराजांचा प्रघात होता. पहिल्या व दुसऱ्या महायुद्धानंतर लढाईत मर्दुमकी गाजवलेल्या वीरांना जंगी इनाम देण्याची पद्धत ब्रिटिशांनीही भारतात सुरू केली होती.

**लष्करी शिस्त (Military Discipline) :** शिवाजीमहाराजांच्या सेनेत बहुतांशी महाराष्ट्रातील शेतकरी वर्गाचाच भरणा होता. इतर अल्पसंख्याक आणि दलित समजल्या जाणाऱ्या जमातीतील लोकही सेनेत निरनिराळ्या प्रकारची कामे करत. थोड्या प्रमाणात मुसलमान व पठाण यांचीही बारगिरीत भरती होई. सन १६५९ मध्ये विजापूर दरबारचे ७०० पठाण बारगीर सेवेसाठी महाराजांपाशी रुजू झाले. त्यांनाही घोडदळात घेण्यात आले. अशा प्रकारे छत्रपतींची सेना ही एक राष्ट्रीय सेना होती, इतकेच नव्हे तर ती एक धर्मनिरपेक्ष संघटना होती असेच म्हणावे लागेल.

असे असले तरी कडक शिस्त हा उच्च श्रेणीच्या सेनादलाचा आत्मा आहे, अशी शिवाजीमहाराजांची मनोमन खात्री होती. 'तारीख-इ-दिलकुशा' या ग्रंथाचा शिवकालीन लेखक भीमसेन सक्सेना याने निर्वाळा दिला आहे, की 'महाराजांचा असा कठोर दंडक होता, की लढाईत सापडलेली कोणतीही गोष्ट-सोने, चांदी, दागिने किंवा पैसा हा लुटीचा माल म्हणून सैनिकांनी हडप करता कामा नये. अशी चीजवस्तू ताबडतोब सरकारी खजिन्यात जमा झाली पाहिजे, याविरुद्ध वर्तन करणारास महाराज स्वत: शासन करीत.' शिवाजीमहाराजांचा एक टीकाकार व समकालीन लेखक खाफीखान याने लिहिले आहे, की लढाईच्या काळात मशिदी अथवा कुराण हाती आल्यास मशिदीस कोणताही धक्का लावू नये, कुराणाचे पुस्तक मिळाल्यास त्याचा मान ठेवून ते आपल्या सहकारी मुसलमान सैनिकास द्यावे आणि मुसलमान स्त्रिया हस्तगत झाल्यास त्यांना सन्मानाने त्यांच्या आप्तेष्टांकडे पाठवावे. असा शिवाजीमहाराजांचा कडक हुकूम असे व या हुकमाचे उल्लंघन करणारास सक्त शासन होई.

स्वारीवर असताना सैन्यापासून सामान्य जनता, शेतकरी व दुकानदार यांना कोणताही त्रास पोहचू नये यावर महाराजांचा विशेष कटाक्ष होता. कोकणातील चिपळूण भागात असलेल्या मराठी सेनेस ज्या आज्ञा दिल्या त्यांमध्ये असे नमूद आहे, की 'तुम्ही स्वार असा किंवा पायदळ सैनिक असा, तुमचे वर्तन नेहमी स्वच्छ आणि शुद्ध असले पाहिजे. अन्न-धान्य, दाणावैरण, तेलतूप, भाजीपाला वा इतर कोणतीही वस्तू असो ती पैसे दिल्याखेरीज कोणाकडूनही घेणे हा गुन्हा आहे. जुलूम आणि जबरदस्ती करून या गोष्टी घेण्याचा व पैसे न देण्याचा प्रयत्न कोणी करील त्याची योग्य दखल आम्ही जातीने घेऊ आणि गुन्ह्याच्या गांभीर्याप्रमाणे गुन्हेगारास कडक शासन करू.'

आतापर्यंत केलेल्या विवेचनावरून हे स्पष्ट होईल, की शिवाजीमहाराजांनी निर्माण केलेली स्वराज्याची संरक्षण संघटना ही भारतीय इतिहासातील एक अभूतपूर्व घटना होती. इतक्या पद्धतशीरपणे व योजनाचातुर्याने संरक्षणदलांची उभारणी करण्याचा प्रयत्न शिवाजीमहाराजांपूर्वी भारतात चंद्रगुप्त मौर्यानंतर कोणाही भारतीय नेत्याने केला नव्हता, असे म्हटल्यास वावगे होणार नाही.

❑❑❑

('छत्रपती शिवाजीमहाराज स्मृतिग्रंथा'तून संक्षेपाने)

टीप : प्रस्तुत लेखकाने आपल्या लेखात गुरिला युद्धपद्धती अशी शब्दयोजना केली आहे. मराठीत त्यासाठी 'गनिमी कावा' हा शब्द रूढ आणि सर्वपरिचित असल्याने तो या ठिकाणी योजला आहे. - संपादक

**विजयदुर्ग**



## १४. शिवाजीमहाराजांचे आरमार

### डॉ. भा. कृ. आपटे

शिवाजी बारा-तेरा वर्षांचा असताना म्हणजे इ. स. १६४२-४३ मध्ये त्याची रवानगी बंगळूरहून पुण्याकडे वडिलांच्या जागिरीवर करण्यात आली. तेथे येताच त्याने बारा मावळे घेतली. हा मावळचा किंवा मावळतीचा प्रदेश सह्याद्रीच्या धारेलगतचा. विजापूरकरांच्या जागिरीत राहून शिवाजीने येथेच सह्याद्रीतील गडकोट काबीज करून आपल्या सत्तेची पाळेमुळे रोवली. तसेच त्याने जमेल तेव्हा काहीतरी निमित्त काढून राजगड, रोहिडा, तोरणा, कुवारगड, कोंडाणा ऊर्फ सिंहगड आणि पुरंदर हे मोक्याचे किल्ले आपल्या ताब्यात आणले. त्याचा हा सर्व उद्योग सह्याद्रीच्या कण्याच्या आश्रयानेच चालला होता. सह्याद्रीच्या पलीकडे उत्तर कोकणात म्हणजे कुलाबा* जिल्ह्यात दंडाराजपुरी आणि त्याच्या आसपासच्या प्रदेशात जंजिरेकर सिद्दी याची सत्ता चालत असे. दंडाराजपुरीच्या पश्चिमेला समुद्रात अर्ध्याएक मैलावर असलेल्या जंजिरा या खडकावर सिद्द्याची राजधानी असून तेथे त्याने एक किल्लादेखील बांधला होता. किनारपट्टीवर धाडी घालून जाळपोळ करणे व लुटालूट करणे हा सिद्द्याचा जुना धंदा होता. मावळात स्वराज्याची पाळेमुळे खोलवर रोवण्याचा उद्योग करत असताना सह्याद्रीच्या पलीकडील कोकणपट्टीत धुमाकूळ घालून तेथील लोकांना सतावणाऱ्या सिद्द्याची दखल घेण्यासाठी शिवाजीला आपले लक्ष आरमार निर्मितीकडे द्यावे लागले.

**आरमाराची स्थापना :** इ. स. १६५५ - ५६ मध्ये जावळीच्या मोऱ्यांचे पारिपत्य केल्यावर रायगड सर झाला तेव्हा शिवाजीच्या स्वराज्याची सरहद्द समुद्राला जाऊन भिडली. सिद्दी, टोपीकर (इंग्रज), फिरंगी (पोर्तुगीज), वलंदेज (डच) व फरासीस (फ्रेंच) या सागरी सत्तांशी शिवाजीचा संबंध आला. यांतील सिद्दी ऊर्फ हबशी याचे प्रमुख आरमारी ठाणे जंजिरा बेटावर असून किनाऱ्यावरील दंडाराजपुरी व त्याच्या आसमंतातील प्रदेश त्याच्या ताब्यात होता. हा त्याच्या ताब्यातील प्रदेश म्हणजे हबसाण. शिवकाळात सिद्दी प्रथम विजापूरकरांच्या नोकरीत होता. पुढे मोगली अमलात त्यांच्या नोकरीत रुजू झाला. त्याच्याजवळ चांगले आरमार असून त्याच्या संगोपनाकरता हबसाण म्हणजे किनाऱ्यावरील प्रदेश त्याच्या अमलाखाली असणे आवश्यक होते. सिद्दी समुद्रात चाचेगिरी करी; ... शिवाजीने इ.स. १६५७ च्या सुमारास कल्याण, भिवंडी काबीज करून राजापूरपावेतो देश काबीज केला तेव्हा सिद्द्याशी संपर्क-संघर्ष होणे अपरिहार्य होते. शिवाजीचा बखरकार कृष्णाजी अनंत सभासद याच्या शब्दांत, 'त्याचे (सिद्द्याचे) लोकांनी राजियाचे देशास उपद्रव मांडिला.

** कुलाबा जिल्ह्याचे सध्याचे नाव रायगड जिल्हा असे आहे - संपादक*

... पुढे राजियास राजपुरीचे सिद्दी, घरात जैसा उंदीर तैसा शत्रू. यास कैसे जेर करावे म्हणून तजवीज पडली'. सिद्द्याचे पारिपत्य करण्याकरिता शिवाजीला आरमार उभारण्याची निकड होती. आरमार निर्मितीमुळे इंग्रज, पोर्तुगीज, डच, फ्रेंच या सत्तांना शह बसून समुद्रात त्यांच्या बरोबरीने सार्वभौमत्व सिद्ध होणार होते. अगदी याच राजकीय कारणाकरता शिवाजीने दर्यात आरमार उभारले. 'दर्यास राजियांनी पालाण घातले.' रघुनाथ बल्लाळ याची नेमणूक तळे, घोसाळे, राजपुरीपावेतो होऊन सर्व दर्याकिनारा मोकळा केला.

**आरमाराचा विकास :** इ.स. १६५७ मध्ये शिवाजीने कल्याण, भिवंडी घेतल्यावर कल्याणच्या खाडीत सुमुहूर्ताने आपल्या आरमाराची पहिली पठाणे तरती केली. आरमार बांधणीस सुरुवात झाली. पोर्तुगीज दप्तरातील आधाराप्रमाणे शिवाजीने सन १६५९ मध्ये मराठ्यांच्या आरमाराची मुहूर्तमेढ रोवली. त्याचा इतर तपशील असा, 'आदिलशहाचा बंडखोर सरदार शहाजी याच्या एका मुलाने वसई व चौलकडील प्रदेश काबीज केला असून तो बलिष्ठ झाला आहे. त्याने काही लढाऊ गलबते भिवंडी, कल्याण व पनवेल या वसई तालुक्यातील बंदरांमध्ये बांधिली आहेत. त्यामुळे आम्हांस सावध राहणे भाग झाले आहे. ही गलबते समुद्रात फिरकू न द्यावी म्हणून (पोर्तुगीज) कॅप्टनला आम्ही आज्ञा केली आहे की, त्याने सदर गलबते बंदरातून बाहेर येऊच देऊ नयेत.' वसईस जहाजे बांधणारे कुशल पोर्तुगीज कारागीर होते. रूय लैतांव व्हियेगस व त्याचा मुलगा फेर्नाव व्हियेगस लैतांव या नौशिल्प्यांच्या नेतृत्वाखाली शिवाजीने आपली पहिली वीस लढाऊ गलबते (sanguiceis) बांधण्यास सुरुवात केली. ही जहाजे आपण सिद्द्याविरुद्ध वापरण्याकरता बांधत आहोत असे शिवाजीने जाहीर केले होते. कारण असे जाहीर केल्याशिवाय पोर्तुगीज त्याच्या जहाजांना कल्याण-भिवंडीच्या खाडीतून बाहेर समुद्रात पडू देणे शक्य नव्हते. उपरोक्त पोर्तुगीज नौशिल्प्यांच्या हाताखाली सुमारे तीनशेचाळीस पोर्तुगीज कारागीर व इतर लोक काम करत होते. बायकामुलांसकट त्यांची संख्या चारशेच्यावर होती. ... पुढे १६६८ मध्ये विजरेईने* एक जाहीरनामा काढून मोगल, आदिलशाही व शिवाजी यांच्या सैन्यामध्ये नोकरीस असलेल्या पोर्तुगीज लोकांनी स्वदेशी परत जावे अशी आज्ञा केली. शिवाजीचे आरमार एकदा तयार झाले म्हणजे सिद्द्याबरोबर आपल्यालाही त्याचा त्रास होणार या भीतीने शिवाजीच्या नोकरीत असलेल्या पोर्तुगिजांनी त्याचे आरमार तयार होण्यापूर्वी नोकरी सोडून द्यावी म्हणून वसईच्या कॅप्टन आंतोनियु द मेलु द कास्त्रु याने प्रयत्न केले. परिणामी ही सर्व मंडळी एके दिवशी शिवाजीची नोकरी सोडून गुप्तपणे मुंबई व वसई येथे पळून गेली.

अशा रीतीने १६५७ ते १६५९ च्या दरम्यान शिवाजीची वीस जहाजे तयार झाली.

याच सुमारास सिद्दी, विजापूरकर व पोर्तुगीज यांच्या ताब्यातील भाग वगळून बाकीचा उत्तर कोकण (कुलाबा जिल्हा) शिवाजीच्या ताब्यात आला होता.

* *गोव्याचा पोर्तुगीज गव्हर्नर-संपादक*

१६६१-६३ मध्ये विजापूरकरांच्या दाभोळ बंदरावर शिवाजीने हल्ला केला, सुर्व्यांचे श्रृंगारपूर घेतले व राजापूर लुटले. यामुळे जवळजवळ सर्व रत्नागिरींचा किनारा शिवाजीच्या ताब्यात आला. आरमार वृद्धिंगत करण्याची आवश्यकता तीव्रतेने भासू लागली.

सन १६६२ च्या मे महिन्यात गोव्याच्या गव्हर्नरला दाभोळचा सुभेदार राघो बल्लाळ याने, शिवाजीची पाच लढाऊ गलबते (sanguiceis) व एक तारू (pataxo) करंज्याच्या नदीत अडकून पडली होती त्यास समुद्रात जाण्यास वाट द्यावी अशी विनंती केली. याच गव्हर्नरने, एखादा धाडसी इसम पाठवून गुप्तपणे ही गलबते जाळून टाकावीत म्हणून आपल्या एका अधिकाऱ्यास सूचना केल्याचा उल्लेख आहे.

चौलच्या कॅप्टनने पोर्तुगीज गव्हर्नरास लिहिलेल्या पत्रानुसार (ऑगस्ट १६६४) वरच्या चौलमध्ये शिवाजी पन्नास तारवे बांधत होता आणि त्यांतील सात तारवे बाहेर पडण्याच्या तयारीत होती. शिवाजीचे वाढते आरमारी सामर्थ्य ध्यानात घेऊन त्याच्या तारवांना समुद्रात जाण्यास मज्जाव न करण्याचे पोर्तुगिजांचे धोरण होते. सन १६६७ च्या अखेरीस शिवाजीच्या वाढत्या सामर्थ्याबद्दल विजरेई कोंदी द सांव्हिसेंति याने एका पत्रात व्यक्त केलेले मत उल्लेखनीय आहे. 'शिवाजीचे नौदलही मला भीतिदायक वाटते. कारण त्याच्याविरुद्ध आम्ही सुरुवातीसच कारवाई न केल्यामुळे त्याने किनाऱ्यावर किल्ले बांधिले आणि आज त्याच्याजवळ पुष्कळ तारवे आहेत. पण ही तारवे मोठी नाहीत.'

पश्चिम किनारपट्टीवर आपला ताबा बसवत असताना शिवाजी आपले आरमारी सामर्थ्य वाढवत होता. किनाऱ्यावर अंमल बसवणे आणि आरमार वृद्धी करणे या गोष्टी एकमेकांना पूरक होत्या. कुलाबा जिल्ह्यातील बराचसा भाग आणि जवळ-जवळ संपूर्ण रत्नागिरी जिल्हा सन १६६३ पर्यंत ताब्यात आल्यावर शिवाजीने यथाकाल प्रसंग साधून आपले लक्ष कॅनरा म्हणजे सध्याच्या कर्नाटक किनाऱ्याकडे वळवले. १६६५ मध्ये त्याने बसरूर लुटले. आणि १६७५ पर्यंत फोंडे, सोंधे, कारवार ताब्यात आणल्यामुळे त्याचा अंमल दक्षिणेस गंगावळी नदीपर्यंत बसला. उत्तर कोकणापासून कॅनरातील गंगावळीपर्यंत जंजिरेकर सिद्दी, पोर्तुगीज व इंग्रज या सागरी सत्ता किनाऱ्यावर प्रमुख होत्या. त्यांच्याशी शिवाजीला स्वहितार्थ समुद्रावर चकमकी व युद्धे करावी लागली.

### आरमारी लढाया व चकमकी

**शिवाजी व सिद्दी :** विजापूरच्या आदिलशाहीविरुद्ध बंड करून स्वराज्य संस्थापनेचे स्वप्न साकार करत असताना उत्तर कोकणातील जंजिरेकर सिद्द्याशी शिवाजीचा संघर्ष होणे अटळ होते. अहमदनगरची निजामशाही १६३६ मध्ये नष्ट झाल्यावर सिद्दी, विजापूरच्या आदिलशाहीच्या नोकरीत रुजू झाला. विजापूरकरांचा समुद्रावरील व्यापार व मक्केच्या यात्रेला जाणारे मुसलमान यांना संरक्षण देणे ही त्याची जबाबदारी असून त्याच्याकडे त्याच्या मूळच्या दंडाराजपुरी, जंजिरा या विभागांपासून

बाणकोटपर्यंतचा मुलूख देण्यात आला होता. सिद्दी हे पूर्व आफ्रिकेतील ॲबिसीनिया व सोमालीमधून आले म्हणून ते अनुक्रमे हबशी व शामळ या नावाने ओळखले जाऊ लागले.

सतराव्या शतकात सिद्दी प्रथम विजापूरकरांचा व पुढे मोगलांचा नौकाधिकारी म्हणून राहिला. त्याच्याजवळ चांगले आरमार असून दर्यावर्दीपणात कुशल असलेले खलाशी व लढवय्ये त्याच्या दलात होते. धाडस व चाचेगिरीपणात तो कोणाला हार जाणारा नव्हता. सतराव्या शतकात कोकण किनाऱ्यावर त्याच्याइतके प्रभावी नौदल दुसऱ्या कोणत्याही देशी सत्तेजवळ नव्हते.

शिवाजीने कुलाबा जिल्ह्याचा पूर्वभाग आपल्या ताब्यात आणल्यावर त्याचा सिद्द्याशी संघर्ष सुरू झाला. सिद्दीप्रमुख फतेखान याने शिवाजीच्या प्रदेशावर हल्ले केले. शिवाजीने सिद्द्याच्या पारिपत्याकरिता रघुनाथ बल्लाळ कोरडे याच्या आधिपत्याखाली पाच-सात हजार सैन्य देऊन त्यास सिद्द्याविरुद्ध रवाना केले. त्याने तळे, घोसाळे वगैरे महत्त्वाचे किल्ले घेऊन शेवटी दंडाराजपुरी हे किनाऱ्यावरील मोक्याचे ठिकाण देण्यास सिद्द्यास भाग पाडले. तह झाला.

शिवाजीने दंडा-राजपुरीची मजबुती करून लिंगाणा, बिरवाडी वगैरे ठिकाणी किल्ले बांधल्यामुळे सिद्द्याच्या किनाऱ्यावरील धाडींना पायबंद बसला. त्याची आर्थिक शक्तीही कमी झाली.

सिद्द्याला कायमचा नेस्तनाबूद करण्याकरिता शिवाजीने १६६९ मध्ये जंजिरा या त्याच्या सागरी किल्ल्यावर हल्ला चढवला. १६७० मध्ये शिवाजीने जंजिरा जिंकण्याकरिता सारी शक्ती एकवटली. फतेखान या सिद्द्यांच्या प्रमुखास त्याने जंजिरा दिल्यास मोबदल्यात त्यास स्वतंत्र जागीर बहाल करण्याचे आमिष शिवाजीने दाखवले. फतेखानाविरुद्ध बंड झाले आणि सिद्दी संबळ याची मोगलांचा नौदलाधिकारी म्हणून नेमणूक झाली. त्याच्या हाताखाली सिद्दी कासीम यास जंजिऱ्याचा अधिकारी नेमण्यात आला आणि सिद्दी खैरियत याची नेमणूक किनाऱ्यावर झाली. याला शह देण्याकरिता शिवाजीने १६७० च्या नोव्हेंबरात जंजिऱ्यापासून दहा मैल उत्तरेस नांदगाव येथे जंजिऱ्यास वेढा घालण्याकरता १६० जहाजे, १०,००० घोडे आणि २०,००० सैन्य जमा केले. सुरुंग लावण्याचे सामान व हत्यारेही तयार ठेवली होती. या नौदलाचा बेत गुप्तपणे सुरतेवर खुश्कीने शिवाजीने स्वारी केली म्हणजे दर्यातून त्याला जाऊन मिळणे असा होता. हा बेत तडीस न गेल्यामुळे २४ नोव्हेंबरला शिवाजीचे आरमार मुंबईला वळसा घालून माहीमकडे गेले व बेत बदलल्यामुळे परत फिरले. पुढे दमणजवळून जात असताना त्याच्या नौदलाधिकाऱ्याने रुपये १२,००० किमतीचा माल घेऊन जाणारे पोर्तुगीज जहाज पकडले. पोर्तुगिजांनी शिवाजीच्या आरमारावर हल्ला करून त्याची बारा जहाजे पकडून नेली पण बाकीची दाभोळकडे निसटली.

सिद्दी कासीमने १६७१ मध्ये शिवाजीच्या ताब्यातील दंडाराजपुरीचा किल्ला हल्ला करून मोठ्या शर्थीने घेतला. तो परत मिळवण्याकरिता इंग्रजांची मदत व्हावी

म्हणून वकील पाठवून शिवाजीने प्रयत्न केला पण यश आले नाही.

**सन १६७२–७५ मधील आरमारी चकमक :** १६७२ च्या अखेरीस औरंगजेब बादशहाने सुरतेवरून सिद्द्याच्या मदतीसाठी ३६ जहाजांचा एक काफिला पाठवला. शिवाजीच्या बंदरांमध्ये धुमाकूळ घालत या काफिल्याने त्याची ५०० हून अधिक तारवे नष्ट केली आणि तो मुंबई बंदरात शिरला. या वेळी गुप्तपणे फ्रेंचांनी शिवाजीच्या आरमारास ८० तोफा व २,००० मण शिसे विकले. डचांनीही शिवाजीने मुंबई घेण्यासाठी त्यांना ३,००० सैनिक द्यावेत व मोबदल्यात त्यांनी शिवाजीला दंडाराजपुरी जिंकण्याकरता २२ जहाजे द्यावीत या अटीवर बोलणी सुरू केली. ती फलद्रूप झाल्याचे दिसत नाही.

दंडाराजपुरी परत घेण्याचा ध्यासच शिवाजीने घेतला होता. १६७४ मध्ये सिद्दी संबळने शिवाजीचा एक नौदलाधिकारी दौलतखान याजवर सातवळीच्या खाडीत हल्ला केला. सिद्द्याचा पराभव होऊन तो हरेश्वरकडे निघून गेला.

**जंजिऱ्यावर हल्ला (१६७५–७६) :** १६७५ च्या सप्टेंबरात ५७ जहाजे जमवून जंजिरा जिंकण्याचा शिवाजीने अटीतटीचा प्रयत्न केला. त्यांतील १५ गुराबा असून बाकीची गलबते होती. सिद्द्याचे आरमार लुटालूट करू लागलें तेव्हा शिवाजीच्या आरमारी काफिल्यांनी विजयदुर्ग व राजापूरच्या खाडीतून त्याचा पाठलाग केला, पण सिद्द्याचे आरमार मार न खाता जंजिऱ्याच्या आश्रयास गेले. जंजिरा जेरीस आणण्याकरता किनाऱ्यावर शिवाजीने बंदोबस्त करून तरते तराफे तयार केले. आरमारानेही वेढा दिला. किनाऱ्यावर मोरोपंत पेशव्याच्या आधिपत्याखाली १०,००० सैन्य जमा झाले. सिद्दी कासीम हा आरमार घेऊन आला. त्याने मराठ्यांच्या आरमारी व तराफ्यांची फळी फोडली आणि जंजिऱ्यावरील हा हल्ला अयशस्वी झाला. पुढे १६७६-८० च्या दरम्यान सिद्दी व शिवाजी यांच्यात किनाऱ्यावर जाळपोळ करणे व समुद्रात एखादी चकमक करणे हे उद्योग चालूच होते. १६७८ मध्ये दौलतखान आणि दर्यासारंग यांना ४,००० सैन्य देऊन शिवाजीने पनवेलास रवाना केले. याचा उद्देश मुंबई बंदरात माझगाव येथे नांगरून पडलेले सिद्द्याचे आरमार जाळून टाकणे हा होता. शिवाजीचा हा उद्देश तडीस जाऊ शकला नाही.

तोफा व मोठी जहाजे यांच्या अभावी जंजिरा जिंकण्याचे शिवाजीचे स्वप्न साकार होऊ शकले नाही. मराठ्यांच्या नाविक सत्तेला आव्हान देत जंजिरेकर सिद्दी कायम राहिला. याचे प्रमुख कारण म्हणजे सिद्द्याला ऐन वेळी इंग्रज व पोर्तुगीज यांच्याकडून मिळणारी मदत. कमकुवत सिद्द्याला शक्तिशाली शिवाजीविरुद्ध मदत करणे हे त्यांचे धोरण होते. यामुळे ते सागरावर सत्तेचे संतुलन साधत.

**शिवाजी व पोर्तुगीज :** १६५७ मध्ये 'शहाजीच्या मुलाने' वरच्या चौलचा ताबा घेतल्याचा उल्लेख पोर्तुगीज कागदपत्रात आहे. शिवाजी कल्याण, भिवंडी व पनवेल येथे आरमार बांधत होता. त्याची नोंद पोर्तुगिजांनी सावधपणाने घेतली आहे. पोर्तुगीज नौशिल्पी व कारागीर यांच्या मदतीने शिवाजी आरमार बांधत होता. यातील धोका

ओळखून पोर्तुगीज अधिकाऱ्यांनी त्या सर्वांना शिवाजीची नोकरी सोडून देण्यास भाग पाडले.

**बसरूर ऊर्फ बार्सिलोरवर शिवाजीची स्वारी (१६६५):** सन १६६५ मध्ये ८५ तारवांचा ताफा घेऊन शिवाजीने बेदनूरच्या राज्यातील बसरूरवर हल्ला केला. त्याला अमाप लूट मिळाली. हा नाविक हल्ला शिवाजीच्या वाढत्या नाविक सत्तेचा दर्शक असला तरी त्यात प्रत्यक्ष नाविक लढाई झाली नाही.

या स्वारीनंतर मराठ्यांच्या आरमाराशी पोर्तुगिजांच्या आठ तारवांची लढाई झाली.

शिवाजीचे आरमार होनावर, बसरूर, गंगोळी, मंगळूर वगैरे कर्नाटकातील बंदरांतून १२० पडाव पकडून नेत आहे अशी बातमी गोव्याचा विजरेई आंतोनियु द मेलु द कास्त्रु यास मिळाली. शिवाजीची एकंदर पंचवीस जहाजे होती. त्यांपैकी तेरा पकडलेल्या पडावांच्या आघाडीस होती व राहिलेली पिछाडीस होती. पोर्तुगीज व शिवाजी यांच्या आरमाराची मुरगावजवळ गाठ पडून पोर्तुगिजांनी शिवाजीची तेरा जहाजे पकडून नेली. बाकीची पळून गेली. शिवाजीने वकिलामार्फत दिलगिरी प्रदर्शित केल्यामुळे पोर्तुगिजांनी पकडलेली जहाजे परत नेण्यास परवानगी दिली.

२६ मार्च १६६५ मध्ये शिवाजीच्या आरमाराने पोर्तुगिजांचे एक लढाऊ तारू पकडले. आणखी एक जहाज १६७० मध्ये शिवाजीने कैद केले. हे जहाज दमणहून सुरतेस जात होते. बदला म्हणून पोर्तुगिजांनी शिवाजीची अकरा जहाजे पकडून वसईला नेली. पुढे शिवाजीच्या आरमाराशी झालेल्या चकमकीत पोर्तुगिजांनी केळशीच्या आखातातील त्याची तीन लढाऊ जहाजे हस्तगत केली. तसेच शिवाजीच्या अठरा तारवांशी झालेल्या लढाईत त्यांनी त्याची दोन गलबते पाडाव केली.

शिवाजी व पोर्तुगीज यांच्यामध्ये झालेल्या आरमारी चकमकीचे स्वरूप अशा प्रकारचे आहे.

शिवाजी व पोर्तुगीज यांजमधील तंट्याचा प्रश्न म्हणजे दस्तकांचा (cartazes). ठरावीक जकात दिल्यावर दर्यावर संचार करण्यास पोर्तुगीज आपले दस्तक मोगल, आदिलशहा व इक्करीचे राजे यांना देत. हिंदी महासागरावर आपले सार्वभौमत्व आहे असे पोर्तुगीज मानत. दस्तकविरहित मराठ्यांची जहाजे ते पकडत व शिवाजीही कोणत्या तरी निमित्ताने त्यांची जहाजे पकडी. शेवटी पोर्तुगिजांनी शिवाजीच्या आरमाराला दर्यावर मोगलांना ज्या सवलती ते देत त्या देण्याचे मान्य केले.

सन १६६४ मध्ये शिवाजीने सिंधुदुर्ग बांधण्यास काढला. त्या वेळी पोर्तुगीज कारागीर कामावर असल्याचा उल्लेख चित्रगुप्ताच्या बखरीत आहे. पण कै. पांडुरंग पिसुर्लेकर यांच्या मताप्रमाणे यास कागदोपत्री आधार नाही.

सन १६६८ मध्ये शिवाजीने पोर्तुगिजांस दाभोळ येथे वखार घालण्यास परवानगी दिली.

**शिवाजी व इंग्रज :** कोकणच्या किनाऱ्यावर इंग्रजांनी वेलदोडे आणि मिरी यांच्या व्यापाराकरता राजापुरास १६४९ मध्ये वखार घातली. पुढे मुंबई बेटे पोर्तुगिजांकडून त्यांना १६६५ मध्ये मिळाली. १६६८ मध्ये मुंबई इंग्लंडच्या

बादशहाकडून ईस्ट इंडिया कंपनीकडे देण्यात आली. सत्तेचे संतुलन राखण्याकरता वृद्धिंगत होत असलेल्या शिवाजीच्या सत्तेविरुद्ध जमेल तेव्हा विजापूरकरास, जंजिरेकर सिद्द्यास किंवा मोगलास साहाय्य करणे हे त्यांचे धोरण होते. दंडाराजपुरी शिवाजीच्या हातून गेली ती परत मिळवण्याकरता, जंजिरा किल्ला जिंकण्याकरता व तोफांकरता इंग्रजांची मदत मिळावी म्हणून शिवाजीने खूप प्रयत्न केले, पण व्यर्थ. उलट इंग्रज, शिवाजीचा कट्टर शत्रू जो सिद्दी त्याला मदत करत आणि त्याच्या जहाजांना मुंबई बंदरात नांगरून राहण्यास परवानगी देत. यामुळे सिद्द्याचे आरमार मुंबई बंदराचा आश्रय घेऊन शिवाजीच्या किनाऱ्यावर उत्पात करत असे. इंग्रजांचा हा विरोध मोडून काढण्याकरता शिवाजीने मुंबईच्या दक्षिणेस असलेल्या खांदेरी बेटाचा ताबा घेऊन तटबंदी करण्याचे ठरवले. खांदेरी बेटावरून मुंबई बंदरातील हालचाली टेहळता येणार होत्या आणि ते बेट ताब्यात आले म्हणजे इंग्रज व सिद्दी या दोघांनाही वचक बसणार होता. शिवाजीचा खांदेरी घेण्याचा बेत इंग्रज सुखासुखी पार पडू देणे शक्य नव्हते. यातूनच खांदेरीची आरमारी लढाई उद्भवली.

**खांदेरीची लढाई :** मुंबईकर इंग्रजांवर वचक बसवण्यासाठी खांदेरी बेट घेण्याचा प्रयत्न शिवाजीने १६७२ च्या एप्रिलमध्ये केला. शिवाजीचे आरमारी अधिकारी दौलतखान व मायनाक भंडारी यांनी खांदेरीवर माणसे उतरवून तटबंदी करण्यास सुरुवात केली. इंग्रजांनी जोरदार विरोधाची तयारी केल्यामुळे त्यांनी माघार घेतली.

पुढे सात वर्षांनंतर म्हणजे २७ ऑगस्ट १६७९ रोजी शिवाजी खांदेरीचा ताबा घेण्यासाठी जय्यत तयारी करत असल्याची बातमी मुंबईस येऊन थडकली. २ सप्टेंबरला थळहून माणसे व साहित्य खांदेरीवर रवाना होऊन तटबंदीस सुरवात झाल्याचे समजल्यावरून इंग्रजांनी एनझाइन डॅनिएल ह्युजेस यास तीन शिबाडे देऊन खांदेरी व किनारा यांमध्ये नांगरट करण्यास आज्ञा केली. बेटावर शिवाजीची ४०० माणसे असून त्यांनी मोक्याच्या ठिकाणी सहा तोफा उभारल्या होत्या. मुंबईच्या दुय्यम गव्हर्नरने खांदेरी, मुंबई बेटाच्या परिसरात असल्यामुळे कायदेशीरपणे इंग्रजांचे आहे व ते बेट मराठ्यांनी सोडून द्यावे असे मायनाक भंडारी यास कळवले. आपल्या धन्याच्या परवानगीशिवाय आपण काहीही करू शकत नाही असा त्याने जबाब दिला. पूर्वीच्या तीन शिबाडांच्या कुमकेस रिव्हेंज जहाज, माणसे व युद्धसाहित्य भरून पाठवण्यात आले.

सप्टेंबरच्या १० तारखेस आठ गुराबा खांदेरीच्या कुमकेस येत असल्याची आवई उठली. १४, १५ व १६ सप्टेंबरास वादळी पावसाचा फायदा घेऊन मराठ्यांनी इंग्रजी जहाजांना गुंगारा देऊन खांदेरीस रसद पोचवली.

१९ सप्टेंबरास आरमारी चकमक होऊन लेफ्टनंट थॉरपे, जॉन ब्रॅडबरी व हेन्री वेल्च हे मारले गेले व कॅप्टनचे जहाज मराठ्यांच्या हाती आले. मराठ्यांचा उत्साह द्विगुणित झाला. इंग्रज सचिंत झाले.

२० सप्टेंबरास कॅप्टन मिनचिन याचा बेटाजवळ येऊन माणसे उतरवण्याचा प्रयत्न

अयशस्वी झाला. ऑक्टोबरमध्ये कॅप्टन रिचर्ड केगविन याची नेमणूक होऊन दोन जादा गुराबा पाठवण्यात आल्या. इंग्रजांची एकूण आठ लढाऊ जहाजे वेढ्यात गुंतली होती व त्यांवर दोनशे माणसे होती.

१८ ऑक्टोबरला एक जोरदार लढाई झाली. तांबडे फुटताच मतलईचा फायदा घेऊन नागावच्या खाडीतून शिवाजीचे आरमार किनाऱ्याच्या आश्रयाने इंग्रजांच्या दिशेने वल्ही मारत पुढे गेले. थळपर्यंत गेल्यावर मराठ्यांच्या जहाजांनी इंग्रजी आरमारावर हल्ला चढवला. तो इतक्या द्रुतगतीने की त्यांना आपल्या तोफासुद्धा डागता आल्या नाहीत. त्यांची जहाजे मागे पडली. कॅप्टन केगविनचे गुराब व दुसरे एक गुराब इतर आरमारांपासून अलग पडली. त्यांची मराठ्यांच्या एकूण चाळीस छोट्यामोठ्या जहाजांशी गाठ पडली. मराठ्यांची जहाजे वाऱ्याच्या विरुद्ध दिशेला पडल्यामुळे त्यांनी नागावच्या खाडीत पळ काढला. त्यांना इंग्रजांच्या गोळीबारापुढे उभे राहता आले नाही. कॅप्टन केगविनच्या मदतीस असलेले गुराब व पाच तारवे मराठ्यांनी पकडून नेली.

इंग्रजांना नामोहरम करण्याकरता शिवाजीने कल्याणनजीक मोठे सैन्य जमवले. पनवेलास मुंबईवर हल्ला करण्यासाठी शिवाजीने ४,००० सैन्य जमवल्याची बातमी मुंबईस पोचली. २२ ऑक्टोबरास इंग्रजांनी मराठ्यांची तीन गुराबे बुडवली.

ऑक्टोबरच्या १८ तारखेस इंग्रजांनी फॉरच्यून जहाज व दोन शिबाडे, माणसे व युद्धसाहित्य भरून पाठवली. २२ ऑक्टोबरला मराठ्यांच्या बारा गलबतांनी व २५ ऑक्टोबरला सात तारवांनी रात्री खांदेरी बेटास साहित्य पुरवले. पुनः २८ तारखेस अठरा-एक गलबते खांदेरीकडे निसटली.

मराठ्यांनी योजलेली पळापळीची पद्धत व सुरत लुटणारा शिवाजी मुंबईवर हल्ला करणार ही आवई यामुळे इंग्रज जेरीस आले.

नोव्हेंबरच्या १६ तारखेस सिद्दी ५००-७०० माणसे घेऊन इंग्रजांच्या मदतीस आला. त्याने नेहमीप्रमाणे किनाऱ्यावर धाडी घातल्यामुळे दौलतखानास राग आला. त्याने याबद्दल इंग्रजास जाब विचारला. डिसेंबर अखेरपर्यंत परिस्थितीत सुधारणा झाली नाही. शत्रूचा डोळा चुकवून किनाऱ्यावरून खांदेरीचा उपराळा करण्याचा मराठी जहाजांचा उपक्रम चालूच राहिला. त्यांनी थळच्या किनाऱ्यावर तोफाही उभारल्या.

आपला टिकाव लागणार नाही हे पटल्यामुळे इंग्रजांनी तहाची बोलणी सुरू केली. जॉन चाइल्ड मुंबईचा दुय्यम गव्हर्नर व आण्णाजी पंडित यांच्यात बोलणी होऊन तह झाला (१८-१-१६८०). आण्णाजीने तहास राजयांची संमती मिळवण्याचे आश्वासन दिले.

मैत्रीचा तह होऊन इंग्रजांनी मराठ्यांच्या शत्रूंना मदत न करण्याचे मान्य केले. ३० जानेवारीस इंग्रजांचे आरमार मुंबईस परतले. मराठ्यांनी इंग्रजांचे कैदी व पकडलेली जहाजे सोडून देण्याचे मान्य केले. शिवाजीस मोक्याचे खांदेरी बेट मिळाल्यामुळे इंग्रज व सिद्दी या दोघांसही शह बसला.

**यशाची कारणे :** मराठ्यांजवळ एकंदर ४० ते ५० छोटी-मोठी जहाजे असून

त्यावर ४५० ते ५५० माणसे होती. त्यांची गलबते व गुराबा कमी वजनाची असल्यामुळे खांदेरीच्या उथळ समुद्रात द्रुतगतीने हालचाली करू शकत. खांदेरीसमोरचा मराठ्यांच्या ताब्यातील किनारा अगदी जवळ होता. त्या मानाने इंग्रजी जहाजांना त्यांचा मुंबईचा तळ दूर होता. थळच्या किनाऱ्यावर मराठ्यांनी तोफा उभारल्या होत्या. अक्षी-नागावची खाडी मराठ्यांच्या जहाजांना आश्रयास फार सोईची होती. जवळच कुलाब्याचा किल्ला होता. यामुळे मराठ्यांच्या मुख्य किनाऱ्यावरील तळावर इंग्रज हल्ला करू शकले नाहीत. त्यांना किनाऱ्याजवळ येणेसुद्‌धा साधले नाही.

खांदेरीवर मराठ्यांची जवळजवळ ५०० माणसे होती. शेवटपर्यंत लढण्याचा त्यांचा निश्चय होता. बेटावरील तोफांमुळे इंग्रजांस तेथे उतरणे कठीण होते. इंग्रजांची जहाजे खांदेरीजवळच्या उथळ पाण्यात फिरण्यास अवजड होती. त्यांच्यावर भारी तोफा होत्या पण त्यांचा पूर्ण उपयोग करण्यास मराठ्यांनी संधीच दिली नाही. अशा परिस्थितीत शिवाजी मुंबईवर चाल करणार ही आवई त्यांना शिवाजीस शरण जाण्यास भाग पाडणारी ठरल्यास नवल काय!

खांदेरीची लढाई छोट्या प्रमाणावर झाली. ती आरमारी लढाई असल्यामुळे तिचे महत्त्व आगळे आहे. शिवाजीने उभारलेले आरमार योग्य नेतृत्वाखाली पाश्चात्त्यांशी यशस्वी झुंज घेऊ शकते हे ह्या लढाईने सिद्‌ध केले.

**आरमार :** कल्याण-भिवंडीची खाडी, पनवेल, कुलाबा, विजयदुर्ग, मालवण येथे जहाजे बांधली जात. जहाजे बांधणीकरता लागणारा साग कोकणात व विशेषत: वसईच्या आसपास चांगल्या प्रकारचा मिळत असे.

शिवाजीच्या व्यवस्थेत २०० जहाजांचा एक सुभा केला जात असे. मायनाक भंडारी व दौलतखान हे शिवाजीचे प्रमुख आरमारी अधिकारी होते.

व्यापाराचे महत्त्व ओळखून मिठाच्या व्यापाराकरता शिवाजीने वासंतिक नौदल तयार ठेवले होते. मस्कत व मोचा या अरबांच्या बंदरांशी व्यापार करण्यासाठी तीन डोलकाठ्यांची जहाजे त्याने बांधली होती.

आरमाराचे संरक्षण किनाऱ्यावरील किल्ले आणि खाड्या यांच्या आश्रयाने होत असते. शांततेच्या काळात तुफानापासून बचावाकरता खाड्या उपयोगी असतात. युद्‌धकाळात किल्ले व खाड्या यांना मोक्याची ठिकाणे म्हणून महत्त्व असते. हे ओळखून शिवाजीने कोकण किनाऱ्यावरील जुने किल्ले दुरुस्त केले व नवे बांधले. सिंधुदुर्ग हा शिवाजीने बांधलेल्या जलदुर्गाचा उत्तम नमुना आहे. शिवाजीच्या आरमारात कोळी, भंडारी, गाबीत, भोई, खारवी, मुसलमान व इतर यांचा भरणा असे.

शिवाजीला आरमाराचे वाटत असलेले महत्त्व आज्ञापत्रात स्पष्टपणे उमटले आहे. 'आरमार म्हणजे एक स्वतंत्र राज्यांगच आहे. ज्यास अश्वबल त्याची पृथ्वी प्रजा आहे तद्‌वतच ज्याच्याजवळ आरमार त्याचा समुद्र. याकरिता आरमार अवश्यमेव करावे.' ... 'आरमारास तख्ते, सोट, डोलाच्या काठ्या आदिकरून थोर लाकूडें असावी लागतात. आपले राज्यांत आरण्यांत सागवानादि वृक्ष आहेत त्यांचे जें अनुकूल पडेल तें (हुजर लेहून) हुजूरचे परवानगीनें तोडून न्यावें. याविरहित जें लागेल तें परमुलखींहून

खरेदी करून आणवीत जावे.'

'आंबे, फणस हेही आरमाराच्या उपयोगी असल्यामुळे त्यांचे जतन करावे. ती वाढविण्यास कष्ट पडतात म्हणून त्यांच्या मालकास मोल देऊन ती घ्यावीत. त्यांना दुःख होईल असे काहीही करू नये.'

या विवेचनावरून शिवाजीचे आरमारविषयक धोरण किती सर्वंकष होते याची कल्पना येते.

❑❑❑

('शिवरायासी आठवावे' मधून संक्षेपाने)



लढाऊ जहाज - गुराब

# १५. दुर्गपुत्र शिवाजी

**गो. नी. दांडेकर**

जनमानसामध्ये एका ग्रहाची पाळेमुळे अगदी घट्ट रुतून बसली आहेत. तो असा, की या महाराष्ट्रदेशी जितके म्हणून दुर्ग आहेत ते सर्वच्या सर्व श्रीशिवछत्रपतींनी रचले आहेत. कोण्याही कड्यापर्वतामधील गुहा किंवा लेणे हे जसे पांडव लेणे किंवा कुठेही धरित्रीच्या उदरातून वर उसळलेला झरा ही जशी सीतेची न्हाणी, तसाच काहीसा हा ग्रह आहे. याचा अर्थ इतकाच, की कुण्या एका गडकोटामध्ये जन्मलेला, जन्मभर गडकोट जिंकण्याचा ध्यास लागलेला, त्यांच्यावर निरतिशय प्रेम करणारा, एका अजेय दुर्गावर स्वत:ची राजधानी निर्मिणारा, तिथेच स्वत:ला राज्याभिषेक करवून घेणारा आणि अंतिम श्वासही त्याच दुर्गावर घेणारा पुरुष एक शिवछत्रपती वगळता इतिहासात दुसरा कुणी झाला नाही.

महाराष्ट्रात गडकोट एकूण उणेपुरे साडेपाचशें. पैकी काही अगदीच क्षुद्र आहेत. केवळ भोवतालच्या प्रदेशावर पहारा करण्यासाठी निर्मिलेली चौकी, इतकाच त्यांचा अर्थ. वर जागाही तेवढीच. जेमतेम एखाददुसरे टाके. काही जुजबी तटाबुरुजांच्या खुणा यापलीकडे त्या किल्ल्यांचा कसलाही अवशेष आज शिल्लक नाही.

मनुस्मृतीत वर्णिलेले वाक्ष्यदुर्ग, नृदुर्ग, धनुदुर्ग इत्यादी दुर्ग आज नामशेष झाले आहेत. मात्र अब्दुर्ग, महीदुर्ग आणि गिरिदुर्ग एवढे दुर्गाचे तीन प्रकार महाराष्ट्रात मोठ्या संख्येने आढळतात. अब्दुर्ग म्हणजे जलदुर्ग, समुद्रतटाशी किंवा खाडीच्या तोंडाशी उभारलेले किल्ले. महीदुर्गाचा अर्थ भुईकोट किंवा गढ्या. या दोन्ही प्रकारच्या किल्ल्यांपैकी काही शिवोत्तरकाली देखील रचले गेले. सागरी किल्ल्यांपैकी मुंबई, शीव, माहीम, धारावी, तारापूर, वसई आदी कोटांच्या रचनेचे श्रेय पोर्तुगिजांकडे सोपवले पाहिजे. गिरिदुर्ग म्हणजे डोंगरी किल्ले.

दोन-अडीच हजार वर्षांपूर्वी महाराष्ट्रदेशी कुणाचे शासन होते, याविषयी इतिहासकारांमध्ये एकमत नाही. नालासोपारा येथे सापडलेल्या अशोकाच्या स्तंभावरून अनुमान करता येते, की मौर्य साम्राज्याच्या आधिपत्याखाली हा देश त्या काळी नांदत होता. पश्चिम तटावरील बंदरांच्या तत्पूर्वकालीन उल्लेखांवरून समुद्रमार्गाने पश्चिमेकडील देशांशी चालू असलेल्या व्यापारासंबंधी तर्क करता येतो. मोहेंजोदडो, हडप्पा, लोथल इत्यादी स्थळी मालाच्या पेटाऱ्यांवर उठवायच्या मुद्रा सापडल्या आहेत. परदेशांकडून येणारा हा माल वरघाटी पोचवण्यासाठी ज्या डोंगरवाटा वापरल्या जात, त्यांच्या तळाशी आणि डोंगरमाथ्यावर उभारल्या गेलेल्या सैनिकी चौक्या, हे गिरिदुर्गांच्या बांधणीच्या नानाविध कारणांपैकी एक कारण. या गिरिदुर्गाचा रचनाकाल अदमासे पाच हजार वर्ष पूर्व इतका अनुमानावा लागतो. हा अमुकच एक दुर्ग अमुकाने रचला असे या पूर्वदुर्गाविषयीचे विधान करता येत नाही.

कार्ले, भाजे, वेरूळ, जुन्नर, ठाणाळे, पाले इत्यादी गावी असलेले लेण्यांचे समूह

अनुक्रमे लोहगड, विसापूर, देवगिरी, शिवनेरी, सुधागड, रायगड इत्यादी किल्ल्यांचे प्राचीनत्व सूचित करतात. ही लेणी त्या त्या दुर्गाधिपतींच्या अनुमतीने किंवा प्रेरणेनेच कोरली गेली. या लेण्यांच्या रचनाकालापूर्वी शेपाचशे वर्षे तरी या दुर्गांची रचना होऊन त्यांचे शासन त्या त्या प्रदेशी स्थिर झाले होते.

**सातवाहनांची कामगिरी :** दुर्गरचनांविषयीचे पहिले सुस्पष्ट, भित्तिलेखांकित प्रमाण, म्हणून नाणे घाटातील लेण्यांमधील शिलालेखाला फार महत्त्व आहे. त्या शिलालेखांमध्ये दुर्गरचनेचा उल्लेख नसला तरी नाणेघाटाच्या निर्मितीचा उल्लेख आहे. सुख्यातनाम सातवाहन नामक राजकुलाने तो घाट निर्मिला. गेली दोन हजार वर्षे तो घाट वाहता आहे. कोकणातून हजारो लमाण आणि त्यांचे बैलांचे तांडे ज्या घाटावाटे तळ कोकणातून वरघाटी चढले. कितीएक सैन्यदळे त्या वाटेने आली गेली. असा तो घाट ज्या सातवाहन कुलाची निर्मिती, त्यानेच घाटमाथ्यावरचा, ज्याच्या ऐन सावलीत घाट आहे, तो जीवधन किल्ला उभारला, हे अंतर्गत प्रमाणांनी स्पष्ट होते. खडकांत कोरलेली जीवधनमधील धान्यागरे, किल्ल्यावर चढण्यासाठी कडा फोडून तयार केलेले मार्ग, इत्यादी कोरीवकाम त्याच शिल्पज्ञांच्या हातचे आहे; एकदा हे तथ्य ध्यानी आले, की मग जीवधनलगतचे चावंड, हडसर आणि शिवनेरी हे किल्लेही सातवाहनांच्या हातचेच आहेत, यात संशय उरत नाही.

तिथून उत्तरेकडील हरिश्चंद्रगडावरही असलेच कोरकाम आणि लेणी आहेत. त्याच्या निर्मितीचे श्रेयही सातवाहनांकडेच द्यायला हवे. इतिहासाच्या काळोखभरल्या गुहेत प्रवेश करून दुर्गरचनेचा मागोवा घेता प्रकाशाची पहिली तिरीप पडते, सातवाहन कर्तृत्वावर.

त्यापूर्वी आणि नंतर दुर्गांची निर्मिती होतच होती. पण कोण्या एका उत्तरकालीन राजकुलाच्या नावाशी जर दुर्गरचनेचा संबंध येत असेल, तर ते कुल शिलाहारांचे. पैकी भोज नामक नृपाळाच्या नावापाशी क्षणभर थांबून त्याला प्रणाम केल्याविना पुढे सरणे अशक्य आहे. चालुक्य, राष्ट्रकूट, कदम्ब इत्यादी कितीतरी राजकुले महाराष्ट्रदेशी नांदून गेली, पण त्यांपैकी एकाही राजाने भोज शिलाहाराइतके किल्ले निर्माण केल्याची नोंद इतिहासात नाही.

शिलाहार कुल पन्हाळ्यास नांदत होते. त्या पन्हाळ्याची तटा-बुरुजांची बांधणी भोज शिलाहाराच्या नावावर नमूद आहे, एवढेच नव्हे तर केळंजा, चंदन, वंदन, कल्याणगड, पांडवगड, पावनगड, बावडा, भूधरगड, रांगणा, वसंतगड, वैराटगड, विशाळगड, सातारा, सामानगड इत्यादी दुर्गही त्यानेच निर्मिले.

महाराष्ट्रातील दुर्गांच्या संख्येत येणेप्रमाणे भर पडत चालली. पुढे निजामशाही आणि आदिलशाही शासकांनी काही भुईकोट निर्मिले. काही गडांची दुरुस्तीही केली. पन्हाळा त्यांच्याकडे बहुतकाळपर्यंत होता. त्यावरील एका तटावर निर्मात्याचा अरबी लिपीतील शिलालेख आहे. तीनदरवाजा, जलमंदिर इत्यादी इमारतींची निर्मितीही मुसलमानांच्या हातची आहे. अन्यत्र सात/आठ किल्ल्यांमधून त्यांचे शिलालेख उपलब्ध

आहेत. पण त्यांचा अर्थ ते दुर्ग त्यांनी निर्मिले, असा होऊ शकत नाही. ...

श्रीशिवछत्रपतींच्या दुर्गविषयक उदयमाकडे या पार्श्वभूमीवर लक्ष पुरवले पाहिजे. या महापुरुषाचा जन्म एका दुर्गावर झाला, या घटनेला मोठा अर्थ आहे. अगदी बालपणी त्यांचे श्वसन, क्रीडा, चिंतन इत्यादी सर्व एका दुर्गावर झाले. तिथल्या वाहत्या भराटवाऱ्याने त्यावर जे संस्कार केले, त्यांनी त्यांच्या जडणघडणीत फार मोठी कामगिरी बजावली आहे.

छत्रपतींचा सूक्ष्म अभ्यास : ... डोंगर कोरायची कलाच शिवकाली प्राय: नि:शेष झाली होती. शिवछत्रपतींचा गौरव जर कशासाठी वारंवार करायचा असेल, तर तो यासाठी की त्यांनी दुर्गरचना, त्यांची गरज, उपयोग, महत्त्व, स्थान, आवश्यकता इत्यादी सर्व बाबींचा अतिशय सूक्ष्म अभ्यास केला. त्याचे त्यांनी एक स्वतंत्र शास्त्र बनवून टाकले. जुने दुर्ग हस्तगत केले. पडके होते, त्यांचा पुनरुद्धार केला. तटाबुरुजांनी त्यांची मजबुती केली. वर तोफा चढवून बंदोबस्त पक्का केला. संरक्षणासाठी नियम तयार केले. अतिशय कठोरपणे त्यांचे पालन करवून घेतले. पूर्वी दुर्ग नव्हते, तिथे मोक्याच्या जागी नवे बांधवून घेतले. त्यांच्या बांधणीसाठी लागणारे द्रव्य मिळवले. संपादित केले. त्यासाठी कष्ट केले, साहसे केली.

कारकुनांनी म्हटले, की गडांच्या पायी खर्च फार होतो. कोशात काही शिल्लक राहत नाही. यावर छत्रपतींनी दिलेले उत्तर मोठे मार्मिक आहे. ते म्हणाले.

"आपणांस धर्मस्थापना व राज्यसंपादन करणे. सर्वास अन्न लावून शत्रुप्रदेश न होय, ते किल्ल्यामुळे होते. सर्वांचा निर्वाह आणि दिल्लींद्रासारखा शत्रु उरावर आहे, तो आला तरी नवेजुने तीनशेसाठ किल्ले हजरतीस आहेती. एकेक किल्ला वर्षवर्ष लढला, तरी तीनशेसाठ वर्षे पाहीजेत."

बालपणी शिवाजी जिजाऊसाहेबांबरोबर पुण्यास आले, तेव्हा जहागिरीमध्ये एकही किल्ला नव्हता. सिंहगडावरील नामजाद अधिकारी दादोजी कोंडदेवच असले तरी त्यावर सत्ता आदिलशाहाची होती. ... तिथून दक्षिणेकडील मुरूंबदेवाचा चोखट डोंगर आणि दुर्लक्षित तोरणा हे अगदी हाकेच्या अंतरावर होते. तोरणा दुर्भेद्य होता. आकाशाला स्पर्शत होता. जणू तो साद घालत होता.

राजांनी तो हस्तगत करून राज्यस्थापनेचा शुभारंभ करून टाकला. लगोलग मुरूंबदेवाचा डोंगर ताब्यात घेऊन त्यावर त्यांनी मजबूत किल्ला उभारण्यास प्रारंभ केला. हा डोंगर एक पवित्र स्थान. बहुत पूर्वकाळच्या तापसांच्या गुहांवर विद्यमान होत्या. त्या बुद्धपूर्वकालीन प्राच्यवैदिक आहेत. डोंगर अतिशय देखणा. मध्यभागी एक प्रचंड सुळका. तीन बाजूंस तीन सोंडा पसरलेल्या. एवंगुणविशिष्ट डोंगरावर राजांनी मुहूर्तशिळा ठेवली आणि तटाबुरुजांची कामे सुरू केली. सहा-सात वर्षे हे बांधकाम सुरू होते. बांधकामावरचे अधिकारी मोरोपंत पिंगळे. पूर्व आणि पश्चिम दोन्ही बाजवांच्या तटबंदीस आतून चिलखती भिंत बांधली. हे इतके मजबूत काम कोणत्या एका किल्ल्याचे केलेले नाही. हा किल्ला प्राकृतिक सौंदर्य, निसर्गाचे दान, बांधणी, दुर्गमत्व या दृष्टींनी

केवळ अजोड. नाव राजगड असे ठेवले. या किल्ल्यावर स्वराज्यासाठी झालेल्या बहुतेक सर्व मोहिमांचे बेत रचले गेले. स्वराज्याच्या आंदोलनाचे चढउतारही याच किल्ल्यावरून राजांनी अनुभवले. कित्येक मोहिमांसाठी ते स्वत: चालून गेले तेही याच किल्ल्यावरून. स्वराज्याच्या इतिहासात येणेप्रमाणे राजगडाचे महत्त्व अद्वितीय आहे.

''हे प्रत्यक्ष शिवलंका'' : महाबळेश्वरवरून कोकणात उतरणारा पारघाट मोकळा होता. प्रतापगड बांधून राजांनी ती वाट बंदिस्त करून टाकली. कुरटे बेटावर सागरतीरी ऐन पाण्यात त्यांनी निर्मिलेल्या सिंधुदुर्गाचेही महत्त्व अधिक आगळेच आहे. हा किल्ला बांधल्यावर बखरकाराने म्हटले की, ''अठरा टोपीकरांच्या छातीवर हे प्रत्यक्ष शिवलंका निर्मिली.'' 'अठरा' हे केवळ टोपीकरांचे बाहुल्य दाखवणारे अर्थवादात्मक विशेषण. या वाक्याचा आशय अधिक महत्त्वाचा. या पाश्चात्त्य व्यापाऱ्यांपैकी अंग्रेज हे अधिक धूर्त. जहांगीर, शहाजहान, औरंगजेब यांपैकी एकही जण इंग्रजांचे वास्तव रूप ओळखू शकला नाही. ते जाणण्याइतके बुद्धिचातुर्य केवळ राजांनीच दाखवले. राजांच्या तालमीत तयार झालेल्या रामचंद्रपंत अमात्यांचे आज्ञापत्रातील खालील उद्गार अतिशय सूचक आहेत.

'साहुकारांमध्ये फिरंगी व इंग्रज व वलंदे व फरासीस व डिंगमारादि टोपीकर हेही लोक साहुकारी करितात. परंतु ते वरकड सावकारांसारखे नव्हेत. यांचे खावंद प्रत्येक प्रत्येक राज्यच करीत आहेत. ... राज्य करणारास स्थळलोभ नाही, असे काय घडों पाहातें ? तथापि टोपीकरांस, या प्रांती प्रवेश करावा, राज्य वाढवावें, स्वमतें प्रतिष्ठावी, हा पूर्णाभिमान. ही हट्टी जात. हातास आलेले स्थळ मेल्यानेही सोडावयाचे नव्हेत. यांस केवळ नेहमी (नेहमीकरिता) जागा देऊ नये. ... कदाचित वखारीस जागा देणे झाली, तर खाडीचे मोबारी समुद्रतीरी न द्यावी. तसे ठिकाणी जागा दिल्याने... नाही ते समयी आरमार, तोफा, दारूगोळी हेच त्यांचे बळ, आरमारी पाठीशी देऊन त्याचे बळे त्या बंदरी नूतन किल्लाच निर्माण करणार. तेव्हा इतके स्थळ राज्यांतून गेले.'

या टोपीकरांच्याच बंदोबस्तासाठी राजांनी मुंबईनजीक खांदेरी बेटावर बहुत झुंज देऊन एक गढी बांधली, तर मुरूड येथील जंजिऱ्यावर सतत नजर ठेवता यावी, या हेतूने जंजिऱ्याच्या पश्चिमेस ऐन समुद्रात एका लहानग्या बेटावर पद्मदुर्ग उभारला.

पण याहीपेक्षा अधिक चातुर्य त्यांनी रायगडी राजधानी स्थापन करण्यात दाखवले. रायगड ऐन कोकणात. चहूबाजूंस डोंगरदाटी, वरंधघाट, लिंगाणा, माणगाव अशा चार-दोन ठिकाणांव्यतिरिक्त अन्यत्र कुठून तो किल्ला कोणता, ते त्या डोंगरदाटीमध्ये नेटके ओळखता येत नाही. घाटापासून तसा जवळ पण असा अडचणीत. समुद्रकिनारा तिथून अदमासे तीस मैल. चहूंकडून तुटलेला ताशीव कडा. अगदी पाखरू बसू म्हणेल तरी त्यास जागा नाही. असा हा दुर्गम किल्ला त्यांनी राजधानी म्हणून निवडला. तिथून घाटावरही लक्ष पोचत असे आणि समुद्रही आवाक्यात होता.

पूर्वी रायगडावर इमले इमारती होत्या. त्या सर्व मोडून वर जे जे पुन: निर्माण केले त्याची यादी गडावरील जगदीश्वरासमोरच्या शिलालेखात दिली आहे, ती अशी-विहिरी,

टाकी, तळी, वाडे, उद्याने, बाजार, स्तंभ, हत्तीशाळा, राजभवने.

यांपैकी वापी, कूप, तडाग, वन आणि वीथिका हे शब्द अतिशय महत्त्वाचे आहेत. राजांचे प्रजावात्सल्य यामधून अत्यंत स्पष्टपणे दृग्गोचर होते. रायगडावरच नव्हे, तर इतर अनेक गडांवरही पाण्याचा मुबलक साठा करून ठेवलेला आढळतो, पण राजा शिवाजीचा विशेष आहे त्यांनी निर्मिलेल्या वन आणि बाजार या दोन गोष्टींमध्ये.

वन म्हणजे केवळ उपवन नव्हे. त्यात केवळ धनी आणि त्याचे कुटुंबीय विहार करू शकतील अशी उद्यानेही नव्हेत. रायगड, राजगड, दोन्ही गडांखाली प्रचंड आंबराया होत्या. त्या मुद्दाम जोपासल्या होत्या. त्याहीवर शासन असे की,-''- झाडी प्रयत्ने वाढवावी. त्यामध्ये एक काठीही तोडों न द्यावी - गडावरी झाडे जी असतील ती राखावी. याविरहित जी जी झाडे आहेत ती फणस, चिंचा, वड, पिंपळ आदिकरून थोर वृक्ष, निंबे, नारिंगे आदिकरून लहान वृक्ष, तसेच पुष्पवृक्ष वल्ली किंबहुना प्रयोजक अप्रयोजक जे जे झाड होत असेल ते गडावर लावावे. जतन करावे.'' आज्ञापत्र.

**बाजारपेठा : एक वैशिष्ट्य :** भारतातील इतर राजधान्यांमध्ये कुठेही आढळात येत नाही, असा राजगड आणि रायगड या दोन्ही राजधान्यांवरील विशेष म्हणजे बाजारपेठा. लोककल्याणाचा हेतू धरून शिवाजीराजांनी हे गडावर एक अपूर्व रचले, इतकेच नव्हे तर गडाखाली पेठा निर्मून आणि त्यामध्ये निरनिराळ्या वारी बाजार भरवून भवतालची खेडी गुलजार करून टाकली. राजगडावरील बाजारपेठ लहान, पण रायगडावरील खूपच प्रशस्त. त्रेचाळीस दुकाने दोन ओळींत अशी नेटकी बांधली, की तो नगरनिर्मात्यांसमोर एक चिरकालिक आदर्श बसला आहे.

शिवकालामध्ये किल्ल्यांवरील बंदोबस्त कसा असे, याची चोख कल्पना अमात्यांच्या आज्ञापत्रावरून येते. शिवछत्रपतींनी जे नियम घालून दिले होते आणि अतिशय काटेकोरपणे जे पाळले होते, त्यांचाच अनुवाद आज्ञापत्रामध्ये केला आहे.

अमात्य म्हणतात, की दुर्गांच्या संरक्षणाचे कार्य फार नाजूक. त्यावर किल्लेदार, हवालदार, सरनोबत इत्यादी अधिकारी नेमायचे, ते निःस्पृह, कुलवंत, कबिलेदार, विश्वासू, उद्योगी, निर्लोभ, सावध, दुर्गावरील सर्व हशमांचा आणि हाताखालील कामगारांचा विश्वास संपादन करू शकतील असे असावेत. दुर्गावर इतर कामकरी ठेवायचे, तेही चालाक, चोरटे, खुनी, तऱ्हेवाईक, दारुडे, अमली पदार्थांचे सेवन करणारे, फितवेखोर न ठेवावे. या अशांना दुर्गांवर पायही ठेवू देऊ नये.

ही सर्व माणसे वारंवार बदलीत असावीत. तीन वर्षांनी हवालदार, चार वर्षांनी सरनोबत आणि पाच वर्षांनी कारखानीस आणि सबनीस बदलावेत. बहुत दिवस एकाच ठिकाणी माणसे राहिली, की त्यांच्या मनी त्या स्थळाविषयी भलेबुरे निर्माण होऊ लागते. अशी कोणाचे मनी दुर्बुद्धी निर्माण झाली आणि त्याने फितूर केला, तर त्वरित त्याला पत्ता लागू न देता तिथून उचलून आपणापाशी आणावा. योग्य तो न्याय करावा. त्याचा अपराध सिद्ध झाला, तर मग दयाक्षमा न करता त्याचा शिरच्छेद करावा आणि त्याचे मस्तक गडोगडी हिंडवावे. अमात्य म्हणतात, ''किल्ल्याची सेवा परम कठिण.

शासन परमउग्र. शासन न करता किल्ल्याचे काम सर्वसाधारण होऊन जाणार. असे सर्वथैव न करावे!"

किल्ला ज्या डोंगरावर बांधायचा, तो डोंगर एकटा असावा. त्याच्या शेजारी दुसरा डोंगर असू नये. असलाच, तर सुरुंगादी साधनांनी गडाच्या आहारी आणावा. तो तसा आणता येत नसेल, तर त्यावरही तटबुरूज बांधून तो मजबूत करावा. तर बुरूज, चिलखते, पहारे, मेटे, पडकोट इत्यादी नीट विचार करून भले मजबूत बांधावेत. येणेप्रमाणे गडाचा दोष दूर करावा.

खबरदारी : दरवाजे बांधणे, ते खालील मारा चुकवून, पुढे बुरूज देऊन येते-जाते मार्ग बुरुजांच्या माऱ्यांत येतील, असे बांधावेत. गडास एकच एक दरवाजा, हा अतिशय मोठा दोष आहे, हे राजास देवगिरीच्या पतन कथेवरून ठावकी झाले होते. त्यामुळे त्यांनी नियम केला की गड पाहून एकाहून अधिक दरवाजे आणि चोरदिंड्या ठेवाव्यात. पैकी गरजेच्या तेवढ्या मोकळ्या ठेवून बाकी चिणून टाकाव्यात. वेळप्रसंगी मोकळ्या करून वापरता येतील. गडास याव-जायचे मार्ग सुगम नसावेत. असले तरी ते मोडून, त्यावर झाडी वाढवून ते दुर्गम करावेत.

गडावरील धान्यकोठ्या, युद्धसामग्रीची कोठारे ही आग, उंदीर, वाळवी या उपद्रवांपासून सुरक्षित अशी बांधावीत. गडावर राजमंदिरावेगळें फार मोठे घर बांधू नये. तेलतुपासाठी पक्की साठवण असावी.

दारूचे कोठार वस्तीजवळ असू नये. ते एका बाजूस लांब असावे. त्यास तळघर असावे. त्यात दारूचे रांजण, बाण, तोफांचे गोळे आदी सुरक्षित ठेवावे. दर आठ-पंधरा दिवसांनी हवालदाराने स्वतः उभे राहून हे सगळे बाहेर काढावे. उन्हात वाळवून खडखडीत करून पुन: मोहोरबंद करून ठेवावे.

तटबुरुजांवर ठेवलेल्या तोफा जेजालांना पावसाळ्यात तेल आणि मेण लावावे. त्यांच्यावर निर्गुडीचे झाकण घालावे. जाया होऊ देऊ नये.

गडोगडी ज्योतिषी, वैदिक, वैद्य, जखमा बांधणारे, लोहार, सुतार, पाथरवट, चांभार इत्यादी आवर्जून ठेवावे. मोकळेपणी त्यांना इतर कामे सांगून गुंतवून ठेवावे. जांभया देत बसू देऊ नये.

असे शिवछत्रपतींनी दुर्गाच्या राहाटवणुकीचे शास्त्रच बनवले होते. त्यांचा बारकावा ध्यानी येण्यासाठी पुढील वाक्ये पहावीत -

"गडावरील मार्गामार्गावरी बाजारात तटोतट केरकसपट किमपि पडो न द्यावे. ताकीद करून झाला केर गडाखाली न टाकता जागजागी जाळून ती राखही परसांत टाकून घरोघर होईल ते भाजीपाले करावेत."

अमात्यांनी म्हटले आहे - "संपूर्ण राज्याचे सार ते दुर्ग. दुर्ग नसता मोकळा देश परचक्र येताच निराश्रय होऊन उद्वस होतो. हे राज्य तर तीर्थरूप थोरले कैलासवासी स्वामींनी गडांवरूनच निर्माण केले. जो जो देश स्वशासनवश न होय, त्या त्या देशी स्थलविशेष पाहून गड बांधिले. गडकोट विरहित जे राज्य त्या राज्याची स्थिती म्हणजे

अभ्रपटलन्याय आहे."

राजगड, प्रतापगड, सिंधुदुर्ग, कुलाबा, खांदेरी, साजरा, गोजरा, असे काही किल्ले शिवछत्रपतींनी नूतन बांधले. बाकी अदमासे तीनशेसाठ जुनेच ताब्यात घेतले. त्यांची डागडुजी केली. इतकी की यांपैकी प्रत्येक किल्ला वर्षवर्ष लढू शकेल, असा भरवसा त्यांचे मनी होता.

दुर्गाधिराज असे एक विशेषण त्यांच्या नावामागे जोडले जाते तो काही अर्थवाद नव्हे. दुर्ग हा प्रकार महाराष्ट्राच्या जीवनामध्ये त्यांनी इतका मुरवून टाकला, की दुर्गावेगळ्या तत्कालीन महाराष्ट्राची कल्पनाही करता येणे अशक्य आहे.

❒❒❒

('प्रतिभा' साप्ताहिकातून संक्षेपाने)



# १६. शिवाजीमहाराजांची चित्रे

प्रा. ग. ह. खरे

शिवाजीमहाराजांनी स्वातंत्र्यसंपादनाचे जे महान कार्य केले त्यामुळे साऱ्या भारतीयांना आणि त्यातल्या त्यात महाराष्ट्रीयांना त्यांचे स्मरण होणे अगदी स्वाभाविक आहे. महापुरुषांचे नित्य स्मरण व्हावे म्हणून त्यांच्या प्रतिकृती किंवा त्यांनी घडवलेल्या प्रसंगांच्या प्रतिकृती आपण आपल्या घरात जागोजागी लावून ठेवतो. शिवाजीमहाराजांच्या अशा प्रकारच्या प्रतिकृती बाजारात मोठ्या प्रमाणावर उपलब्ध आहेत; पण दुःखाची गोष्ट अशी की त्यांना इतिहासकालाचा आधार फारसा नाही. त्यांत बव्हंशी कल्पनेचाच विलास आहे. अशा प्रतिकृतींनी अजाण मनुष्याचे समाधान होत असले तरी जिज्ञासू व अभ्यासू मनुष्याला ते समाधान लाभत नाही. ते अंशत: तरी मिळावे म्हणून शिवाजीमहाराज व त्यांनी घडवलेले प्रसंग यांविषयी इतिहासकालात ज्या प्रतिकृती तयार झाल्या त्यांविषयी येथे थोडक्यात माहिती देत आहे. ही आजला तरी बव्हंशी संपूर्ण आहे असे वाटते.

व्हॅलेंटिन याच्या न्यू ईस्ट इंडिया या त्रिखंडात्मक व १७२४ ते २६ च्या दरम्यान प्रकाशित झालेल्या डच ग्रंथात अनेक मुघल व विजापुरी सरदारांची चित्रे छापलेली आहेत. त्यांत शिवाजीमहाराजांचेही चित्र आहे. हे चित्र केवळ ऊर्ध्वांग आहे. यात महाराज वामावर्ती दाखवले आहेत. डोक्यावर नेहमीची पण एकाच तुऱ्याची पगडी आहे. नेहमीप्रमाणे झुलपे व दाढीमिश्या आहेत. उजव्या कानात बाळी व गळ्यात दुहेरी मोतीमाला आहे. अंगावर पांढऱ्या चिटाचा व त्यावर समांतर रेषांमध्ये पाने-फुले काढलेला अंगरखा असून त्यावर दुपट्टा आहे. दोन्ही हातांचे पंजे कशाच्या तरी आधारावर ठेवलेले दिसतात. या चित्राखाली Den Heer Sevaji असा डच वाक्यखंड आहे. हे चित्र नेमके केव्हा काढले हे समजत नाही; पण उपर्युक्त ग्रंथातील सर्व चित्रे १७१२ मध्ये डच ईस्ट इंडिया कंपनीचे शिष्टमंडळ मुघल दरबारात गेले असता त्याने जमवली असावीत. महाराजांनी १६६४ मध्ये सुरतेची पहिली लूट केली, त्या वेळी त्यांना प्रत्यक्ष पाहिल्याने हे चित्र काढले, अशी काहींची कल्पना आहे, पण त्या वेळी सुरतेत हलकल्लोळ उडाला असता कोणा चिताऱ्यास स्वस्थता व सवड मिळून, त्याची हे चित्र काढण्याएवढी लय लागली असेल असे वाटत नाही. त्यानंतरच्या दुसऱ्या एखाद्या प्रसंगी हे काढले असावे. ऑर्मच्या १७८२ मध्ये प्रसिद्ध झालेल्या फ्रॅग्मेंट्स या पुस्तकात आलेले महाराजांचे चित्र या चित्राची थोडा फरक केलेली नक्कल असावी असे वाटते. व्हॅलेंटिनचे चित्र श्री. वा. सी. बेंद्रे यांनी स्वतंत्रतेने प्रसिद्ध केले आहे.

दुसरे चित्र ब्रिटिश म्युझियममधील असून त्यात फक्त वामावर्ती ऊर्ध्वांग दाखवले आहे. त्यात डोक्यास दोन तुऱ्यांची पिवळी पगडी असून तीखाली नेहमीप्रमाणे झुलपे व दाढीमिश्या आहेत. कानात एका मोत्याची बाळी आहे. अंगामध्ये सोनेरी समांतर रेषांत

पांढऱ्या रंगावर हिरव्या व जांभळ्या पाना-फुलांची नक्षी काढलेला अंगरखा घातला असून त्यावर जांभळा दुपट्टा, तसेच कमरेस त्याच रंगाचा शेला गुंडाळलेला आहे. शेल्यामध्ये डाव्या अंगास कट्यार खोचली असून डाव्या हातात मेण घातलेल्या व उभ्या धरलेल्या तलवारीची मूठ आहे, तर उजव्या हातात पट्ट्याचा खोबळा आहे. अंगकांती गहूवर्णी आहे. डोळ्यांत तीक्ष्ण नजर भरली असून एकंदर चेहरा दुसऱ्यावर छाप पाडणारा आहे. या चित्रावर 'माजी मराठा राजा शिवाजी' असे डच भाषेत लिहिले आहे. तसेच हे चित्र ज्या बस्त्यात आहे त्याच बस्त्यात औरंगजेबाचे चित्र असून त्यावर 'हयात असलेला मोठा मुघल,' असे लिहिले आहे. या लिखाणावरून महाराजांचे चित्र नेमके केव्हा काढले ते समजत नसले तरी हा बस्ता औरंगजेबाच्या कारकिर्दीत म्हणजे १७०७ पूर्वी तयार झाला असला पाहिजे. हे चित्र व्हॅलेंटिनच्या चित्राशी बरेच मिळतेजुळते असल्यामुळे हे महाराजांच्या हयातीतच काढले गेले असले पाहिजे. मात्र त्यावर लिहिलेला डच भाषेतील मजकूर असलेले हे चित्र महाराजांच्या मृत्यूनंतर डच मनुष्याच्या हाती लागले असल्याने त्याने भूतपूर्व मराठा राजा असे स्वत:च्या आठवणीसाठी लिहून ठेवलेले दिसते. हे चित्र १९७४ मध्ये महाराष्ट्राच्या शासकीय मुद्रणालयाने प्रकाशित केलेल्या रोजनिशा व दिनदर्शिका यांत रंगीत पण लहान-मोठ्या आकारांत आले आहे.

मुंबई येथील प्रिन्स ऑफ वेल्स* संग्रहालयातील एका चित्रात शिवाजीमहाराज उभे व सव्यावर्ती दाखवले आहेत. त्यांची पगडी पिवळी व दोन तुऱ्यांची आहे. त्यांच्या अंगात पांढऱ्या रंगावर हिरवी-तांबडी फुले काढलेल्या चिटाचा अंगरखा असून त्यावर जांभळ्या रंगाचा जरीकाठी दुपट्टा दाखवला आहे. कमरेस सोनेरी पदराचा शेला गुंडाळलेला असून अधरांगात सोनेरी उभ्या रेघा असलेली खुतनीची तांबडी विजार आहे. पायांत सोनेरी कलाबतूचे जोडे आहेत. डाव्या हातात मेण घातलेल्या पट्ट्याचा सोनेरी खोबळा असून उजव्या हातात जांभळे मेण असलेल्या व जमिनीस टेकवून उभी केलेल्या धूपेची सोनेरी मूठ आहे. या चित्रात महाराजांचा रंग पुष्कळच काळा दाखवलेला आहे. युरोपियन लोकांनी महाराजांचे वर्णन केले आहे त्यात त्यांचा रंग सामान्य मराठ्यापेक्षा उजळ होता असे सांगितले आहे. त्यास या चित्रातील रंगाने विरोध येतो. शिवाय त्यांच्या अंगरख्याची किनार पुष्कळच गोलाकार दाखवली आहे. यावरून हे चित्र काढणाऱ्या कलावंताने महाराजांस पाहिलेले नसावे. महाराजांच्या नंतर बहुधा १८ व्या शतकाच्या मध्यास हे चित्र नक्कल रूपाने राजस्थानात कोठेतरी तयार झाले असले पाहिजे. हे चित्र प्रथम स्व. डॉ. बाळकृष्ण यांच्या 'शिवाजी आल्बम' आणि भारत इतिहास संशोधक मंडळ पुरस्कृत 'शिवभारत' या ग्रंथात छापले आहे.

मुंबईच्या प्रिन्स ऑफ वेल्स संग्रहालयात अफजलखान वधानंतर काही दिवसांनी शिवाजीमहाराज व रुस्तुमे जमाँ यांमध्ये झालेल्या लढाईचे एक रंगीत चित्र आहे. या चित्रात मध्यभागी गोल करून उभे राहिलेले रुस्तुमे जमाँचे सैन्य असून त्याला

---

*प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियमचे सध्याचे नाव छत्रपती शिवाजीमहाराज वस्तुसंग्रहालय असे आहे. - संपादक

शिवाजीमहाराजांच्या सैन्याने वेढा घातलेला आहे. दोन्ही सैन्यांत किरकोळ मारामाऱ्या व कापाकापी चालू आहे. या गोलामधील एका व्यक्तीच्या खाली लाल रंगाने रुस्तुमे जमाँ असे लिहिले आहे. चित्राच्या ठीक उजव्या अंगास अगदी कडेच्या मध्यभागी उजव्या हातात एक भलामोठा लांब व दुफळी भाला घेतलेला, डाव्या हातात फूल घेतलेला आणि घोड्यावर बसलेला वामावर्ती पुरुष असून तो वेढ्याची पाहणी करत असल्याचे दिसते. हा पुरुष त्यास दाढी दाखवलेली नाही; पण उन्हाचा त्रास होऊ नये म्हणून एका सेवकाने त्यावर सूर्यपान (अब्दागीर) धरले आहे. तेव्हा तो कोणी महत्त्वाचा पुरुष आहे यात संशय नाही. त्याच्या खाली तांबड्या रंगाने 'सीवा' हा शब्द लिहिला आहे. त्या पुरुषाचे कपडे इतर शिपायांच्या मानाने पुष्कळच मूल्यवान असल्याचे वाटते. हे दोन्ही शब्द तेथे नसते तर हे चित्र उपर्युक्त माणसांचेच आहे असे समजणे धाडसाचेच होईल. पण आता हे चित्र महाराजांच्या एखाद्या सेवकाचे नसून महाराजांचेच असावे असे सध्या तरी समजण्यास हरकत नाही. हे प्रथमत: स्व. डॉ. बाळकृष्ण यांच्या 'शिवाजी आल्बम' मध्ये छापलेले मला आढळले. नुकतेच महाराष्ट्राच्या शासकीय मुद्रणालयाने 'शिवरायासी आठवावे' या ग्रंथात ते घातलेले आहे.

एक चित्र पॅरिस येथील बिब्लिओथेक नेसिओनेलमध्ये आहे. हे चित्र शिवाजीमहाराज स्वारीमध्ये असताना काढले असावे. यामध्ये महाराज एका पांढऱ्याशुभ्र पण रक्तपाद घोड्यावर बसल्याचे दाखवले आहे. त्यांच्या डोक्यावर केशरी रंगाचे आणि मोत्यांचा व केसांचा तुरा असलेले पागोटे असून अंगावर पांढऱ्या भूमीवर सोनेरी समांतर रेषा व त्यांमध्ये हिरव्या-तांबड्या पत्रफुलांची नक्षी असलेला चिटाचा अंगरखा घातला आहे. अधोभागी सोनेरी उभ्या रेषा असलेली तांबड्या खुतनीची विजार असून पायांत बिनटाचेचा टोकदार जोडा दाखवला आहे. घोड्यावर निरनिराळ्या तऱ्हेचे दागिने घातले आहेत. महाराजांच्या पाठीस ढाल अडकवलेली आहे व कमरेस गुंडाळलेल्या सोनेरी शेल्यात कट्यार खोचलेली आहे. डाव्या हाताने घोड्याचा लगाम धरला असून उजव्या हातात पट्टयाचा सोनेरी खोबळा आहे. त्यांच्या पुढे एक सूर्यपानधारी (अब्दागिऱ्या) व एक खानपानाचा करंडा घेतलेला आणि पाठीमागे दोन रुमाल उडवणारे सेवक आहेत. याशिवाय त्यांच्या पुढे-मागे व उजव्या बाजूस विविध पोशाख केलेले वीस सशस्त्र शिपाई आहेत. या शिपायांपैकी बहुतेकांच्या हातांत मेण घातलेल्या व उभ्या-आडव्या धरलेल्या तलवारी असून फक्त एकाच्याच हातात खूप लांब भाला आहे. या शिपायांपैकी आठजणांना दाढी आहे. तरीही त्यांतील निदान पाचजणांच्या कानांत एकेक मोती घातलेली बाळी आहे. शिवाय अनेकजणांच्या कपाळास गंधाचे वाटोळे टिळे असून काहींच्या कपाळांवर उभे-आडवे गंध असल्याचाही भास होतो. यामुळे बहुतेक शिपाई हिंदू, पण थोडेसे मुसलमानही आहेत असे वाटते. महाराजांच्या उजव्या अंगास बऱ्याच अंतरावर आणखी सात शिपाई आहेत. या चित्राच्या माथ्यावरच्या मोकळ्या जागेत SEVAGI असे चित्रातील व्यक्तीचे नाव दिले आहे. एकंदरीत हे चित्र अतिशय मनोहर

आहे यात शंकाच नाही. इटालियन प्रवासी मनुची याने १७०६ मध्ये व्हेनिसच्या सिनेटला छप्पन्न चित्रांचा जो बस्ता भेट म्हणून दिला त्यात हे चित्र आहे. ही सर्व चित्रे औरंगजेबाचा मुलगा शाह आलम यांच्या परिवारातील कलावंत मीर मुहम्मद याने मनुचीसाठी १६८६ पूर्वी काढलेली आहेत. तेव्हा हे चित्र पूर्ण समकालीन असण्याचा व शिवाजीमहाराजांची स्वारी चाललेली प्रत्यक्ष पाहून काढले असण्याचा दाट संभव आहे. हे चित्र प्रथम 'स्तोरिआ दो मोगोर' या पुस्तकात विस्तृत माहितीसह प्रकाशित झाले. आता ते महाराष्ट्र शासकीय मुद्रणालयाने 'शिवरायासी आठवावे' या पुस्तकात घातले आहे. 'De Gancigng and Raimands' Inde' या ग्रंथात प्रकाशित झालेले महाराजांचे चित्र या चित्राची आंशिक नक्कल आहे असे दिसते.

१९३५ मध्ये पुण्यास मॉडर्न हिस्ट्री काँग्रेसचे पहिले अधिवेशन भरले होते. त्या अधिवेशनाच्या अनुषंगाने भरवलेल्या प्रदर्शनात ग्वाल्हेरहून आणलेली काही चित्रे मांडली होती. त्यात शिवाजीमहाराजांचे म्हणून मानलेले एक चित्र होते. त्या चित्रात महाराज वामावर्ती व उभे दाखवले आहेत. त्यांच्या डोक्यास इतर चित्रांत दाखवल्याप्रमाणे दक्षिणी पद्धतीची पण एकाच तुऱ्याची पगडी आहे. त्याखाली झुलपे, मिश्या व फुले काढलेला पायघोळ अंगरखा असून त्यावर गळ्यामध्ये मोत्यांची दुपदरी माला आहे व शिवाय दक्षिणी पद्धतीने घेतलेला दुपट्टा आहे. कमरेस नक्षीदार कमरपट्टा आहे आणि दुपट्ट्याचा पदर त्या खालून उजव्या बाजूस आलेला आहे. उजव्या हातात नक्षीदार मेणाची तलवार असून वर केलेल्या डाव्या हातात फूल घेतले आहे. पायात पांढरी पण साधी विजार असून त्याखाली नक्षीकाम केलेला चढाव आहे. या चित्रात महाराज बांधेसूद दाखवले असून त्यावरून त्यांचे शरीर कमावलेले असावे असे वाटते. या चित्रावर कोणताही लेख नाही तथापि, ते महाराजांचे आहे असे आज तरी वाटते.

भारत इतिहास संशोधक मंडळाच्या संग्रहात एक ऋण काच असून तीमध्ये घोड्यावर बसलेला, डाव्या हाताने लगाम खेचणारा व उजव्या हातात फूल घेतलेला स्वार दाखवला आहे. त्याच्या डोक्यावर तंजावरी पद्धतीचे पागोटे आहे. त्याचा पोशाखही तंजावरी पद्धतीचा आहे. या पुरुषाच्या अंगावर दागिन्यांची रेलचेल आहे. घोड्यालाही दागिने घातले आहेत. हे चित्र तंजावरच्या व्यंकोजी राजाच्या एखाद्या वंशजाचे असावे असे वाटते; पण काचेच्या उजव्या वरच्या कोपऱ्यात इंग्रजीत 'Raja Seevajee The Great in the North' असे मोठ्या वर्णांत लिहिले असून त्याखाली बहुधा हाच मजकूर तमिळमध्ये लिहिला आहे. हे चित्र समकालीन तर नाहीच, पण शिवाजीमहाराजांचे आहे की नाही याविषयीही शंका आहे. तथापि, त्यावर उपर्युक्त लिखाण असल्यामुळे त्याचे येथे आवर्जून वर्णन केले आहे.

बिकानेर येथील प्रसिद्ध पुराणवस्तु-संग्राहक व विक्रेते श्री. मोतीलाल खजांची यांच्या संग्रहात शिवाजीमहाराज व संभाजी यांचे एकत्र काढलेले एक चित्र आहे. ते प्रसिद्ध चित्रांपैकी कोणत्याही चित्राशी जमणारे नाही. अगदीच सुमार अशा कलावंताने

ते काढले असावे. तथापि, बिकानेर येथील शासकीय पुराभिलेख संग्रहात एक जुन्या चित्रांची सूची असून तीमध्ये या किंवा एतदसदृश चित्रांची माहिती दिली असून त्या माहितीत हे चित्र शिवाजी व त्याचा मुलगा संभाजी यांचे असल्याचे दर्शित केले आहे, म्हणून येथे त्याची माहिती दिली आहे.



('छत्रपती शिवाजीमहाराज स्मृतिग्रंथा'तून संक्षेपाने)



